# विषयानुक्रमणिका

## लेखकाचें निवेदन

गु. गंगाधरराव देशपांडे कैलासवासी होऊन आज तीन वर्षें होऊन गेलीं. नवीन पिढीला त्यांची ओळख नसली तरी त्यांचें नांव कानावरून जात असतें. जुन्या पिढींतील त्यांच्याबरोबर काम करीत असलेले लोक एकामागून एक जात चालले आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळामध्यें स्वातंत्र्यार्थ त्यांनीं जें राजकीय क्षेत्रामध्ये कार्य केलें आहे, त्याचें स्मरण अद्यापि प्रौढांमध्यें आहे, आणि आपल्या भारताच्या स्वातंत्र्याचा इतिहास त्यांच्या कार्याची साक्ष देईलच. मला येथें त्यांचें चरित्र सांगावयाचें नसलें तरी विहंगम दृष्टीनें त्यांचें स्मरण करावयाचें आहे. त्यांनीं 'माझी जीवनकथा' या आपल्या आत्मचरित्रांत कित्येक गोष्टींचा उल्लेख करून ठेविलेला आहेच.

मराठी 'धुरीण' साप्ताहिक पत्र चालविल्यापासून ते सार्वजनिक राजकीय क्षेत्रांत झळकूं लागले होते. स. १८९७ ते १९०५ पर्यंत त्यांनीं बेळगांवमध्यें एक उत्तम वकील म्हणून वकिली केली. ते सहा वर्षें बेळगांव म्युनिसिपालिटीचे व्हाइस प्रेसिडेन्ट होते. स. १९०८ मध्यें श्री. सी. के. दामले यांच्या संपादकत्वाखालीं त्यांनीं 'राष्ट्रमत' नांवाचें मराठी साप्ताहिक मुंबईमध्यें चालविलें. त्या ठिकाणाला 'राष्ट्रमठ' असेंच म्हटलें जात असे. हा राष्ट्रमत प्रेस स्थापण्याचे वेळीं लोकमान्य टिळक स्वतः जातीनें उपस्थित होते. स. १९०६ मध्ये बेळगांवांत 'मॅझिनी वर्ग' गंगाधररावांनीं स्थापन केला व एक वर्ष तो चालविला होता. स. १९०७ ते ११ पर्यंत कोल्हापूर संस्थानच्या छत्रपति शाहूमहाराजांच्या कुटिल कारस्थानास त्यांनीं यशस्वी रीतीनें तोंड दिलें. त्यांत त्यांच्या, धारिष्ट, दूरदर्शीपणा, व जागरूकता या सहज गुणांची प्रतीति जनतेला आली होती. स. १९१५ सालच्या मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनाच्या वेळीं त्यांना प्रथमतःच डॉ. राजेंद्रप्रसादजी यांचें दर्शन झालें होतें, पुढें त्यांचा निकट संबंध आला आणि शेवटीं शेवटीं तर डॉ. राजेंद्रप्रसादजी त्यांना पूज्यस्थानींच मानीत होते. स. १९१६ मध्यें श्रीमान् दादासाहेब खापर्डे, वऱ्हाडचे बादशहा, यांच्या

अध्यक्षतेखालीं 'मुंबई इलाखा राजकीय परिषद' वेळगांवमध्यें यशस्वी रीतीनें भरवून दाखविण्याची जबाबदारी गंगाधरराव व गोविंदराव याळगी यांनीं पार पाडून दाखविलेली आहे. कै. गोविंदराव याळगी यांची कार्यकुशलता, संघटनाचातुर्य, अपूर्व योजकता, दूरदृष्टि आणि स्वराज्यनिष्ठा या गुणांचा समन्वय अन्यत्र क्वचितच पहावयास मिळेल. त्यांचें विस्तृत चरित्र लिहिलें जाणें अत्यंत आवश्यक आहे. गंगाधररावांच्या जीवनाची घडण गोविंदरावांमुळें झाली, कि त्याच्या उलट गोविंदरावांच्या जीवनावर जे अनेक शुभ संस्कार झाले, ते गंगाधररावांच्या सहवासामुळेंच होत, हें ठरविणें इतकें सोपें नाहीं. ते दोघे 'शस्त्री आणि शास्त्री' अशा नात्यानें वागलेले आहेत. त्या दोघांचे गुण एकमेकाला पोषकच होते. ही प्रांतिक परिषद म्हणजे राष्ट्रीय जहाल पक्षाची छोटीशी कॉंग्रेसच होती. या परिषदेला प्रतिनिधि म्हणून सुमारें तीन हजार लोक उपस्थित होते. स. १९१७ सालीं चिकोडी येथें साताराचे श्री. दादासाहेब करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं, आणि अथणी येथें श्री. कृ. प्र. खाडिलकर यांच्या अध्यक्षतेखालीं आणि स. १९१८ मध्यें संकेश्वर येथें लोकनायक पू. श्री. माधव श्रीहरि अणे यांच्या अध्यक्षतेखालीं, अशा तीन बेळगांव–जिल्हा–राजकीय–परिषदा गंगाधररावांनीं भरविलेल्या होत्या. त्या तिन्ही परिषदा भिन्न भिन्न कारणांनीं त्या काळीं बऱ्याच गाजलेल्या होत्या. स. १९१७ मध्यें 'अखिल भारतीय मराठा परिषद' वेळगांवमध्यें वऱ्हाडचे बॅ. रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली होती. या 'मराठा परिषदेनें'हि त्या काळीं राजकीय वैचारिक क्षेत्रांत बरीच खळबळ उडवून दिली होती. स. १९१८ मध्यें गंगाधरराव लोकमान्यांच्यावरोबर वऱ्हाडच्या दौऱ्यामध्यें होते. चांदा येथील परिषदेचे अध्यक्ष म्हणून गंगाधररावांची निवड झालेली होती. या परिषदेमध्यें त्यांच्या अध्यक्षपदाची सूचना लोकमान्यांनीं मांडलेली होती, व गंगाधररावांचें वर्णन व प्रशस्ती लोकमान्यांच्या तोंडून जनतेला त्यावेळीं ऐकावयास मिळाली होती.

"'स्वराज्य' शब्द उच्चारण्यासहि जेव्हां लोक भीत असत, त्यावेळीं स्वराज्याच्या चळवळीची धुरा वहाण्यास गंगाधरराव पुढें आलेले आहेत."

असे उद्गार लोकमान्यांनीं काढलेले आहेत. लोकमान्य विलायतेला जाण्यापूर्वी '*आपल्या गैरहजेरीमध्यें आपल्या गायकवाडवाड्यांत गंगाधररावांनीं रहावें*' असें लोकमान्यांनीं जाहीर केलें होतें. स. १९१४ सालीं मंडालेहून लोकमान्यांची सुटका झाल्यानंतर चळवळीचें 'पुनश्च हरिः ॐ' करण्यापूर्वी पहिली तार लोकमान्यांनीं गंगाधररावांना केली होती ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. 'होमरूल लीग'च्या वतीनें स. १९१८ मध्यें मॉंटेग्युसाहेबांच्या भेटीस जें शिष्टमंडळ दिल्लीस गेलें होतें, त्यांत लोकमान्यांच्या बरोबर गंगाधररावहि होते, ही गोष्ट जनतेच्या स्मरणांत आहे. असहकारितेच्या चळवळीचा कॉंग्रेसचा संदेश खेडोपाडीं पोहोंचविण्यासाठीं, कर्नाटक व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांत गंगाधररावांनीं जे दौरे काढलेले होते व जीं

जळजळीत व्याख्यानें दिलीं होतीं, तीं अद्यापीहि कित्येकांच्या कानांतून घुमत असणें शक्य आहे.

स. १९२१ सालीं क. प्रां. कॉ. क. चे अध्यक्ष म्हणून गंगाधरराव निवडून आले. आणि त्याच वर्षी '१२४ अ' या राजद्रोही कलमाप्रमाणें त्यांच्यावर खटला भरला गेला व त्यांत त्यांना सहा महिने शिक्षा झाली. कॉंग्रेसच्या आदेशानुसार हा खटला चालविण्यांत त्यांनीं भाग घेतलेला नव्हता.

स. १९२२ सालीं गंगाधररावांनीं महात्माजींचें पुढारीपण स्वीकारुन, महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रांतांत मोठाच दीर्घकालाचा दौरा काढलेला होता. त्यांच्या अमोघ वक्तृत्वामुळें हे दौरे लोक चिरकालपर्यंत विसरणार नाहीत, आणि स्वातंत्र्याच्या इतिहासाला त्यांची दखल घ्यावीच लागेल. याच सालीं गया कॉंग्रेसच्या अधिवेशनांत 'फेर-नाफेर' वादांत नाफेरवादी जनतेचें पुढारीपण घेऊन, ते हिरिरीनें आपली विचारसरणी व भूमिका मांडीत असत. त्या वादांत श्रीमान् मोतीलालजी नेहरू यांच्याशींहि त्यांना दोन हात करावे लागलेले आहेत. स. १९२३ हें संबंध वर्ष, महात्माजींचा दृष्टिकोन जनतेला समजून सांगण्यासाठीं महाराष्ट्र व कर्नाटकांत त्यांनीं दौऱ्यामध्येंच खर्च केलेलें आहे. स. १९२४ सालीं महात्माजींच्या अध्यक्षतेखालीं बेळगांवांत जें कॉंग्रेसचें अधिवेशन झालें त्याचें स्वागताध्यक्षपद गंगाधररावांनीं मंडित केलें होतें.

स. १९२५ सालीं 'अखिल भारतीय चरखा संघ' महात्माजींनीं स्थापन केला त्याचे आणि 'अखिल भारतीय ग्रामोद्योग संघा'चे कर्नाटक प्रांताचे गंगाधरराव एजंट अर्थात् सुभेदार सरदार होते.

स. १९३० सालच्या मिठाच्या सत्याग्रहाच्या चळवळीमध्यें कर्नाटकाचे ते पहिले सत्याग्रही होते. बेळगांवांत जाहीर सभेत बेकायदा मीठ विकून त्यांनीं सत्याग्रह केला होता. स. १९३४ सालचा महात्माजींचा इतिहासप्रसिद्ध कर्नाटक 'हरिजन दौरा' गंगाधररावांनींच आपल्या शिरावर घेऊन त्याची यशस्वी संघटना केली होती. कर्नाटकांतील या हरिजन दौऱ्यामध्यें महात्माजींचीं सर्व भाषणें कानडीमध्यें गंगाधररावच भाषांतरित करीत होते. स. १९३४ मध्यें बिहार प्रांतांत जो भूकंप झाला होता, त्यांतील भूकंपपीडितांसाठीं मदत मिळविण्याकरितां गंगाधररावांनीं कर्नाटक व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांत दौरा काढलेला होता, एवढेंच नव्हे, तर त्या पीडित जनतेची प्रत्यक्ष सेवा करण्यासाठीं त्यांनीं प्रस्तुत लेखकाला बिहारमध्यें एक वर्षासाठीं पाठवून दिलें होतें. स. १९३७ सालीं हुदलीमध्यें 'गांधी सेवा संघाचें' संमेलन त्यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडून दाखविलें आहे. या संमेलनाच्या वेळीं अतिवृष्टि झाल्यामुळें गंगाधररावांची संघटना आणि गंगाधररावांचें मनुष्यबळ आणि आपत्तीशीं हौसेनें झगडण्याची त्यांची वृत्ति लोकांना दिसून आली. स. १९३८ सालीं कर्नाटकांत गाजलेल्या क. प्रां. कॉं. क. च्या अध्यक्षपदीं गंगाधररावांची निवड झाली. या

निवडणुकीचें विस्मरण कर्नाटकांतील कॉंग्रेसजनांना तरी होणें शक्य नाहीं. श्रीमान् दिवाकरांच्या उपवासानें त्या प्रकरणाचा शेवट लागला होता. सन १९४१ सालीं व्यक्तिगत सत्याग्रहाची संघटना करण्यामध्यें त्यांनीं आपली बुद्धि कामीं लावली. आणि सन १९४२ मध्यें कॉंग्रेसचे 'चलेजाव' आंदोलन व्यवस्थित चालविण्याची तरतूद मुंबईमध्यें करून ठेविल्यानंतरच बेळगांवांत त्यांना अटक करण्याची संधी त्यांनीं सरकारला सुलभ करून दिली. जेव्हां सरकारनें कॉंग्रेस बेकायदा ठरविलेली होती, त्यावेळीं गंगाधरराव, स्वतःला अटक होईपर्यंत, कॉंग्रेसचे डिक्टेटर म्हणजे सर्वाधिकारी किंवा सर्वेसर्वा होते. कांहीं वर्षे गंगाधरराव कॉं. व. क. चे सभासद होते. स. १९४२ ते १९४४ पर्यंत ते नाशिक तुरुंगांत राजकीय कैदी म्हणून होते. स. १९४५ ते १९५० पर्यंत त्यांनीं केवळ विधायक कार्याला स्वतःला वाहून घेतलें होतें.

सन १९५० सालीं श्री. स. का. पाटील यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईमध्यें गंगाधररावांचा जाहीर सत्कार झाला; आणि त्याच वर्षी वरिष्ठ कौन्सिलचे अध्यक्ष श्री. भाऊसाहेब सोमण, सातारा, यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यामध्यें गंगाधररावांचा प्रचंड सत्कार सर्व पक्षोपपक्षांच्या वतीनें करण्यांत आला. पुढें ता. २४ जून १९५१ सालीं श्रीमान् दादासाहेब मावळंकर यांच्या अध्यक्षतेखालीं बेळगांव व कर्नाटकांतील सर्व पक्षांतील पुढाऱ्यांच्या वतीनें गंगाधररावांचा सत्कार करण्यांत आला. गंगाधररावांनीं भारतीय राजकारणाच्या, तसें पाहू गेलें तर, तीस वर्षांची एक पिढी मानल्यास, तीन पिढ्या डोळ्यांनीं पाहिल्या आणि दोन पिढ्यांच्या राजकारणांत त्यांनीं हिरिरीनें व अगदीं बिनीवर राहून भाग घेतलेला आहे. अशा अनुभवी विभूतीनें आपल्या सत्काराला उत्तर देतांना 'भल्या' कॉंग्रेसजनांना 'दस लाखाची गोष्ट' सांगितलेली होती. ते म्हणाले होते कीं,

"स्वातंत्र्य तुम्हींच मिळविलें असा अहंगंड बाळगूं नका. तसेंच राजकीय मतभेद म्हणजे द्वेष नव्हे. पूर्वी टिळक व आगरकर यांचे तीव्र मतभेद होते. पण त्यांनीं एकमेकांच्या गुणांचा कधीं अव्हेर केला नाहीं. आज मतभेद किंवा पक्षभेद म्हणजे 'परस्परद्वेष व टिंगल' असें समीकरण झालेलें आहे. व त्यामुळें विरोधी पक्षांतील किंवा आपल्या पक्षाबाहेरच्या अपक्ष माणसांच्या गुणांचें चीज होत नाहीं. अशा परिस्थितींत राष्ट्राचें नुकसान होतें व समाजजीवन गढूळ होतें. हें ओळखून सर्व पक्षांनीं एकमेकांच्या गुणांचें चीज केलें पाहिजे व समाजजीवन गढूळ होणार नाहीं अशी दक्षता घेतली पाहिजे."

स. १९४५ मध्यें बॅ. जीना बेळगांवास आले होते. त्या वेळीं त्यांची व कै. गु. गंगाधररावांची भेट झाली होती. बेळगांवच्या वैशिष्ट्याची माहिती बॅ. जीना यांना करून देतांना गंगाधररावांनीं सांगितलें होतें कीं 'अन्य ठिकाणांप्रमाणें बेळगांवांतहि अनेक पक्षोपपक्ष असले, तरी आपल्यामधील बंधुभाव व स्नेहसंबंध आम्ही मुळीच कमी होऊं दिलेला नाहीं. आमच्या या गांवीं हिंदू व मुसलमान यांच्यामध्यें कांहीं

मतभेद असले वरी आमचे परस्परांतील संबंध सलोख्याचे आहेत." हें ऐकून बॅ. जीनासाहेब विनोदानें कां होईना, म्हणाले होते कीं, 'माझी अडचण व तक्रार तर तीच आहे.'

गंगाधररावांच्या स्वभावांतील व जीवनांतील हा एक स्थायीभाव होता. त्यामुळेंच सर्व पक्षांमध्यें त्यांचे जिवलग स्नेही होते. त्यांचा मित्रपरिवार अखिल भारतभर सर्व प्रांतांत पसरलेला होता. त्यांच्या वाढदिवसाच्या याच सत्कार-समारंभाला कै. वीर वामनराव जोशी, वऱ्हाड, यांनीं एक संदेश पाठविला होता, त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं,

'माझ्या आयुष्यांत मला ज्या चारदोन जिव्हाळ्याच्या सज्जन मित्रांचा लाभ झाला त्यांत आपण सर्वांत श्रेष्ठ आहांत, असें म्हणण्यास मला मुळींच संकोच वाटत नाहीं. आपल्या प्रेमळ मित्रत्वाचा जो गोड अनुभव मी घेतला आहे तो खरोखरच अमोल आहे. परमेश्वरानें जन्मोजन्म अशा मित्रांची जोड दिली तर, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडविण्याकरितां परमेश्वराची प्रार्थना करण्याचें कारणच उरणार नाहीं.

नलगे मुक्ति धनसंपदा। संतसंग देई सदा॥
तुका म्हणे गर्भवासी। सुखें घालावें आम्हांसी॥

हा तुकारामाचा अभंग सुप्रसिद्धच आहे. परमेश्वर आपणास आनंदांत ठेवो एवढीच त्याच्यापाशीं प्रार्थना आहे."

मित्रांच्या तोंडून हे उद्गार निघूं लागले म्हणजे समजावें कीं ऐहिक दृष्टीनें जें मनुष्यानें मिळवावयाचें असतें तें मिळविल्यासारखें आहे.

लिंगायत समाज व जैन समाज कॉंग्रेसमध्यें आणण्याचें श्रेय मूलतः गु. गंगाधर-रावांनाच देणें भाग आहे. शेवटीं कांहीं कालानंतर कर्नाटकाचें पुढारीपण लिंगायत समाजाच्या धुरीणाकडेच जाणार आहे, ही गोष्ट त्यांनीं कित्येक वर्षांपूर्वी हेरलेली व ताडलेली होती. लिंगायत पुढाऱ्यांच्यावरच अधिक चांगले राष्ट्रीय संस्कार आपण करीत राहिलें पाहिजे, हा निर्णय त्यांनीं आपल्या मनाशीं कधींच घेऊन ठेविलेला होता. म्हणूनच नाशिक तुरुंगामध्यें श्री. एम्. पी. पाटील सारख्या लिंगायत पुढाऱ्यावर सुसंस्कार करण्याची खटपट त्यांनीं मनापासून केली. गुजराती अनेक पुढाऱ्यांचीं व्याख्यानें 'गुजरात प्रांत कसा घडविला गेला?' या विषयावर गंगाधर-रावांच्या तुरुंग कोठडीमध्येंच करविलीं. श्री. एम्. पी. पाटील उपस्थित झाल्यानंतरच, व्याख्यानाला ते प्रारंभ करवीत असत. त्यांतील हेतु स्पष्ट आहे. जैन समाजाचे श्रेष्ठ पुढारी श्री. अण्णासाहेब लठ्ठे यांनाहि कॉंग्रेसमध्यें आणण्यास व त्यांना मुंबईप्रांताचे पहिले अर्थमंत्री निवडविण्यास गंगाधररावच जबाबदार आहेत. अण्णा-साहेबांचें कोठें चुकल्यास, त्यांनीं त्यांना अगदीं सौम्य व गोड शब्दांत अनेक वेळां दोन

शब्द सांगितलेले आहेत. लिंगायत समाजानें व त्यांच्या पुढाऱ्यांनीं काँग्रेसमध्यें कां आलें पाहिजे, याविषयीं कानडी 'संयुक्त कर्नाटक' दैनिकामध्यें गंगाधररावांनीं आपल्या सहीनें लेखहि लिहिलेले आहेत. कै. अण्णासाहेब लट्टे यांचें उचित स्मारकहि बेळगांवांत करविण्याची गंगाधररावांची इच्छा होती. तें कार्य राहून गेलें, त्याला मुहूर्तच चांगला लागला नाहीं.

गु. गंगाधररावांच्या स्वभावांतील व मनाच्या ठेवणींतील खास वैशिष्ट्य म्हणजे हें आहे कीं, त्यांचें मन शेवटपर्यंत संस्कारक्षम राहिलेलें होतें. लोकमान्यांचे व महात्माजींचे ते सारखेच विश्वासांतील होते. महात्माजींच्याहि पंचायतनापैकीं ते एक होते हें प्रसिद्धच आहे. लोकमान्यांच्या आदर्शाचे व सहवासाचे संस्कार आपल्यावर किती खोल झालेले आहेत याचें दिग्दर्शन त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत केलेलें आहेच. महात्माजींच्या सान्निध्यांत आल्यामुळेंहि, त्यांच्या मनावर अनेक शुभ संस्कार झालेले त्यांच्या दैनंदिन वागणुकींत दिसून येत असत. वागणुकींतील साधेपणा, तापटपणावर नियंत्रण आणि आपल्या हातून कोणावरहि अन्याय होऊं न देण्याची खबरदारी, हे संस्कार महात्माजींच्या सहवासामुळें त्यांना लाभले. आपल्याकडे केवळ एका कायद्याच्या मुद्यावर आलेली चांगल्या उत्पन्नाची एक जमीन, तिच्या मूळ मालकाला बोलावून घेऊन त्यांनीं परत केली आहे. अशाच प्रकारचीं लहानसहान उदाहरणें मी अनेक देऊं शकेन. प्रो. आर. डी. रानडे यांच्या सहवासांत शेवटीं आल्यानंतर 'आध्यात्मिक क्षेत्रांत त्यांच्या इतर साधक शिष्यांपेक्षां गंगाधररावांनीं थोड्या काळांत पण अधिक झपाट्यानें प्रगति करून घेतलेली आहे.' असे उद्गार प्रो. रानडे गुरुदेव यांनीं काढलेले आहेत. गंगाधररावांचें सांगलीच्या राजेसाहेबांच्याकडे गुरुदेवांच्या समक्ष झालेलें आध्यात्मिक अनुभवाचें व्याख्यान सुप्रसिद्धच आहे.

गंगाधररावांच्या या सर्व ठळक ठळक गोष्टी लोकांना माहीत आहेत. त्या प्रत्यक्ष पाहिलेले पुढारी व लोक अद्यापि हयात आहेत. पण या सर्व चळवळी करीत असतांना स. १९२२ ते १९५९ पर्यंत त्यांच्या मार्गदर्शनाखालीं हुदलीमध्यें कोणकोणतीं विधायक कामें चालू होतीं, किंवा आमच्यासारख्या अगदीं सामान्य कार्यकर्त्यांना हाताशीं धरून त्यांनीं कोणतीं राष्ट्रहितसंवर्धक विधायक कार्ये केलीं आणि त्यांत किती यशापयश लाभलें व तें कां यासंबंधींची माहिती जनतेला कांहींच नाहीं. याला खरें कारण म्हणजे हुदलीच्या विधायक कार्याचा प्रचार किंवा प्रसिद्धी वर्तमानपत्रांतून करण्यास ते कधींच प्रोत्साहन देत नसत. 'वर्तमानपत्री जगांत जाल तर विधायक कार्यावरील तुमची दृष्टीच चळेल' असें ते आम्हांला नेहमीं बजावीत असत. पण आतां त्यांच्या पश्चात् विधायक कार्याची माहिती जनतेपुढें ठेवावी आणि ज्या गोष्टी त्यांच्या आत्मचरित्रांत येणें शक्य नाहीं अशी कांहीं स्वभावांतील वैशिष्ट्यें आणि विचारसरणींतील पैलू त्यांच्या कार्यांतून व प्रासंगिक उद्गारांतून कळून येतात तेंहि शब्दबद्ध करावेत या उद्देशानें, मी ही सर्व माहिती या पुस्तकाच्या रूपानें जनतेपुढें ठेवीत आहें.

या कार्याशीं संबंधित अनेक कार्यकर्त्यांना, स्थानिक खेडुतांना, व कांहीं विद्वान साहित्यिकांना मी या सर्व लिखाणाचें हस्तलिखित ऐकविलेलें व दाखविलेलें आहे आणि त्यांच्या स्मरणाच्या चाळणींतून तें चाळून आणि विद्वानांच्या तेजावांतून उजाळून घेऊन मगच वाचकांपुढें ठेवीत आहें. या पुस्तकानें गंगाधररावांच्या रहाणी–करणी–विचारसरणीविषयीं लोकांना थोडी अधिक स्पष्ट कल्पना देतां आली, तरी तेवढ्यानें माझ्या मनाला समाधान वाटेल. वाचकांनींहि हें पुस्तक याच दृष्टीनें वाचावें व गंगाधररावांच्या जीवनचरित्रांतील हाहि एक पूरक भाग किंवा संस्मरणीय पर्व आहे ही गोष्ट दृष्टिआड होऊं देऊं नये अशी विनंति आहे.

या पुस्तकाचें हस्तलिखित वाचून व ऐकून घेऊन मला ज्यांनीं उपयुक्त सूचना केल्या, त्या सर्वांचा मी ऋणी आहें. त्या उपकाराबद्दल पू. श्री. न. र. फाटक, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, श्रीपाद शंकर नवरे, श्री. निम्माप्पा नायक कारवार, बा. र. सुंठणकर, श्री. कृष्णराव बाबूराव मराठे, गंगाधररावांचे पणतू श्री. नारायण व्यंकटेश तथा नानासाहेब देशपांडे वकील, विनायक गोविंद साठये मिरज, रामचंद्र व्यंकटेश वडवी, आणि प्रा. श्री. पु. भागवत, मुंबई, या सर्वांचा मी ऋणी आहें. हें पुस्तक शीघ्रातिशीघ्र वेळांत 'मौज प्रिंटिंग ब्यूरो'नें छापून दिलें, त्याबद्दल त्यांचा तर मी अनेक अर्थांनीं ऋणी आहें.

स्वातंत्र्यदिन
ता. २६ जानेवारी १९६४
बेळगांव

पुंडलीकजी कातगडे



मांगन्नीम श्री. अभ्यंकरांच्या बंगल्यास पोलिसांनी दिलेल्या वेढ्यांतून निसटनांना,
भूमिगत पुंडलीकजी कातगडे.

१.

## माझा व बेळगांवचा संबंध

मिरज येथें हायस्कुलांत मॅट्रिकच्या वर्गांत शिकत असतांना आम्हा विद्यार्थ्यांमध्यें "खाजगी महत्त्वाची बातमी" म्हणून एकमेकांच्या कानाशीं लागून सर्वत्र विद्यार्थी बोलत असत कीं 'बेळगांवला गंगाधरराव देशपांडे यांचा एक बॉंबचा कारखाना असून ते तरुणांना बॉंब करण्यास शिकवीत असतात. हा एवढा जबरदस्त मनुष्य आहे कीं, सरकार त्यांना हात लावण्यास धजतच नाहीं.' त्यांच्याकडे बॉंब करण्याची कला शिकावयास गेलें पाहिजे, असें पुष्कळ विद्यार्थी बोलत असत; पण कोणीहि जाऊं शकले नाहींत. ही गोष्ट १९१४ सालची आहे.

त्याच वेळीं 'केसरी' वर्तमानपत्र शाळेच्या पत्त्यावर मागवून परीक्षेचा पेपर बाजूला ठेवून, प्रथम 'केसरी' चाळून घेतल्यामुळें मुख्याध्यापकाच्या मर्जीतून मी उतरलों होतों. त्याशिवाय माझा दुसरा अपराध म्हणजे इतिहासाचा वर्ग चालू असतांना मी वर्गांतून बाहेर निघून गेलों. मी बाहेर जात असलेला पाहून मुख्याध्यापकांनीं मला विचारलें, "कोठें चाललास ? आणि कां ?"

"आपण फक्त इतिहासांतील पानें वाचीत आहांत, एवढें मला घरीं देखील करतां येईल. आपण अन्य माहितीची कांहीं भर घालून नवीन शिकवीत नाहीं. व्यर्थ वेळ येथें घालविण्यापेक्षां मी बाहेर जाऊन वेळेचा अधिक सदुपयोग करूं शकेन." असें उत्तर देऊन मी बाहेर निघूनच गेलों.

तिसराहि एक अपराध माझ्याकडून झाला होता. आमचे मुख्याध्यापक आठवड्यांतून दोन दिवस वर्गामध्यें 'इंग्रजी शुद्धलेखन' घालीत असत. लहान पोरासारखें 'शुद्धलेखन' लिहून तें तपासून घेण्याची आम्हा मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांना लाज वाटत असे. या शुद्धलेखनांत ज्या चुका होत असत तेवढे शब्द दहादहा वेळां पुन्हा लिहून आणावे लागत; म्हणून आम्ही कांहीं विद्यार्थ्यांनीं सह्या करून मुख्याध्यापकांना विनंती केली होती कीं ही 'इंग्रजी शुद्धलेखन' घालण्याची प्रथा

बंद केली जावी. पण आमच्या त्या विनंतीला उत्तर म्हणून मुख्याध्यापकांनीं शुद्धलेखनाचे दिवस आठवड्यांतून दोन ऐवजी तीन केले. अधिक सह्या गोळा करून आम्ही विद्यार्थ्यांनीं पुनः तशीच पण अधिक कळकळीची प्रार्थना मुख्याध्यापकाकडे लिहून पाठविली. याचा परिणाम असा झाला कीं मुख्याध्यापकांनीं चार सहा ओळी इंग्रजी मजकूर 'शुद्धलेखन' म्हणून सांगण्याऐवजी लांब लांब स्पेलिंगचे इंग्रजी शब्दच केवळ 'शुद्धलेखन' म्हणून घालण्यास प्रारंभ केला. अर्थात् शुद्धलेखनांतील आमच्या चुका बेहद्द वाढूं लागल्या व त्याच प्रमाणांत चुकीचे शब्द दहादहा वेळां लिहून आणण्याचें काम अधिक वाढलें. याबरोबरच 'पुनः असें पत्र आल्यास पहिल्या पांच सही करणाऱ्या विद्यार्थ्यांना शाळेंतून काढून टाकण्यांत येईल' अशी तंबीहि आम्हांला देण्यांत आली.

आम्ही कांहीं विद्यार्थ्यांनीं या समस्येचा विचार करून त्यावर एक तोड शोधून काढली व तोच अर्ज पुन्हा लिहून पाठविला. मात्र सह्या करण्यासाठीं एक वर्तुळ काढून त्याच्या त्रिज्यावर सह्या केल्या. हेतु एवढाच होता कीं मुख्याध्यापकाला पहिल्या पांच सह्या कोणत्या हें उमजतांच येऊं नये. या अर्जाचा कांहीं उपयोग झाला नाहीं हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. या सर्व भानगडीच्या बुडाशीं 'हा पुंडलीक कारागडे आहे', हें मुख्याध्यापकांनीं ताडलें होतें आणि तें उघडें गुपितहि होतें.

अशा पार्श्वभूमिकेवर, परीक्षेचा पेपर बाजूला ठेवून माझें 'केसरी' पत्र वाचण्याच्या अपराधाचें प्रकरण झालें. प्रथम मला ताकीद देण्यांत आली. माझा स्वाभिमान डिवचला. त्या अभिनिवेशांत मी माझें 'विक्लिन्सचा अलजिब्रा' हें पुस्तक विकलें आणि त्या पैशानें 'केसरीचा अंक' मुख्याध्यापकाच्या मुलाच्या नांवानेंच शाळेच्या पत्त्यावर मागवून मी त्या ताकिदीला उत्तर दिलें. अर्थात् मला शाळेंतून काढून टाकण्यांत आलें.

याच सुमारास राष्ट्रीय कीर्तनकार ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन यांनीं लोकमान्यांच्या आज्ञेनुसार कीर्तनें करण्यास प्रारंभ केला होता. त्यांच्याबरोबर मी बेळगांवला आलों. त्या काळची सर्व माहिती मी माझ्या 'पुंडलीक' पुस्तकामध्यें दिलेली आहे. त्याचा पुनरुच्चार किंवा द्विरुक्ति मी येथें करीत नाहीं.

इ. स. १९१४ पासून दोन वर्षें मी गुरुवर्य दे. भ. गंगाधरराव देशपांडे यांच्याबरोबर ते करीत असलेल्या चळवळीमध्यें पडतील तीं कामें करीत होतों. आज नाहीं उद्यां माझ्या धीटपणाची खात्री पटल्यावर ते मला बॉंब करण्याची कला शिकवतील या सुखस्वप्नामध्यें मी मस्त होऊन राहिलों होतों. मध्यंतरीं त्यांच्याबरोबर एकदां भांडून मीं त्यांचा निरोप घेतला आणि पुनः शिक्षण घेण्यासाठीं मी पुण्यास निघून गेलों. परंतु शाळेंतून मला काढून टाकलेलें असल्यामुळें पुण्याच्या शाळेंत प्रवेश मिळणें सोपें नव्हतें. मिरजेच्या शाळेंतून **Good Conduct** व **School Leaving Certificate** मिळवल्याशिवाय कोठल्याच शाळेंत नांव दाखल

करणें शक्य नव्हतें. हें माहीत असल्यानें काशीस जाऊन नांव बदलून तेथेंच शिक्षण घ्यावें असा विचार करून मी तोहि प्रयत्न करून पाहिला. पण मला तें जमलें नाहीं. म्हणून पुनः मी बेळगांवासच परत आलों. त्या सुमारास म. गांधींनीं चंपारण्यामध्यें (बिहार) सत्याग्रह करून एक आंदोलन सुरू केलें होतें. त्यासाठीं मी गांधीजींच्या अनुज्ञेप्रमाणें चंपारण्य येथें गेलों. त्याची हकीगत माझ्या 'पुंडलीक' पुस्तकांत येऊन गेलेलीच आहे. तेथें गेल्यावर बिहार सरकारनें Defence of India Act प्रमाणें मला बिहारमधून हद्दपार केलें. म्हणून मी साबरमती आश्रमामध्यें गांधींच्याकडे राहूं लागलों. त्यांच्या आश्रमांतील शिक्षणाच्या सर्व कार्यक्रमांतून मी तावूनसुलाखून निघालों व बेळगांवला परत आलों. बेळगांवला परत येतांना मी साबरमतीपासून मुंबईपर्यंत पायीं प्रवास करीत आलों. तो सर्व इतिहासहि वाचकांनीं 'पुंडलिक'मध्यें वाचला असेल. बेळगांवास आल्यानंतर कै. गु. सदाशिव लक्ष्मण तथा बाबासाहेब सोमण यांच्या हवालीं मला गंगाधरराव देशपांडे यांनीं केलें. पण माझी शिकण्याची हौस व उमेद जबरदस्त आहे हें पाहून बाबासाहेब सोमण मला रोज दोनतीन तास स्वतः शिकवीत असत. त्याच सुमारास लोकमान्य टिळकांचें 'गीतारहस्य' प्रसिद्ध होण्याच्या मार्गांत होतें. मॅझिनीचीं पुस्तकें व वीर सावरकरांचीं पुस्तके कै. बाबासाहेब सोमण माझ्याकडून वाचवून घेत असत; नव्हे, स्वतः बाबासाहेब सोमण जणुं माझ्याबरोबरच अभ्यास करीत आहेत असें वाटण्याइतकें त्या पुस्तकांचें बारकाईनें वाचन होत असे. ती. गंगाधरराव हे सुद्धां मला मि. थॉमस पेनचें Rights Of Man हें पुस्तक शिकवीत असत. 'गीतारहस्या'चे छापील फॉर्म्स, छापून होतील तसतसे, दे. भ. गंगाधरराव यांच्याकडे लोकमान्यांच्याकडून येऊं लागले. त्याचें वाचन गु. गंगाधरराव, बाबासाहेब व स्वामी आनंद हे तिघे मिळून करीत असत. पण वाचकाचें काम माझ्याकडेच असे. तो विषय नीट समजावा म्हणून गु. बाबासाहेबांनीं मला 'भगवद्गीता' शिकविली. त्यावरील अनेक आचार्यांची संस्कृत टीकाहि त्यांनीं माझ्याकडून वाचवून घेतली. त्यानंतर दशोपनिषदेंहि आम्ही दोघांनीं मिळून वाचलीं. आणि त्याबरोबरच त्यावरील आचार्यांचीं भाष्येंहि अभ्यासावीं लागलीं. याच काळामध्यें 'राष्ट्रीय शिक्षणाची लाट, 'गांधीजींच्या असहकारितेच्या आंदोलनामध्यें अखिल भारतांत उसळलेली होती. देशामध्यें ठिकठिकाणीं राष्ट्रीय शाळा स्थापन केल्या जाऊं लागल्या होत्या. बेळगांवांतहि टिळकवाडीमध्यें एक राष्ट्रीय शाळा स्थापण्यांत आली होती. त्या राष्ट्रीय शाळेचे मुख्याध्यापक म्हणून कै. श्री. बाबासाहेब सोमण काम करीत असत. त्या शाळेंत आपल्याबरोबर शिक्षक म्हणून काम करण्यासाठीं त्यांनीं मला घेतलें. सर्व शिक्षक केवळ आपल्या गरजेपुरतेंच वेतन घेत असत आणि मला गरजच नसल्यामुळें मी मुळींच वेतन घेत नसें. या राष्ट्रीय शाळेला जोडून एक आश्रमहि काढण्यांत आला होता. तो आश्रम मी चालवीत असें. या आश्रमांत सुमारें ३५ कार्यकर्ते रहात असत. मी गांधीजींच्या

साबरमती आश्रमांतील शिक्षणक्रम संपवून आलेला असल्यामुळें मला त्या आश्रमाचे प्रमुख म्हणून नेमण्यांत आलें होतें. या आश्रमामध्यें गु. गंगाधररावांनीं दोन तरुण माझ्याकडे पाठविले. श्री. रामचंद्र व्यंकटेश वडवी व भारत सचारी गोसावी हेच ते दोन तरुण होत.

हुदली येथील विधायक कार्यक्रमाशीं श्री. वडवी यांचा अत्यंत घनिष्ट संबंध होता. किंबहुना आम्ही दोघे हुदली येथील विधायक कार्यक्रमाच्या दृष्टीनें एकमेकांना पूरक होतों. म्हणून त्यांची थोडी विस्तृत माहिती यथास्थान देण्यांत येईल.

२.

## असहकारितेची चळवळ व शाळा-कॉलेजांचा बहिष्कार

लोकमान्यांच्या देहावसानानंतर स्वातंत्र्याच्या चळवळीचें नियाण महात्मा गांधींनी आपल्या हातीं घेतलें आणि अहिंसात्मक चळवळीचे नगारे वाजूं लागले. त्यांत शाळाकॉलेजांचा बहिष्कार हाहि एक कार्यक्रम होता. त्यासाठीं मुंबईमध्यें विद्यार्थ्यांच्या प्रचंड सभेमध्यें अनेक अखिल भारतीय पुढाऱ्यांचीं भाषणें झालीं. परंतु कोणाच्याहि आवाहनाला विद्यार्थ्यांमधून साद मिळेना! शेवटीं कै. गु. गंगाधररावांनीं आपल्या वक्तृत्वाची सर्व शक्ति वापरून विद्यार्थ्यांना शाळाकॉलेजें ओस पाडण्यासाठीं कळकळीनें भाषण केलें. त्यांनीं राष्ट्रकार्यांत पडून आपला भारत स्वतंत्र करण्याचें आवाहन केलें. तेव्हां एवढ्या मोठ्या प्रचंड विद्यार्थी मेळाव्यांतून फक्त एकच हात वर झालेला दिसून आला. या हात वर करणाऱ्या विद्यार्थ्याचें नांव श्री. पुरोहित असें होतें. कर्नाटकाच्या पुढाऱ्यानें इतक्या कळकळीनें आवाहन केल्यानंतर एकहि विद्यार्थी पुढें येत नाहीं हे पाहून कर्नाटकाच्या नांवासाठीं म्हणून या विद्यार्थ्यानें आपला हात वर केला होता. या घटनेवर Times of India मध्यें उपहासात्मक टीका आलेली होती. 'लोकमान्यांचे उजवे हात, महात्माजींच्या प्रभावळींतील एक अग्रणी, कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे यांच्या आवाहनाला ओ देणारा एक विद्यार्थी निघाला!' अशा आशयाची ती टीका होती. या टीकेला सक्रिय उत्तर दिलें पाहिजे या उद्देशानें केसरीनें श्री. दा. वि. गोखले यांना गंगाधररावांच्या मदतीला मुंबईस पाठवून दिलें. गंगाधरराव देशपांडे, शंकरलाल बँकर, आचार्य गिडवानी, व श्री. दा. वि. गोखले यांनीं मुंबईतील मारवाडी विद्यालयांत व इतर अनेक महाविद्यालयांतून व्याख्यानांची झोड उठविली आणि शाळाकॉलेजें ओस पाडण्यांत यश संपादून दाखविलें. या असहकारी विद्यार्थ्यांना कांहीं काळ ट्रेनिंग देण्यासाठीं अंधेरी येथें 'साधकाश्रम' संस्था स्थापन करण्यांत आली. या आश्रमाचे प्रिन्सिपल किंवा आचार्य म्हणून बडोद्याचे कॅ. केशवराव देशपांडे तथा 'साहेब' यांना नियुक्त करण्यामध्यें

गंगाधरराव देशपांडे यांना यश संपादतां आलें. मी चंपारण्यांत काम केलेला, साबरमती आश्रमांत शिक्षण घेतलेला, साबरमती ते मुंबई असा पायीं प्रवास केलेला, बेळगांवच्या राष्ट्रीय शाळेंत शिक्षकाचें काम केलेला, बेळगांवचा स्वराज्याश्रम चालवीत असलेला आणि कांहीं काळ गांधींच्या सांनिध्यांत राहिलेला म्हणून माझ्याकडे या 'साधकाश्रमांत' व्यवस्थापकाची जागा देण्यांत आली. या आश्रमाचा इत्थंभूत इतिहास देण्याचें हें स्थळ नव्हे. हा आश्रम विसर्जित झाल्यानंतर मी पुनः बेळगांवास आलों.

यावेळीं गांधीजींनीं 'पुनः खेड्याकडे चला'चें आंदोलन सुरू केलें होतें; त्याप्रमाणें गांधीजींच्या प्रभावळींतील बहुतेक पुढाऱ्यांनीं आपलीं तोंडें खेड्यांकडे वळविलीं होतीं. स्वतः गंगाधररावांनीं आपल्या हुदली नांवाच्या खेड्यामध्यें आठवड्यांतून दोनतीन वेळां जा-ये करण्यास प्रारंभ केला होता. त्यांच्याबरोबर मीहि त्या खेड्यामध्यें व पुढें त्यांच्या 'कुमरी' नांवाच्या मळ्यामध्यें रहावयास जात होतों. बेळगांवांत राष्ट्रीय शाळा, स्वराज्याश्रम यांचें काम पाहात असतांहि मी मधूनमधून हुदलीस जात येत असें. खेड्यामध्यें राहणें मलाहि आवडत नव्हतें. गंगाधररावांच्याबरोबर भारतभर फिरावें, सभासंमेलनें पाहावींत, व्याख्यानें ऐकावींत व थोरामोठ्यांच्या चर्चा सतत कानांवर येऊं द्याव्यात वगैरे गोष्टी मनापासून आवडत. ही आवड खेड्यांत जाऊन राहण्यांत त्यावेळी तरी सफल होत नव्हती. एवढेंच नव्हे तर तें तसें राहणें म्हणजे माझ्या शक्तीचा, विचारांचा व आयुष्याचा दुरुपयोग आहे, असेंच मला वाटत असे.

याच सुमारास गांधीजींच्या तत्त्वज्ञानाला व चळवळीला विरोध महाराष्ट्रांत सुरू झालेला होता. अर्थात् या विरोधाचें धुरीणत्व 'केसरी'कडे आलें होतें. गंगाधरराव, कृ. प्र. खाडीलकर, शि. म. परांजपे व वासुकाका जोशी यांच्यासारखे कांहीं मोजके पुढारी सोडल्यास टिळकपक्षांतील बहुतेक सर्व लहानथोर कार्यकर्ते व पुढारी या 'केसरी' पक्षाचेच होते. मीहि मनानें 'केसरी' पक्षाचाच होतों. परंतु गंगाधरराव यांच्या दडपणामुळें माझी मुसकटदाबी होत होती. रोज खाजगी चर्चेमध्यें माझे गंगाधररावांच्या बरोबर खटके उडत असत. पण आम्ही दोघेहि एकमेकांपासून दूर जाऊं इच्छीत नव्हतों, इतकी आपुलकी आम्हां दोघांनाहि वाटत होती. माझ्यापासून फुटून हा मुलगा कोठें दूर गेल्यास त्याच्या आयुष्याचें नुकसान होईल असें गंगाधररावांना वाटे, तर इतका चांगला पुढारी मला तरी दुसरा कोण आणि कोठें मिळणार, असें मला वाटत होतें. आम्हा दोघांचींहि मतें अनुभवानें बदलतील व आम्ही पूर्वीप्रमाणें एकमताचे होऊं, असा विचार आम्ही दोघे आपापल्या मनांत करीत होतों. अशा स्थितींत दोनतीन वर्षें सहज निघून गेलीं. हा काळ आम्हा दोघांनाहि अत्यंत कष्टाचा गेला.

३.

## हुदलीमध्यें माझे संबंध वाढूं लागले

या अवधींत आमच्या हुदलीच्या यात्रा अधिकाधिक वाढूं लागल्या. आम्ही अधिक काळ हुदलीमध्यें राहूं लागलों वेळगांवांत काम नसेल त्यावेळीं आम्ही दोघे हुदलीस जाऊन राहात होतों, त्याच्याऐवजीं आतां नेहमींच हुदलीस राहूं लागलों व जरूर पडेल तेव्हांच बेळगांवास येऊं लागलों. वैचारिक दृष्टीनें खेडें व खेड्यांतील काम हें 'राजकारण' आहे किंवा स्वातंत्र्याच्या लढ्यांतील एक आवश्यक भाग आहे, हेंच मुळीं मला मान्य नव्हतें. त्या काळीं गंगाधररावांची भारतभर फिरती व दौरे अधिक होत असल्यामुळें, त्यांच्या कार्याचें मुख्य ठिकाण, 'हुदली' हेंच होऊं पहात होतें, तरीहि त्यांचा बराच काळ हुदलीबाहेरच जात असे. त्यामुळें माझा खेड्यांतील कामाचा तिरस्कार मर्यादेमध्यें राहूं शकला होता; आणि गंगाधररावांच्या हुदली येथील 'कुमरी' नांवाच्या मळ्यामध्यें एक घरच कायमचें ठेवण्यांत आलें. आम्हांपैकीं कोणीच तेथें नसलें तरी आचाऱ्यानें स्वयंपाक करून आराम जेवण करून राहावें, अशी व्यवस्था होती.

कित्येक तरुण विद्यार्थ्यांना आपल्याजवळ ठेवून घेऊन त्यांना देशसेवेची दीक्षा द्यावी व त्यांना राष्ट्रकार्याला जुंपावें हा गंगाधररावांना एक नादच होता. गेल्या पिढींतील कर्नाटकांतील बहुतेक कार्यकर्ते, विधायक क्षेत्रांतील कॉंग्रेस कार्यकर्ते आणि महाराष्ट्रांतील पुष्कळसे कर्ते पुढारी गंगाधररावांच्या जवळ राहून, त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन गेलेले आहेत. त्या सर्वांची यादी व माहिती देत बसण्याचें हें स्थळ नसल्यामुळें मी तो मोह आवरता घेतों. महाराष्ट्राचे एकेकाळचे पुढारी श्री. शंकरराव देव आणि प्रसिद्ध हरिजन सेवक श्री. काकासाहेब कारखानीस यांनाहि गंगाधररावांच्या सहवासाचा लाभ मिळालेला आहे. पण माझ्याप्रमाणेंच गंगाधररावांच्या जवळ कायमचे राहून त्यांच्या सर्व कामांत–खाजगी व सार्वजनिक—आणि अनेक राष्ट्रीय चळवळींमध्यें जन्मभर भाग घेत आलेले व हुदलीमध्येंच राहिलेले श्री. रामचंद्र व्यंकटेश वडवी यांची थोडी विस्तृत माहिती या ठिकाणीं देणें आवश्यक आहे.

४.

## रा. रामचंद्र व्यंकटेश वडवी

श्री. वडवी यांच्यामध्यें राष्ट्रकार्यांत पडण्याची व स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेण्याची हौस उपजत आहे. कानडी मराठी वादाच्या धुळवडीमध्यें, गंगाधरराव आपलें भाषण कानडीमध्यें करीत नाहींत या रागानें धारवाडच्या जाहीर सभेंत गंगाधररावांच्या दिशेनें दगडफेक करणाऱ्यांपैकीं हा एक विद्यार्थी होता; तो पुढें घरांतून पळून गेला, तो गांधींच्या साबरमती आश्रमांत पोचला. त्यांच्या आश्रमांतील शिक्षण घेतल्यानंतर त्याला 'नवजीवन' छापखान्यांत कामावर पाठविण्यांत आलें होतें. 'नवजीवन'चे अंक रस्त्यांत फिरून विकून त्यापासून येणाऱ्या कमिशनमध्यें जें कांही मिळेल त्यावरच त्यांनीं कित्येक दिवस गुजारा केला आहे, केवळ चुरमुरे फुटाण्याचे फाके मारून कित्येक रात्रीं आपली भूक शमविली आहे. कांहीं काळ गुजराथ विद्यापीठामध्यें पू. श्री काकासाहेब कालेलकर यांच्याकडे राहून, त्यांनीं संस्कार व प्रेरणा घेतली आहे. सुमारें वीस बावीस वर्षें त्यांनीं गंगाधररावांच्या सांनिध्यांत हुदली येथें राहून, विधायक कार्यामध्यें फारच कष्ट केलेले आहेत. स्वतंत्र वेगळ्या गांवामध्यें एकट्यानें राहून भागोजीकोप येथें खादी वातावरण उत्पन्न करून दाखविलेलें आहे. कर्नाटक चरखासंघाचा चिटणीस म्हणूनहि त्यांनीं यशस्वी रीतीनें कार्य केलेलें आहे. साक्षरताप्रसार, खादीकाम, घेरडसेवा, प्रौढशिक्षण इत्यादि क्षेत्रांमध्यें त्यांनीं केलेली कामगिरी लहान नाहीं. कानडी लेखक व अनुवादक म्हणूनहि त्यांनीं नांव कमाविलेलें आहे. 'महादेवभाईंची डायरी' (पहिला भाग-पृ. ६००), दादा धर्माधिकारी यांचें 'सर्वोदय दर्शन' (पृ. ३५०), महात्माजींचे 'मंगल प्रभात' आदि पुस्तकांचा अनुवाद त्यांनीं कानडीमध्यें केलेला आहे. म्हैसूर सरकारानेंहि या पुस्तकाना योग्य ते पारितोषिक देऊन त्यांच्या कन्नड सेवेचा गौरव केलेला आहे. 'कुरुडर कण्णु' (आंधळ्यांचा डोळा) या नांवाचें स्वतंत्र पुस्तकहि त्यांनीं साक्षरताप्रसारासाठीं लिहिलेलें आहे. खादीप्रचारार्थ सूत कातण्यापासून खादी तयार करण्यापर्यंत सर्व प्रक्रियेचें ज्ञान करून देणारी एक पुस्तिका 'बडवर

भाग्य' (गरीबांचा भाग्योदय) श्री वडवी यांनीं लिहिलेलें आहे. खेड्यांतील प्राथमिक शाळांसाठीं गांधीजीवनावरील फलकहि त्यांनीं तयार केले आहेत. अशा बहुविध वाङ्मयीन व शैक्षणिक चळवळी करीत करीत स्वातंत्र्याच्या सर्व चळवळींमध्यें त्यांनीं मुबलक तुरुंगवास सहन केला आहे. भूमिगत कार्यकर्ता या नात्यानेंहि ब्रिटिश सरकारला दोन वर्षे (इ. स. १९४२–४४) त्यांनीं दाद दिली नाहीं.

विनोबाजींच्या भूदानयज्ञामध्येंहि त्यांनीं कर्नाटकांत भरपूर काम केलें आहे.. स. १९४४ च्या मे मध्यें त्यांना अटक झाली. एक वर्ष नऊ महिने ते भूमिगत होते. त्यांना पकडल्यावर ५० रुपये दंड अगर दोन महिने कारावास अशी शिक्षा त्यांना झाली. बाहेर राहून इतक्या भानगडी करूनहि त्यांना इतकी थोडी शिक्षा झाल्याबद्दल आम्हां सर्वांना आश्चर्य वाटलें व हेवाहि वाटला! श्री. वडवी यांजवर आक्षेपार्ह पत्रक बदल बाळगल्याबद्दलच्या आरोपावरून पोलिसांनीं खटला भरला होता. त्यांचा खटला सिटी मॅजिस्ट्रेट श्री. वेलंगी यांच्यापुढें चालला होता. या खटल्यासाठीं श्री. वडवी यांना जेलमधून कोर्टांत आणतांना पोलीसांनीं त्यांच्या हातांत बेड्या ठोकल्या, दंडाला दोऱ्या बांधल्या; या अपमानकारक प्रकाराच्या निषेधार्थ श्री. वडवी यांनीं पोलीस व्हॅनमध्यें बसण्याचें नाकारलें. तेव्हां त्यांना पोलिसांनीं उचलून व्हॅनमध्यें कोंबलें, कोर्टांतहि उचलून नेऊन ठेवलें. खटला सुनावणीच्या वेळेपर्यंत पोलिसांनीं त्यांना लघुशंकेसहि सोडलें नव्हतें. ही गोष्ट त्यांनीं मॅजिस्ट्रेटास कळविली, तेव्हां कोठें त्यांना ती परवानगी मिळाली. असे आमचे कार्यकुशल वडवी आज गांधीस्मारकनिधीच्या कर्नाटक शाखेचे मंत्री आहेत. हा त्यांचा त्रोटक इतिहास आहे.

गंगाधररावांच्या घरीं राहून त्यांच्याकडून प्रेरणा घेणारे सुमारें दोनअडीचशें तरी विद्यार्थी येऊन गेले असतील. त्यांतील कांहीं कार्यकर्ते मतभिन्नत्वामुळें त्यांचे कट्टर विरोधी बनले. त्यांचीं नांवें येथें देऊन जागा अडवीत नाहीं. पण या बहुतेकांच्या मनामध्यें गंगाधररावांच्याविषयींचा आदर कायम होता व आहेहि आणि गंगाधररावांच्या मनांतील त्यांच्याविषयींची आपुलकीहि शेवटपर्यंत कमी झालेली नव्हती. गंगाधररावांच्या स्वभावांतील तो एक स्थायीभावच होता. तोच त्यांचा जीवन-विशेष होता. त्यांच्या लोकसंग्रहांतील रहस्याचें एक वैशिष्ट्यहि त्यांत होतें. भिन्नमती गृहस्थाशीं स्नेह टिकविणें हा त्यांचा गुण असामान्य होता.

५.

## कानडी भाषेची माझी अडचण

माझी मातृभाषा मराठी असून मला कानडी मुळींच येत नव्हतें. ही अडचण आमचे मित्र श्री. वडवी यांच्या मदतीनें पुष्कळच दूर होत असे. आपल्याला येईल तसें मोडकेंतोडकें कानडी बोलत जावें म्हणजे आपोआप ती भाषा आत्मसात् होत जाते, असें म्हणतात. तेव्हां अशा प्रकारें कानडी भाषा बोलण्याच्या प्रयत्नांत माझ्या हातून कित्येक गमती झालेल्या आहेत. त्या सर्व या ठिकाणीं मी देत बसेन तर त्याचाच एक मोठा ग्रंथ होईल. आम्ही सर्व कार्यकर्ते मिळून ज्या मळ्यामध्यें रहात होतों, आश्रमांत काम करीत होतों—तेथील रयताची एक मुलगी लग्न होऊन आपल्या सासरीं गेली. ती बरेच दिवसांनंतर माहेरीं परत आली होती. आम्ही कांहीं कार्यकर्ते विहिरीमध्यें पोहून आश्रमाकडे परत निघालों होतों. ती रयतांची मुलगी आपल्या घरच्या इतर कांहीं स्त्रियांबरोबर विहिरीवरून पाणी आणण्यासाठीं चालली होती. त्या मुलीला पाहतांच माझ्या मोडक्यातोडक्या कानडी भाषेंत मी विचारलें, 'तूं इकडे काल रात्रींच सासरकडून आलीस काय?" या मराठी आशयाच्या मी बोललेल्या कानडी वाक्याचा अर्थ मलाच होत होता. माझ्याबरोबर असलेले सर्व कार्यकर्ते आणि त्या मुलीबरोबर असलेल्या सर्व स्त्रिया माझा तो प्रश्न ऐकून स्तिमित झाल्या. मला कानडी समजत नाहीं व बोलतां येत नाहीं, ही गोष्ट त्या मुलीला माहीत होती. माझ्या प्रश्नाचा रोख व संदर्भ जाणून तिनें झटकन् मला उत्तर दिलें कीं, 'मी सासरहून कालच आलें आहें.' ती मुलगी व स्त्रिया तशाच विहिरीकडे गेल्या आणि आम्ही सर्वजण आपल्या वाटेनें पुढें गेलों. कांहीं अंतर चालून गेल्यावर माझ्याबरोबर असलेल्या कार्यकर्त्यांनी मला हंसत हंसत विचारलें, 'काय पुंडलीकजी, त्या मुलीला तुम्ही काय प्रश्न केलात तो?' मी म्हणालों, 'सासरहून केव्हां आलीस?' असा माझा प्रश्न होता व त्याला उत्तरहि तिनें बरोबर अपेक्षेप्रमाणेंच दिलें आहे. कार्यकर्त्यांमध्यें माझ्या प्रश्नाचा तो पुनरुच्चार ऐकून प्रचंड हंशा पिकला. आतां मी

स्तिमित झाले. त्यांतील एकजण मग म्हणाला, 'अहो, तुम्ही विचारलेल्या कानडी प्रश्नाचा अर्थ 'तूं माझ्याकडे रात्रीं केव्हां येतोस?' असा होतो. तेव्हां माझी चूक व भाषेचें अज्ञान मला समजून आलें. प्रश्नांतील चूक मी दुरुस्त करून घेतली.

ज्यांची भाषा मला समजत नव्हती आणि ज्या भाषेमध्यें मी माझे विचार सुबोधपणें प्रगट करूं शकत नव्हतों, अशा कन्नड जनतेची सेवा करण्याचें भाग्य माझ्या वांट्यास आलेलें होतें; तें यथाशक्ति मी रेटीत होतों. कांहीं कालानंतर मला कन्नड समजूं लागलें. माझ्या मराठाळलेल्या कानडी भाषेंतच जाहीर सभांतूनहि मी बोलूं लागलों. इ. स. १९३० च्या आंदोलनामध्यें हिंडलगा तुरुंगामध्यें पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांच्या सहवासांत राहाण्याची संधी मला मिळाली. त्यावेळीं काकासाहेबांनीं मला कानडी भाषेचा अभ्यास करण्यास जवळजवळ भागच पाडलें. हावेरीचे श्री. सिद्दाप्पा होसमनी मला त्यावेळीं तुरुंगांत कानडी शिकवीत असत. कन्नड व्याकरणाची सामान्य कल्पना आल्यानंतर माझ्या चुका मला समजूं लागल्या आणि यामुळेंच मी पूर्वीइतक्या निर्भयतेनें कानडी बोलण्याचें धैर्य करूं शकेनासा झालों. माझ्या वांट्याला या जन्मीं तरी कानडी जनतेमध्येंच लोकसेवा करण्याचें भाग्य अगदीं अटळ आहे, असें मला स्पष्ट दिसून आल्यानंतर मी कन्नडभाषेचें कामचलाऊ ज्ञान करून घेतलें. तेंच पुढें त्या भाषेचा सतत वापर आणि परिचय यामुळें थोडें अधिक वाढलेलें आहे इतकेंच.

## ६.

## हुदलींतील ग्रामसेवेचा प्रारंभ हरिजनसेवेपासून

कै. गु. गंगाधररावांनीं हुदलीमध्यें कायमचें राहावयास जाण्याचें अंगवळणीं पाडून घेण्यास पूर्ण ५।६ वर्षें तरी घेतलीं. त्यांनाहि प्रथम प्रथम खेड्यांत तितकेसें गमत नसे. हुदलीमध्यें ग्रामसेवेचा प्रारंभ त्यांनीं हरिजनसेवेपासून केलेला आहे. त्यांनीं लहान मुलांच्या प्राथमिक शिक्षणासाठीं एक शाळा आपल्या हुदली गांवींच काढली. त्या शाळेंत स्पृश्य व अस्पृश्य अशा दोन्ही जातींच्या मुलांना घेतलें जाई. ही शाळा आमचे मित्र श्री. रामचंद्र व्यंकटेश वडवी चालवीत असत. ते बेळगांव जिल्हा किंवा तालुका यापैकीं कोणत्याहि ठिकाणचे रहिवासी नव्हेत. ते हुदलीचेहि नसल्यामुळें गांवांतील लोकवस्तीशीं त्यांची ओळख कमीच असे. शाळेंत कोणतीं मुलें येतात-जातात व तेथें कोण शिकवतात याकडे कोणाचें तसें बारीक लक्षहि नसे. श्री. वडवी यांना 'अस्पृश्य मास्तर' असेंच कांहीं काल म्हटलें जात होतें.

कै. गु. गंगाधररावांच्या मातोश्री व भगिनी यांना अस्पृश्यतानिवारणाची ही कॉंग्रेसची किंवा गांधीजींची चळवळ मान्य नव्हती. पण 'अण्णा' म्हणजे गंगाधरराव जें कांहीं करतील तें योग्य आणि बरोबरच करतील, व तें आपण स्वीकारलेंच पाहिजे एवढी मात्र त्यांची श्रद्धा असे. त्यामुळें त्या दोघींनींहि आपलीं मतें 'अण्णा'च्या मताशीं जुळवून घेतलीं होतीं. ही वृत्ती सुद्धां त्याकाळीं अत्यंत प्रगतीपरच होती. कारण गंगाधररावांनीं आपल्या घरच्या घोड्याची निगा राखण्यासाठीं एक हरिजन नोकर ठेवला. गंगाधररावांसाठीं कांहीं खाण्याचे पदार्थ गांवांतून आश्रमांत पाठवावयाचे झाल्यास ते तो हरिजन नोकरच घरून घेऊन जात असे. ही घटना थोड्याच दिवसांत त्यांच्या घरींदारीं दिसूं लागली. असो.

हुदलींतील ही हरिजन शाळा स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्या मुलांना शिकवून तयार करीत असतां, एका लिंगायत रयताचा मुलगा गंगाप्पा यमकनमर्डी कानडी शाळेंतील सहाव्या इयत्तेनंतर मुलकी परीक्षेच्या तयारीचा अभ्यास करीत होता. आपण

इंग्रजी शिकावें असें त्याला वाटूं लागलें. तो श्री. वडवी मास्तरांच्याकडे आला व त्यामुळेंच त्याचा संबंध आम्हां सर्वांशीं आला. ही शाळा दहा वर्षे अव्याहत चालली होती व तिचे लोकसंबंधहि वाढले होते. अखिल भारतामध्यें असहकारितेचें आंदोलन फोफावूं लागलें होतें. १९२४ ची कॉंग्रेस कर्नाटकांत व्हावयाची होती. कोणत्या गांवीं कॉंग्रेसचें अधिवेशन भरवावें याविषयीं कर्नाटकांत वादंग माजण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. महाराष्ट्रांत गांधीजींच्या विरुद्ध वातावरण पसरविण्याची जोराची मोहीम लोकमान्यांच्या अनुयायांनींच सुरू केली होती. कै. गु. गंगाधरराव यांच्याबरोबर मी देशभर फिरत असल्यामुळें, ही सर्व चर्चा व वादविवाद मला ऐकावयास मिळत असत.

याच सुमारास धारवार जिल्ह्याचे पुढारी व पुढें भूदानयज्ञ चळवळीचे निष्ठावंत नेते झालेले श्री. तिम्माप्पा नायक हे गांधीजींच्या साबरमती आश्रमांतील शिक्षण व संस्कार घेऊन हुदलीस कै. गु. गंगाधरराव यांच्या सहवासांत राहण्यासाठीं आलेले होते. त्यांच्याकडे ही हुदली गांवांतील हरिजन शाळा देण्यांत आली. श्री. वडवी यांच्यानंतर वर उल्लेख केलेल्या चि. गंगाप्पा बसवंताप्पा यमकनमर्डी यांचा संबंध श्री. तिम्माप्पा नायक यांच्याशीं आला. गांवांतील लोक रोज पाहातच होते कीं या हरिजन शाळेंत स्पृश्य व अस्पृश्य दोन्ही समाजांतील मुलें येत असत. गंगाधररावांचे खाण्याचे जिन्नस हरिजन नोकरच आश्रमामध्यें स्वतः नेत असे. परंतु गंगाधररावांचा गांवांत दरारा व वजन फार. शिवाय एक राष्ट्रीय पुढारी या नात्यानेंहि गांवांतील लोकांना गंगाधररावांच्या विषयीं नितांत आदर व अभिमान वाटत असे. पण आपल्या गांवांत गंगाधररावांमुळेंच राष्ट्रसेवेची गंगा वाहात आलेली आहे, याची जाणीव तेथील लोकांना त्यावेळीं विशेष नव्हती. अर्थात् या हरिजन शाळेमध्यें काय चाललें आहे याची चिंता किंवा उठाठेव करण्याची कल्पनाहि लोकांना नव्हती. श्री. तिम्माप्पा नायक मास्तर यांचा संबंध गांवांतील सामान्य जनतेशीं विशेष येत नव्हता. त्यांतहि ते परठिकाणचे असल्यामुळें त्यांच्या वागणुकीची किंवा विचारांची दखल घेण्याकडे लोकांनीं कधीं लक्षच दिलें नाहीं. श्री. नायक यांचें वर्तन एखाद्या तपस्वी साधूसारखें असे. त्यांच्यामध्यें असंग्रह बुद्धी उपजतच आहे. आणि गांधीजींच्या सहवासामुळें आणि त्यांच्या तत्वज्ञानानें प्रभावित झाल्यामुळें, ही असंग्रह बुद्धी पराकोटीला गेलेली होती. ते आपलें अन्न स्वतःच शिजवून घेत आणि चमचा दोन चमचे तूप गंगाधररावांच्या घरून रोजच्या रोज मागून आणीत. त्या तेवढ्याशा तुपासाठीं द्रोण घेऊन गंगाधररावांच्या घरीं अर्धा अर्धा तास ते वाट पाहात उभे असलेले मीं पाहिलेले आहेत. श्री. वडवी यांची स्थिति तशी नव्हती. ते लोकांमध्यें मिसळत असत. हरिजन शाळा चालवीत असतांना तर हा लोकसंपर्क त्यांनीं चांगलाच वाढवला होता. त्यांना स्वतःला व्यायामाची आवड व कुस्तीची हौस असल्यामुळें एखाद्या सराईत पैलवानासारखी त्यावेळीं त्यांची प्रकृति होती. त्या हरिजन शाळेला आतां श्री. तिम्माप्पा नायक हे दुसरे उत्तम शिक्षक मिळाल्यामुळें श्री. वडवी

यांना गंगाधररावांनीं आपल्याबरोबर भारतभर हिंडविण्यास व नंतर केवळ खादीच्या कामास लावून राष्ट्रसेवेचे संस्कार देण्यास प्रारंभ केला.

या सुमारास हुदली ग्रामामध्यें एक छोटीशी पण अत्यंत महत्त्वाची व गंभीर घटना घडून आली ती अशी. त्या काळीं स्पृश्य समाजाच्या रोमरोमांत अस्पृश्यता भिनलेली होती. गांवांतील कोणत्याहि विहिरीतील पाणी घेण्याची हरिजनांची छाती नव्हती. विहिरींतील पाणी ओढून तें हरिजनांना घालण्याचें पुण्यकर्म कोणी केलें तरच त्यांना पाणी मिळत असे. म्हणून कांहीं हरिजन जवळच्या ओढ्यामध्यें झरे काढून त्यांतील पाणी पिण्यासाठीं व इतर वापरासाठीं घेत असत. ओढ्यांतील त्या हरिजन झऱ्यावर मग इतर कोणी स्पृश्य जात नसत. त्या झऱ्याजवळच एका शेतामध्यें धान्याचें खळें तयार करण्याकरितां एका इसमानें त्या हरिजन झऱ्यांतील पाणी वापरलें. त्या रयताच्या मनांतून अस्पृश्यतेची भावना नष्ट झाली होती, असें नाहीं. पण 'पिण्यासाठीं मी कांहीं हें पाणी वापरीत नाहीं, खळ्याची जमीन करण्यासाठीं हें पाणी वापरण्यास काय हरकत आहे?' अशा भावनेनें व खळ्याच्या जागेपासून तो हरिजन-झरा जवळ होता एवढ्याचसाठीं त्यानें तें पाणी वापरलें होतें इतकेंच! पण त्या रयताच्या वाइटावर असलेल्या कांहीं लोकांनीं या पराचा कावळा बनविला व त्याला समाजांतून बहिष्कृत करण्याचा विचार केला व तसा घाटहि घातला. हा तंटा गांवच्या पंचांपुढें ठेवण्यांत आला. खळेवाल्या रयतानें आपली बाजू पंचांपुढें मांडली ती अशी—

"हरिजन झऱ्याचें पाणी मी फक्त खळ्याच्या जमिनीसाठीं वापरलें तर या काडीचा डोंगर करून माझ्या पाठीमागें हे लोक लागले आहेत. केवळ मी एक गरीब रयत आहें, म्हणून तुम्ही असें करतां काय? गांवचे धनी (गंगाधरराव देशपांडे) आपल्या घरीं हरिजन नोकर ठेवतात, त्यांच्यावर काय करायचें तें करा पाहूं! एवढें कशाला! त्यांनीं काढलेल्या हरिजन शाळेंत बसवतप्पाचा मुलगा गंगाप्पा यमकनमर्डी शिक्षकाचें काम करीत आहे; हरिजनांना शिवून तो खुशाल घरीं वावरतो, शिवतो व त्याच्या घरांतील सर्व धर्मकृत्यांना आपण सर्व हजर असतां, त्या गंगाप्पा यमकनमर्डीचें काय पारिपत्य करावें तें प्रथम करा व नंतर तीच शिक्षा मला करा." गंगाधररावांच्या खाजगी घरगुती बाबतींत समाज कांहीं करूं शकत नव्हता हें उघड होतें; पण गांवच्या पंचांनीं या गंगाप्पा यमकनमर्डीला जाब विचारण्याचें ठरविलें. त्याच्या घराण्यानें आपल्या मुलाला त्या शाळेमध्यें जाऊं देऊं नये किंवा घरांतून त्या मुलाला बाहेर काढावें. या दोन्हीपैकीं कांहींच झालें नाहीं तर गंगाप्पाच्या घराण्याला जातिबाह्य करण्यास समाजास भाग पाडावें, असा निर्णय पंचांनीं घेतला. गंगाप्पानें हरिजन शाळा सोडण्याचें मान्य केलें नाहीं आणि त्याच्या घरच्या लोकांनींहि त्याला म्हणजे आपल्या मुलाला बहिष्कृत करण्याचें मान्य केलें नाहीं. गंगाधररावांचें छत्र त्याच्या डोक्यावर आहे त्याला किंवा त्याच्या कुटुंबाला हुदलीगांवामध्यें बहिष्कृत

करण्याचें काम त्या काळांत इतकें सोपें नव्हतें. त्यामुळें लहानथोरांच्या तोंडीं हा एक गांवांतील महान चर्चेचा विषय होऊन बसला होता. गंगाप्पा किंवा त्यांचे कुटुंबांतील व्यक्ती कोणत्याहि धमकीला किंवा प्रलोभनाला बधत नाहीत ही गोष्ट गांवच्या पंचांना दिसून आली. तथापि गांवचे पंच म्हणून या कामीं आपली प्रतिष्ठा पणाला लागलेली आहे, असें पंचांना वाटत होतें. त्यांनीं आपसांत अनेक बैटकी घेतल्या. आणि शेवटीं ते या निर्णयाला आले कीं धन्यांना (गंगाधररावांना) सर्वांनीं मिळून सांगावें व ही हरिजन शाळाच बंद करवावी म्हणजे गंगाप्पाचा प्रश्नच आपोआप मिटल्यासारखा होईल. आणि खळ्यासाठीं कां होईना, हरिजन झऱ्याचें पाणी वापरणाऱ्या रयतेला थोडाबहुत दंड करावा. गांवांतील सर्व प्रमुख लोकांनाहि त्यावेळीं पंचांबरोबर हजर ठेवून एकमुखी मागणी गंगाधररावांच्याकडे करावी. गंगाधररावांच्या जमिनी वगैरे याच गांवांत असल्यामुळें सर्वांना नाखूष करण्याचा प्रसंग ते येऊं देणार नाहींत. ते फार हुषार आहेत, असें पंचांना वाटत होतें.

या प्रसंगानें आणखी एका गोष्टीचा उल्लेख येथें करणें अत्यंत उचित व क्रमप्राप्त आहे. गंगाधररावांची मातोश्री व भगिनी श्रीमती ताराक्का यांच्या मनामध्यें अस्पृश्यता न मानणें हा धार्मिक भ्रष्टाचार आहे, असें असलें तरी गंगाधररावांच्यासाठीं त्यांनीं अस्पृश्यता क्षणभर बाजूला सारलेली होती. त्यांना माहीत होतें कीं, या बाबतींत गंगाधरराव कधींच कच खाणार नाहींत किंवा टाकलेलें पाऊल मागें घेणार नाहींत. आपल्या 'अण्णांचा' म्हणजे गंगाधररावांचा शब्द कोठेंहि, विशेषतः हुदली गांवामध्यें खालीं पडतां कामा नये ही जिद्द किंवा हा आग्रह या दोघींच्याहि ठिकाणीं अगदीं मनापासून होता. त्यांनीं गंगाप्पाला घरीं बोलावून घेतलें व या वादांत तूं कच खाणार काय? माफी मागणार काय? हरिजन शाळा सोडणार काय? असें वारंवार विचारून त्याला पक्का बनविण्याच्या कामास या दोघींनीं प्रारंभ केला. गंगाप्पा किंवा त्याचे कुटुंबीय कोणीहि पुढें टाकलेलें पाऊल मागें घेणार नव्हतेच. त्यांत गंगाधररावांच्या आई-भगिनींनीं त्याला प्रोत्साहन देऊन, 'तूं भिऊं नकोस, अण्णा तुझ्या पाठीशीं आहेत. विचारपूर्वक तूं खंबीर रहा. सर्व गांव मिळून काय करतात तें पाहूं.' अशी भर घालण्याचा सपाटा चालविला होता. ही सर्व खळबळ गंगाधररावांना माहीत असली तरी ते आपण होऊन याची चौकशी करण्याच्या फंदांत पडले नाहींत. शेवटीं हें प्रकरण त्यांच्यावरच घसरणार आहे ही गोष्टहि ते जाणून होते. गांवांत या प्रकरणाची खूपच खळबळ चालू असली तरी गंगाधररावांच्यापुढें ती बोलून दाखविण्यास कोणीहि धजत नसत. तेरी भी चुप मेरी भी चुप असें दोन्ही बाजूनें चालूच होतें.

शेवटीं एक दिवस असा उजाडला कीं, गंगाधरराव बेळगांवहून हुदली ग्रामांत आले असतां त्यांना एका पंचानें निरोप कळविला कीं, उद्यां सकाळीं गावांतील देव (पंच) येथील प्रमुख लोकांना घेऊन आपल्या भेटीला येणार आहेत. 'ठीक आहे.' असें गंगाधररावांनीं सांगितलें व वेळहि निश्चित केली. आतां हा विषय

मुलांनाहि घसून शिक्षण घेतां येतें. स्पृश्यांच्या धार्मिक भ्रष्टाचारास आळा बसतो. स्पृश्य मुलांच्या बरोबरीनें अस्पृश्य मुलांना शिक्षण मिळाल्यामुळें तीं अधिक हुषार व चौकस होतात. या सर्व गोष्टी आपणाला कालांतरानें पटणारच आहेत. आज त्या पटत नसल्या आणि गंगाप्पा व त्याचे कुटुंबीय यांना समाजबहिष्कृत करविण्याचा पंचांचा निर्धारच असेल तर त्यांच्याबरोबर मलाहि बहिष्कृत करा. कारण पंचांच्या मताप्रमाणें त्यांच्याकडून जो अपराध होत आहे तोच अपराध किती तरी पटीनें आणि उत्कटत्वानें माझ्या हातून होत आहे. गंगाप्पा माझ्या मुलासारखाच आहे. आणि त्याच्या हातून कांहीं अपराध झाला आहे किंवा होत आहे, असें मला स्वतःला वाटत नाहीं. प्रत्येकानें आपल्या मनांत या गोष्टीचा व घटनेचा विचार करावा आणि मगच पंचांनीं आपला निर्णय घ्यावा."

सर्व पंच व उपस्थित लोक या भाषणानंतर कांहीं काळ स्वस्थ बसले व नंतर नमस्कार करून निघून गेले. त्यावेळीं तिथें अधिक चर्चा झाली नाहीं. पंचांची सभा पुन्हा होणार असें म्हणत म्हणत प्रत्येक वेळीं ती सभा पुढें ढकलली जाई. आणि पुनः या समस्येवर विचार करण्यासाठीं पंचहि कधीं एकत्र जमले नाहींत. अशा प्रकारें गांवामध्यें उठलेलें हें वादळ आपोआपच शांत झालें व हरिजन शाळा मात्र पूर्ववत् चालू राहिली.

या कामीं गंगाप्पा यमकनमर्डी यानें व त्यांच्या कुटुंबांतील माणसांनीं जो निर्धार व निश्चय दाखविला तो त्याकाळीं अपूर्वच होता एवढ्या एका धीटपणासाठींहि यमकनमर्डी कुटुंब स्तुतीस पात्र आहे यांत शंका नाहीं.

७.

## सार्वजनिक गणपति उत्सवाची प्रथा

कै. गु. गंगाधररावांच्या 'कुमरी' नांवाच्या मळ्यांत आमचें राहणें वाढूं लागल्यानंतर तेथें वेळ जात नसल्यामुळें मी बहुतेक रोज हुदली गांवामध्यें येत असें. ज्या कामांत मी हुदली गांवामध्यें अडकून पडणार नाहीं असें कांहीं नवीन काम सुरू करावें, ही इच्छा माझ्या मनांत होती. म्हणून त्या खेड्यांत सार्वजनिक गणेशोत्सव सुरू करावा आणि कर्नाटकांतील व महाराष्ट्रांतील नामवंत वक्ते व पुढारी यांना त्या निमित्तानें व्याख्यानास बोलवावें आणि होईल ती जनजागृति साधावी, असें गांवांतील प्रमुख मंडळींशीं विचारविनिमय करून आम्ही ठरविलें. कै. गु. गंगाधरराव या बाबतींत विरुद्ध होते. व्याख्यानें देण्याचा व ऐकण्याचा नाद-नव्हे चट-लागल्यामुळें हा विचार आपणास सुचला आहे असें त्यांचें म्हणणें होतें. तेव्हां ही कांहीं शंभर नंबरी देशसेवा किंवा देशभक्ति नव्हे, असें ते आम्हांला सांगत असत. त्यांच्या म्हणण्यामध्यें भरपूर सत्य होतें, असें आज आम्हांला दिसतें. तथापि गणेशोत्सवांतील दहा दिवसांच्या व्याख्यानांची जुळवाजुळव करून देण्यास ते मदतहि करीत असत. प्रतिवर्षींच्या गणेशोत्सवामध्यें गंगाधरराव स्वतः देखील एखादें व्याख्यान देत असत.

व्याख्यानास कोणास बोलवावें व कोणास बोलवूं नये याची जी चर्चा गंगाधरराव यांच्याशीं होत असे ती फारच उद्बोधक होत असे. तुमच्या दृष्टीनें लोकांना तुम्ही कांहीं समजावून देऊं इच्छितां किंवा नाहीं! लोकांना विशिष्ट विचारसरणीकडे वळविण्याची तुमची इच्छा व कल आहे किंवा नाहीं! त्याला अनुकूल विचार मांडणारे वक्तेच तुम्ही व्याख्यानासाठीं बोलविले पाहिजेत; दुसरी विचारसरणी कधीं ऐकूंच नये, घोड्याच्या डोळ्याला अंधेरी बांधतात तसें आपण वागावें असें माझें म्हणणें नाहीं. पण इतर अनेक विचारसरणींच्या प्रचारासाठीं वेळ व पैसा यांची अनुकूलता करून देण्याची जबाबदारी आपण कां घ्यावी! अशा आशयाचे विचार गुरुवर्य गंगाधररावांचे होते. डॉ. मुंजे, बॅ. जिना, डॉ. अंबेडकर, डॉ. हर्डीकर,

पू. काकासाहेब कालेलकर या सर्वांचीं व्याख्यानें आम्हीच गणपतिउत्सवांत करविलीं तर लोकांमध्यें कोणत्या विचारांचा प्रचार आम्ही केला? लोकांना आम्ही कोणतें मार्गदर्शन केलें? या सर्वांची मतप्रणाली परस्परांपासून भिन्न आहे. ती ऐकून जनतेला आम्ही कोणत्या दिशेनें नेणार? वगैरे गोष्टींचा विचार हीं गणपति उत्सवांतील व्याख्यानें ठरवितांना होत असे.

गणपति उत्सवांतील व्याख्यानसत्राच्या निमित्तानें लोकांना जाहीर सभेंत बसावें कसें, बोलावें कसें, प्रश्न केव्हां विचारावेत, आभार केव्हां व कसे मानावेत, यांचें ज्ञान चांगलें झालें. नाहींतर जाहीर सभेमध्यें लोक मध्येंच बोलत असत व कांहींतरी विचारीत असत. वक्त्यानें जर 'आपल्या हें ध्यानांत आलेंच असेल' अशी वाक्याची सुरुवात केली असेल तर पुढील भाग ऐकण्यापूर्वीच सभेंत एखादा मनुष्य उभा राहून मोठ्यानें विचारीत असे कीं, 'काय म्हणतां? कोणती गोष्ट? अजून आपण कांहीं सांगितलेलेंच नाहीं मग ध्यानांत काय यावयाचें?' वगैरे वगैरे. पण ही स्थिति दोन-तीन वर्षांतच संपूर्ण बदलून गेली. गंगाधररावांस भेटावयास येणाऱ्यांपैकीं कित्येकांचीं जाहीर भाषणें आम्ही गांवामध्यें करवीत असूं. एवढेंच नव्हे, तर कोणी पाहुणा गंगाधररावांच्याकडे आल्यास त्याचें जाहीर भाषण गांवामध्यें ठेवण्याचा प्रयत्न गांवांतील पंच व प्रमुख लोक करूं लागले होते. आपल्या गांवांतील कार्यक्रमाचा अहवाल वर्तमानपत्रामध्यें आलेला पाहणें लोकांना आवडूं लागलें होतें. गांवामध्यें कांहीं लोक कानडी वर्तमानपत्रेंहि मागवूं लागले होते. गेल्या ३०।३५ वर्षांमध्यें भारतांतील अखिल भारतीय ख्यातीचे बहुतेक सर्व पुढारी—पं. जवाहरलालजींशिवाय—हुदलीमध्यें येऊन गेलेले आहेत. केवळ गंगाधरराव हुदलीमध्यें राहूं लागल्यामुळेंच ही पर्वणी गांवांतील लोकांना साधतां आलेली आहे. बेळगांव जिल्ह्यांतील लहानथोर सर्व कॉंग्रेस कार्यकर्त्यांचें हुदली हें एक स्फूर्तिस्थान होऊन बसलें होतें. म. गांधीजी ज्या ज्या लहानथोर चळवळी करतील त्यांचे पडसाद हुदलीमध्यें गंगाधररावांच्या अस्तित्वामुळें सहाजिकपणेंच उठूं लागले. एकदां हा गणेशोत्सव हुदलीमध्यें सुरू झाला तो आजतागायत अव्याहतपणें गेलीं चाळीस वर्षें चालू आहे. त्यांतील कार्यक्रमांमध्यें कालानुसार चढउतार किंवा फरकहि होत आलेला आहे, तसा तो पुढेंहि होत राहील. बेळगांव शहर जवळच असल्यामुळें, तेथील गणेशोत्सवप्रसंगीं शहरांत ज्या प्रकारचे बदल किंवा स्थित्यंतरें होतील, त्याचें प्रतिबिंब हुदली येथील गणपति उत्सवांतहि दिसूं लागलें.

८.

## कुमरी खादी आश्रमाची स्थापना

कै. गु. गंगाधरराव देशपांडे यांनीं आपल्या 'कुमरी' नांवाच्या मळ्यात खादी आश्रमाची स्थापना सन १९२५ सालीं केली. मी मनानें या खादी आश्रमाच्या स्थापनेच्या विरुद्ध होतों. यांत 'राजकारण' आहे असें मला त्यावेळीं वाटत नव्हतें. 'तूं केसरी आफिसांत काम करण्यास जातोस काय?' असें चर्चेच्या भरांत चिडून गंगाधरराव मला नेहमीं विचारीत असत. हुदलीच्या आजूबाजूच्या खेड्यांमध्यें लोक पूर्वी चरख्यावर सूत कातीत असत. ती प्रथा तेव्हां अगदींच नष्ट झालेली नव्हती. कै. गु. गंगाधरराव रोज सकाळीं घोड्यावर बसून एखाद्या गांवांत जाऊन रयताच्या घरीं बसत असत आणि लोकांना खादीचा संदेश पोचवीत असत. त्या काळीं गंगाधरराव आपल्या घरीं येऊन बसतात, केव्हां तरी थोडें ताजें धारोष्ण दूधहि घेतात, घरच्या लहान मुलांशीं बोलतात या गोष्टीचें लोकांना कौतुक वाटत असे. आपापल्या घरच्या लोकांनीं काढलेलें सूत घेऊन तें गंगाधररावांना दाखविण्यास ८।१० मैलांवरून म्हाताऱ्या बायकाहि गंगाधररावांच्या खादी आश्रमापर्यंत येत असत. खास हुदली गांवांतील आपल्या रयताच्या लावणीपत्रांत शेतफाळ्याबरोबरच महिना अमुक इतक्या लड्या सूत दिलें पाहिजे असाहि उल्लेख ते करीत असत. वर्षाच्या शेवटीं या सर्व सुताचा हिशेब करून त्याची किंमत रयताच्या ठरलेल्या फाळ्यांतून उणी करवीत असत. कमी फाळा देणाऱ्या रयतांचें सूत इतकें जमा होई कीं त्याचा निम्मा फाळाच कमी होत असे. ज्या रयतांना सूत काढण्याची सवय किंवा चट लागली त्यांच्या लावणीपत्रांतून ती अट काढून टाकण्यांत येत असे. पण त्यानें आणलेलें सूत योग्य किंमतीनें खरीदलें जात असे. गांवांतील विणकर लोक हें हातसूत विणून देण्यासहि प्रथम प्रथम तयार नसत. त्या कामासाठीं त्यांना अधिक मजुरी दिली जात असे. पुढें कांहीं विणकरांनीं केवळ हातसुताचीच खादी विणण्याची प्रतिज्ञा घेतल्यासारखें केलें होतें. आस्ते आस्ते सरावानें व सवयीनें हातसुताची खादी विणण्याची विणकरांची सफाई

व सुबकता वाढूं लागली. हुदलीच्या खादीची विणाई खादी जगांत प्रसिद्धी पावली. विशेषतः धोतरें व लुगडीं हुदलीमध्यें विणलेलींच पेटेमध्यें लोकप्रिय होऊन बसलीं. मागणी वाढूं लागली. मागणीइतका पुरवठा आश्रमाकडून होत नव्हता. खादीचे दर कमी करण्याचे प्रयत्नहि चालू होते. खादीच्या उत्पादनाच्या कामीं प्रथम प्रथम ज्या अडचणी आल्या त्यांची नोंद मी येथें करीत बसेन तर तोच एक ग्रंथ होईल.

खादी विणतांना विणकर लोक ज्या युक्त्याप्रयुक्त्या करीत होते त्या सर्वांचें आकलनच आम्हा कार्यकर्त्यांना होत नसे. खादी विणली जात असतांना विणकरावर सारखी नजर राखणें अत्यंत आवश्यक होतें. दिवसांतून तीनचार वेळां तरी, काम चालू असतां मागाकडे जाऊन येण्याची सूचना कार्यकर्त्यांना देण्यांत आली होती. पण सर्वच कार्यकर्ते ती प्रामाणिकपणें अंमलांत आणीत असत असें नाहीं. त्यावेळीं विणाईचे दरहि प्रथम प्रथम फार होते. म्हणून विणकर लोक हातसुताची खादी विणण्याचें काम आतां सहजासहजीं सोडून देण्यासहि तयार नव्हते.

सुताची चोरी, खराब विणाई, गिरणीच्या सुताची भेसळ, अधिक विरळ विणाई, तुटलेलें सूत न सांधतांच विणाई करीत राहणें, कामांत आळस वगैरे दोष नाहींसे करण्यासाठीं, गंगाधररावांनीं विणकरांसाठीं आश्रमाला लागूनच दहा कुटुंबांसाठीं एक चाळ बांधविली. आणि विणकरांनीं सहकुटुंब आश्रमांतच रहावयास आलें पाहिजे असें ठरविलें. त्यांच्या मागांसाठींहि एक स्वतंत्र इमारत बांधविण्याचा त्यांनीं निर्णय घेतला.

या सर्व कामांत मी असलों तरी मनानें माझा त्याला विरोध होता हें यापूर्वीच मीं निवेदन केलें आहे. माग घालण्यासाठीं जे एक मोठें चौसोपी घर बांधावयाचें होतें, त्याचें माप घेण्यासाठीं गंगाधररावांनीं मला टेप धरण्यास सांगितलें होतें. त्यावेळीं या सर्व गोष्टींच्या विरुद्ध मी असल्यामुळें, माप घेण्यास टेप धरण्याचेंहि मीं नाकारलें होतें. तेव्हां एका रयताला बोलावून त्याच्या मदतीनें गंगाधररावांनीं, स्वतः मी समोर उभा असतांनाच, त्या जागेचें माप घेतलें. तथापि माझ्याविषयीं कोणत्याहि प्रकारचा गैरसमज त्यांनीं करून घेतला नाहीं. आश्रमापासून अर्धा फर्लांग दूर एका टेकडीवर एक स्वतंत्र झोपडी बांधून त्यांनीं मला दिली. मी आश्रमांत भोजन करीत असलों तरी त्या झोपडीमध्येंच राहात होतों. अशीं तीन वर्षे मीं काढलीं आहेत. माझा विरोध या कामीं असला तरी गंगाधररावांनीं चालविलेला आश्रम सुरळीत चालावा याची काळजीहि माझ्या मनांत होती. आश्रमामध्यें त्यावेळीं सुमारें तीस कार्यकर्ते होते. श्री. तिम्माप्पा नायक आश्रम चालवीत असत. तथापि कोणी कार्यकर्ता रुसला, कोणाचीं भांडणें झालीं किंवा आश्रमाच्या वेळापत्रकाप्रमाणें वेळेवर कामें होत नसलीं, तर त्यांत लक्ष घालून त्या वातावरणांत मी बदल घडवून आणीत असें. आश्रम न चालवितां, मनानें त्याचा विरोध असूनहि आश्रमाची चिंता अहर्निश वाहणारा एक प्राणी या नात्यानें मी माझ्या त्या झोपडीमध्यें राहात असें. या तीन-चार वर्षांच्या काळांत मी बरेंच वाचन करूं शकलों. टिळक, केळकर, वामन मल्हार

यांचें लिखाण मीं वाचून काढलें. याच काळांत मी दशोपनिषदें पाठ केलीं. गीतारहस्याचा नीट अभ्यास केला. गीतारहस्यावरील टीका अभ्यासिल्या. 'हा सर्व अभ्यास व्याख्यानें व प्रवचनें देण्यासाठींच तूं करीत असल्यामुळें त्यापासून होणारा खरा फायदा तुला घेतां येणार नाहीं.' असें गंगाधरराव वारंवार मला सांगत असले तरी रोज पहांटे मी मोठ्यानें उपनिषदें म्हणत असे, तीं आपल्या खोलीमध्यें येऊन म्हणत जा, असेंहि ते मला सांगत असत. मग त्यांच्या खोलीमध्यें जाऊनच मी पहांटे उपनिषदें म्हणूं लागलों. एकदा श्री. सिद्दुराव पुजारी—एक निष्ठावंत वृद्ध खादी कार्यकर्ता—माझ्या झोपडींत येऊन मोठ्या कळकळीनें मला म्हणाले, "पुंडलीकजी, व्यर्थ आयुष्य खर्चण्यापेक्षां गीतेचे चारआठ श्लोक मी निवडून देईन तेवढे तरी रोज म्हणत चला." मी त्यांचें म्हणणें कबूल केलें. मला गीतेंतील श्लोकांचा अर्थ सांगण्यास ते रोज येत असत. ही गोष्ट गंगाधररावांना समजली व ते खूप हंसले. मात्र या बात्रटपणाबद्दल गंगाधररावांच्याकडून मला बोलून घ्यावें लागलें. दुसऱ्या दिवशीं पहाटे उपनिषदें म्हणण्यास त्यांनीं मला आपल्या खोलींत बोलावलें. त्या खोलीच्या बाहेरच्या बाजूला श्री. सिद्दुराव पूजारी झोपले होते. तेहि उठून, मी म्हणत असलेलीं उपनिषदें ऐकावयास बसले. मी उपनिषदें म्हणत असतां त्यांना काय वाटलें असेल त्याची कल्पना करणें मी वाचकांवरच सोपवितो. गंगाधररावांच्या बरोबर दौऱ्यावर हिंडणें, त्यांच्या व्याख्यानाचे अहवाल वर्तमानपत्रांना पाठवणें, त्यांचा पत्रव्यवहार संभाळणें आणि आश्रमांत आलों म्हणजे आश्रमाची चिंता वाहणें, ही कामें मी करीत असें. असो.

विणकरांसाठीं घरें बांधविण्यांत आलीं असलीं तरी आपलीं कुटुंबें गांवांतून स्थलांतरित करून विणकराना या मळ्यांतील घरांत राहावयास आणण्यास दोन वर्षे लागलीं. संसाराला लागणारें सामान व इतर जिन्नस विणकराच्या स्त्रिया व घरचीं मुलें हीं गांवातील दुकानांतून आणीत असत. पण आतां विणकरांना किराणा मालासाठीं वारंवार गांवांत हेलपाटे घालावे लागत असत. विणण्याचें काम एकटा विणकर करीत असला तरी मागाचीं इतर कामें घरचीं मुलें व स्त्रिया करीत असतात. ही अडचण दूर करण्यासाटीं धान्य, किराणा माल व इतर जिन्नस बेळगांवांतील दरानेंच आश्रमांत देणारें दुकान गंगाधररावांनीं काढलें. या दुकानाचें काम एका कार्यकर्त्याकडे सोपविलें. या व्यवस्थेमुळें विणकरांना माल चांगला, स्वच्छ व कमी दरानें मिळूं लागला व मालासाठीं वारवार गांवांत जाण्याचे त्यांचे हेलपाटेहि वांचले. विणकरांना लागणारा माल पुरवून, त्याचे पैसे त्यांच्या मजुरींतून मांडून घेण्याची व्यवस्था अंमलांत आली. विणकरांच्या कुटुंबांना जवळ ठेवून घेण्यामध्यें हे फायदे दिसले तरी त्यांतील तोटेहि अनुभवानें कळून येऊं लागले. त्याचा उल्लेख या ठिकाणीं करण्याचें मी टाळूं इच्छितो.

विणकरांनीं आश्रमाच्या सायंप्रार्थनेस हजर राहिलें पाहिजे असा नियम करण्यांत आला होता. पण प्रत्यक्षांत नियमित फार दिवस प्रार्थनेस हजर राहणारा

एकहि विणकर आम्हांला दाखवितां आला नाहीं. सर्व विणकरांनीं प्रार्थनेस हजर राहून, रोजचें बौद्धिक ऐकावें ही त्यांतील इच्छा होती. प्रार्थनेमध्यें त्यांची व इतरांची उपस्थिति नोंदविण्याचा प्रघात कांहीं काळ ठेवला होता. उपस्थितीची नोंद होतांच प्रार्थना चालू असतांना—प्रार्थनेच्या वेळीं प्रकाश थोडा कमी करण्याची वहिवाट असते—असा कमी प्रकाश होतांच विणकर हळू हळू निघून जात असत. या बाबतींत त्यांचें हृदयपरिवर्तन करण्यांत आश्रमास कधींच यश आलें नाहीं. आश्रम व आश्रमांतील खादीकार्य हें विणकरांनीं चांगल्या व्यापक राष्ट्रीय संस्कारांचें एक केंद्र आहे असें कधींच मानिलें नाहीं. केवळ धनार्जनाचें एक साधन एवढाच त्यांचा विचार होता.

. या तीनचार वर्षांच्या काळांत माझ्या कित्येक मतांत फरक झाला होता. मागें लिहिल्याप्रमाणें माझें जें वाचन या काळांत घडलें त्याचाहि थोडाफार परिणाम या माझ्या मतपरिवर्तनांत आहेच. कसेंहि का असेना, माझे या आश्रमाच्या कामांत किंवा खादीच्या कामांत विशेष लक्ष नाहीं, असें पाहून कै. गु. गंगाधरराव यांनीं मला कै. पू. जमनालालजींकडे काम करण्यास १९२९ सालीं पाठवून दिलें. अखिल भारतीय अस्पृश्यताविरोधी समितीचे अध्यक्ष म्हणून कै. पू. जमनालालजी बजाज यांना निवडण्यांत आलें होतें आणि स्वामी आनंद व मी (पुंडलीकजी कातगडे) त्या समितीचे चिटणीस म्हणून नियुक्त झालों होतों. त्या समितीच्या कार्याची व्याप्ति व अहवाल देण्याचें हें स्थळ नव्हे. तो सर्व इतिहास 'पुंडलीक'च्या दुसऱ्या खंडांत देण्यांत येईल. पण येथें नमूद करून ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं या अखिल भारतीय अस्पृश्यताविरोधी समितीचा चिटणीस म्हणून स्वामी आनंद यांच्या मार्गदर्शनाखालीं काम करीत असतां माझा कल गांधीजींच्या विचाराकडे झुकूं लागला, आणि मी गांधीविचारसरणीचा व तत्त्वज्ञानाचा अभ्यास सुरू केला. प्रथम प्रथम मला गांधीजींच्या विचारांच्या मांडणीपेक्षां पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांच्या भाषेचा व मांडणीचा माझ्या मनावर अधिक खोल परिणाम झालेला आहे. विनोबाजी, काकासाहेब कालेलकर, किशोरलालजी मश्रूवाला, नरहरभाई पारेख व महादेवभाई देसाई यांची मांडणी, भाषा व चिंतनिका मला अधिक आवडत होती. त्यांतूनहि काकासाहेबांच्या भाषेचा व मांडणीचा मी अद्यापीहि आदि व अतीव प्रेमी आहें.

याच सुमारास जतींद्रदास यांनीं तुरुंगामध्यें साठ दिवस उपवास करून प्राणार्पण केलें. (१९२९). राजकीय कैद्यांना उत्तम खाणेंपिणें दिलें गेलें पाहिजे व तो त्यांचा हक्क आहे या मुद्यावर उपवासशस्त्राचा अवलंब त्यांनीं केला होता. त्यांच्या निधनाच्या दिवशीं मी कांहीं कामानिमित्त बेळगांवास आलों होतों. शाळा-कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं उघड्या डोळ्यांनीं प्रचंड मिरवणूक काढली होती. मी त्या मिरवणुकीमध्यें भाग घेतला होता. मिरवणुकींतील विद्यार्थ्यांचा उत्साह, चीड व जयघोष यामुळें माझें डोकें भणाणून गेलें होतें. ब्रिटिश सरकारविषयीं चीड व संताप यांनीं मी

अगदीं पिसाळल्यासारखा झालों होतों. या मिरवणुकीचें रूपांतर शेवटीं मारुतीच्या विस्तीर्ण देवालयांतील प्रचंड जाहीर सभेंत झालें. त्या सभेंत मी एक मरमसाट व प्रखर असें भाषण केलें होतें. दुसऱ्या दिवशीं मी बेळगांवाहून परत मुंबईस गेलों. पुढें सुमारें एक महिन्याच्या आंतच मला बेळगांवाहून श्री. जीवनराव याळगी यांच्या सहीची तार आली. One birth is reserved for you. 'आपल्यासाठीं एक 'बर्थ' राखून ठेवण्यांत आली आहे!' याचा अर्थ मी समजलों. कै. गु. गंगाधरराव देशपांडे यांनीं मला लागलीच बेळगांवास बोलावून घेतलें. १२४ अ प्रमाणें माझ्यावर त्या व्याख्यानाच्या आधारें खटला भरण्यांत आला होता. कै. दत्तोपंत बेळवी यांच्या मध्यस्थीनें माझ्यावरील तो खटला सरकारनें परत घेतला. 'पुंडलीक म्हणजे कांहीं मोठा पुढारी नव्हे. त्याच्यावर असा १२४ अ प्रमाणें खटला भरून त्याला नसते महत्त्व देऊन त्याला मोठा करण्याचा अदूरदर्शीपणा सरकारानें करूं नये' ही गोष्ट कै. श्री. बेळवी यांनीं सरकारला पटवून दिली. या कामीं गंगाधररावांनीं श्री. भीमराव पोतदार यांचाहि उपयोग करून घेतला होता. हा सर्व प्रकार कै. गु. गंगाधरराव यांनीं सर्व घटना सपुष्टांत आल्यावर मला सांगितला. पण या महिन्या दोन महिन्यांच्या काळांत माझी जी चर्चा गंगाधररावांशीं रोज चालू होती त्यावरून माझ्या विचारांत व दृष्टीमध्यें पुष्कळच परिवर्तन झालें असल्याचें त्यांच्या निदर्शनास आलें. त्याचा परिणाम असा झाला कीं हुदलीजवळील गंगाधररावांच्या मध्यामधील कुमरी आश्रमाचें काम आस्ते आस्ते माझ्या हातीं आलें. तोंपर्यंत आश्रम चालवीत असलेले तरुण श्री. तिम्माप्पा नायक आपल्या जिल्ह्यामध्यें कॉंग्रेसचें कार्य व विधायक कार्य करण्यासाठीं जाण्यास निघाले. अंकोल्यास पोहोंचल्यानंतर त्यांनीं जें पत्र कै. गु. गंगाधरराव यांना लिहिलें होतें त्यांत त्यांनीं असें स्पष्ट लिहिलें होतें कीं 'माझ्या हातून आश्रमाची जी कांहीं थोडीबहुत सेवा घडली असेल त्याचें बहुतांशीं श्रेय श्री. पुंडलीकजी यांनाच आहे.' मी आश्रमाचा व्यवस्थापक म्हणून काम पाहूं लागल्यामुळें गंगाधररावांनीं श्री. रामचंद्र वडवी यांस व केव्हां केव्हां श्री. वामनराव विद्री यांस आपल्या बरोबर फिरतीवर नेण्यास प्रारंभ केला. परंतु मराठी लेखनाची संवय किंवा ज्ञान या दोघांसहि नसल्यामुळें, पुन्हा कांहीं काळानंतर मलाच गंगाधररावांच्या देशसंचारांत त्यांच्याबरोबर जावें लागलें. परंतु या काळांत मला अज्ञातवासांतून बाहेर पडून आश्रमाची व्यवस्था पहावी लागली व आश्रमांतील कार्यकर्त्यांच्या शिक्षणाकडेहि लक्ष द्यावें लागलें.

मी आश्रम चालवीत असतांना एके दिवशीं कै. गु. गंगाधररावांनीं आश्रमांत कांहीं 'प्रकार' पाहिला व मला विचारलें कीं 'आश्रमांत काय काय गोष्टी चालतात यांकडे तुझें लक्ष आहे काय? व्यवस्थापकाची दृष्टि चोहोंकडे असावी लागते. बारीक दृष्टीनें चोहोंकडे पहात राहावें.' थोड्याच दिवसांत गंगाधररावांनीं पाहिलेला 'प्रकार' माझ्याहि ध्यानांत आला व लगेच त्यावर उपायहि योजण्यांत आला.

९.

## आश्रमाचा व्यवस्थापक म्हणून मीं काय केलें?

साबरमती आश्रमांतील कामाचा आणि अंधेरी येथील 'साधकाश्रमा'चा व्यवस्थापक म्हणून अनेक तऱ्हेचा अनुभव माझ्या जमेला होता. आश्रमांतील वेळापत्रक अत्यंत कसोशीनें कार्यान्वित करणें ही आश्रम यशस्वी रीतीनें चालविण्याची गुरुकिल्ली आहे. व्यवस्थापक स्वतः मनःपूर्वक राबत असला तरच आश्रमांतील कामाच्या वाटपाबद्दल होणारीं कार्यकर्त्यांमधील भांडणें टाळतां येतात, आणि भांडणें झालींच तर तीं आवरतां येतात. आश्रमांतील सर्वच कामें, स्वयंपाक करण्यापासून तों संडास साफ करण्यापर्यंत, कार्यकर्त्यांनीं स्वतः केलीं पाहिजेत हा दंडक घालण्यांत आला. त्यांत संडास साफ करण्याचा मान खास महत्त्वाचा म्हणून तो व्यवस्थापकाला देण्यांत येत असे. आश्रमांतील कामानें, शिक्षणानें व अनुभवानें ज्या कार्यकर्त्यांची विशेष उन्नति झाली असल्याचें दिसून येईल त्यांच्याकडेच संडाससफाईचें काम–व्यवस्थापकाच्या गैरहजेरीमध्यें–तात्पुरतें दिलें जात असे. अशा रीतीनें या सफाईच्या कामाचा मान व संधी ज्याला मिळत असेल तोच कार्यकर्ता भावी व्यवस्थापक म्हणून गणला जाई. राज्याच्या मंत्रीमंडळामध्यें गृहखातें व परराष्ट्रखातें ज्यांच्या हातीं वारंवार जाईल त्यांच्याच गळ्यांत भावी मुख्य मंत्र्याची माळ पडावयाची हा जणुं शिरस्ताच आज झालासें दिसत नाहीं काय! महात्मा गांधी म्हणत असत कीं "एखाद वेळीं आश्रमाचा व्यवस्थापक बड्या लाटसाहेबाचें काम करूं शकेल पण सर्वच बडे लाटसाहेब आश्रम यशस्वी रीतीनें चालवूं शकतीलच असें नाहीं." स्वयंपाक रोज वेळेवर आणि चांगल्या काटकसरीनें सतत करणें इतकें सोपें नाहीं. असलीं कामें पुरुषांना तितकीं साधत नाहींत. पुढें धान्य स्वच्छ करणें आणि गहूं व जोंधळा दळण्याची जबाबदारी कार्यकर्त्यांनीं आपल्या शिरावर घेतली. त्यासाठीं उभ्यानें दळतां येईल अशी नवीन तऱ्हेचीं जातीं तयार करवून तीं बसविण्यांत आलीं. पीठ पाहिजे तेवढेंच बारीक किंवा जाडें पडेल अशी योजना व त्याचें समयमापन साधण्याचा प्रयत्न करण्यांत

आला. मुंबई ते पुणेंपर्यंतचें अंतर कापण्याची वेळ आस्ते आस्ते कमी कमी लागेल अशी योजना आंखण्याचा व ती अमलांत आणण्याचा प्रयत्न रेल्वेखात्याकडून व्हावा, तीच गति दळण्याच्या वेगांत व जात्याच्या फेऱ्यांमध्यें (Revolutions) साधण्याचा प्रयत्न होऊं लागला. आश्रमांतील स्वच्छता आदर्शरूप ठेवणें ही आश्रम व्यवस्थित चालविण्याची दुसरी गुरुकिल्ली आहे. कर्यकर्त्यांचे कपडे, शरीर, मन व बुद्धि अत्यंत स्वच्छ व किल्मिषरहित राहील याची काळजी घेणें हेंच आश्रमांतील प्रधान शिक्षण मानलें जातें. आश्रमाचे आदर्श व्यवस्थापक म्हणून साबरमती आश्रमाचे व्यवस्थापक श्री. मगनलालजी गांधी यांच्या नांवाचा उल्लेख करण्यास मुळींच हरकत नाहीं. गांधीजींच्या प्रत्येक चळवळींत व प्रत्येक नवनवीन उपक्रमामध्यें गांधीजींच्या सावलीप्रमाणें त्यांच्याबरोबर मगनलालजी असत. सत्य प्रमाण मानणाऱ्या गांधीजी-सारख्या पुरुषावर त्यांची श्रद्धा, गांधीजींच्या सत्यावरील श्रद्धेइतकीच अढळ होती. चरख्यामध्यें क्रांति घडवून आणतांना त्यांनीं आपली यंत्रविशारद प्रज्ञा अनुभवास आणून दिली होती. आश्रमांतील सर्व लहानथोर कामें आश्रमांतील व्यवस्थापकाला आलींच पाहिजेत. एवढ्याचसाठीं श्री. मगनलालजी भाई हे शेतीशास्त्रज्ञ, कुशल विणकर, आदर्श सुतार, उत्तम गवई, तज्ञ हिशेबतपासनीस, सराईत स्वयंपाकी, प्रामाणिक भंगी, आणि तत्त्वज्ञ अनुयायी बनले होते. आश्रमांतील कोणत्याहि खात्यांतील जबाबदार मनुष्य निघून गेला तरी कोणतेंहि काम त्याच्या अनुपस्थितीमुळें अडून राहाणार नाहीं, इतकी आपली तयारी मगनलालजी यांनीं संपादन करून ठेवलेली होती. साबरमती आश्रमात शिक्षण घेत असतांना माझें व मगनलालजींचें कधींच पटलें नव्हतें. परंतु पुढें साधकाश्रमामध्यें मलाहि त्यांच्यासारखेंच कठोर, कडक, काटेतोल, निरलस वागावें लागलें, त्यावेळीं मी गांधीजींना पत्र लिहून स्पष्ट कळविलें होतें कीं, 'मगनलालजींच्या विरुद्ध ज्या ज्या तक्रारी आपल्यापुढें वेळीं अवेळीं मांडत गेलों होतों त्या सर्व मी आतां परत घेतों. श्री. मगनलालजी वागत होते तसेंच मलाहि येथें वागावें लागत आहे.' मला साबरमती आश्रमांत असतांना वाटत होतें कीं या मगनलालजींना 'लोकसंग्रह' नाहीं. पण आदर्श शिस्त ज्याला राखावयाची असते त्याला खोट्या लोकसंग्रहाच्या घोटाळ्यामध्यें किंवा जाळ्यामध्यें जाण्यास सवडच असत नाहीं. मला ही गोष्ट अनुभवानें पटली आहे. लोकसंग्रहाच्या रूढ व अशास्त्रीय कल्पनांनीं आश्रमाचा व्यवस्थापक वागूं लागेल तर त्याच्या आश्रमाची अव्यवस्थित खानावळ किंवा स्टेशनवरचें तिसऱ्या वर्गाचें प्रतिक्षालय त्वरित बनून जाईल. यासाठीं आश्रमव्यवस्थापकानें नेहमीं जाग्रत व कर्तव्यदक्ष राहिलें पाहिजे.

खादीचे दर प्रथम प्रथम फारच वाढवावे लागले होते. हातसुताची खादीहि इतकी सुबक नियत नसे. ओबडधोबड खादी भरती किंमत देऊन विकत घेण्यास जनतेच्या देशभक्तीलाच आवाहन करावें लागत असे. पण हे खादीचे दर कमी कमी करत जाण्याची किंवा किंमती उतरवीत आणण्याची धडपड चालूच होती. त्यासाठीं

कार्यकर्त्यांचें वेतनहि कमी करण्यांत आलें होतें. आश्रमांतच ज्या कार्यकर्त्यांचें खाणेंपिणें व रहाणें घडे त्यांना वेतनच दिलें जात नसे. म्युनिसिपालिटीकडून खादीवरील कर माफ करविण्याचे प्रयत्न चोहोंकडे होऊं लागले होते. आमच्या आश्रमापासून रेल्वेस्टेशन सुमारें तीन मैल दूर होतें. खादीचे गठ्ठे आश्रमांतून रेल्वेस्टेशनपर्यंत नेण्यास वहातुकीचा खर्च बराच येत असे. तो खर्च वांचवण्यासाठीं आश्रमांत चार गाढवें राखण्यांत आलीं होतीं. या गाढवांच्या पालनपोषणाची जबाबदारीहि आश्रमव्यवस्थापकाला उचलणें क्रमप्राप्तच होतें. हीं गाढवें आश्रमांत आठ महिनेपर्यंत होतीं. तीं आश्रम सोडून बाहेर भटकत जात नसलीं तरी त्यांना ओझें वहाण्याच्या कामाच्या वेळीं हुडकून पकडून आणावें लागत असे. ओझें वाहण्यासाठीं आपल्याला पकडण्यास हे लोक आले आहेत एवढें ज्ञान किंवा अक्कल गाढवांना असते. कोणत्या गाढवाला किती ओझें झेपेल याची कल्पना कांहीं थोड्याशा अनुभवानंतर सहज करतां येते.

## १०.

## निपाणीस खादीचें दुकान स्थापण्याचा प्रसंग

निपाणीस खादीचें पहिलें दुकान उघडण्यांत आलें त्यावेळीं हुदली आश्रमांतीलच खादी पाठविण्यांत आली होती. त्या खादीचे गठ्ठे बांधण्याच्या कामाला आदल्या दिवशीं सकाळपासूनच प्रारंभ झाला होता. खादीचा हिशेब वगैरे स्वतः गंगाधररावच त्यावेळीं मराठीमध्यें लिहीत असत. दोन प्रहरपर्यंत खादीचे चार गठ्ठे बांधून तयार झाले होते. हे चार गठ्ठे, दोन दोन प्रमाणें, दोन गाढवांवर लादून आश्रमापासून रेल्वे स्टेशनपर्यंत सुमारें तीन मैल अंतरावर न्यावयाचे होते. दोन प्रहरची चार वाजतांची गाडी गाठण्यासाठीं निदान एक वाजतां तरी आश्रमांतून निघणें आवश्यक होतें. कारण गाढवाच्या पाठीवर ओझें लादल्यानंतर तें एका ठराविक गतीनेंच चालत असतें. गाढवानें भरभर चालावें म्हणून त्याला दंडुक्यानें मारत सुटल्यास तें मटकन खालींच बसून सत्याग्रह करतें. गाढव जेवढें ओझें पाठीवर लादल्यानंतर तें वाहून नेऊं शकतें तेवढें ओझें घेऊन तें उठूं शकत नाहीं.

खादीच्या ताग्यांची किंमत लिहून यादी तयार करण्याचें काम गंगाधरराव स्वतःच करूं लागले; कारण किंमतीची बेरीज लवकर करण्यासाठीं गंगाधरराव जी घाई व आरडाओरड करीत होते, त्यायोगें बेरीज करणाऱ्याच्या बेरजा चुकूं लागल्या होत्या. म्हणून जो हंशा पिकला त्यांत बेरजा करतांना गंगाधररावांचेंहि तसेंच होऊं लागलें. शेवटीं वेळेचें अवधान राखण्यासाठीं बेरजा निपाणीमध्येंच पोहोंचल्यानंतर कराव्यात असें ठरवून, हिशेबाचे कागद बरोबर घेऊन मी निपाणीस जाण्याचें ठरलें. कारण दुसऱ्या दिवशीं निपाणीमध्यें खादीविषयीं उद्घाटनाच्या सभेंत मला बोलावयाचें होतें. दोन गाढवांवर चार गठ्ठे लादण्याचें काम मी, वडवी व गंगाधरराव करीत होतों. तें आम्हां तिघांनाहि साधेना. या कटकटींत एक गाढव लाथ मारून पळून गेलें व त्याच्या पाठोपाठ दुसरेंहि गाढव निघून गेलें. ज्या लोणाऱ्याचीं तीं गाढवें होतीं तोहि त्याच मळ्यामध्यें राहात होता. त्याला बोलावून आणून तीं गाढवें पुन्हा पकडलीं

व एकेका गाढवावर दोनदोन गठ्ठे लादले. त्यांपैकीं एका गाढवावर माझेंहि सामान चढवलें. हातांत दांडका घेतला आणि अस्मादिकांची स्वारी चकुचक् करीत स्टेशनकडे गाढवें हाकीत निघाली. सुमारें एक दीड फर्लांग गेल्यावर त्या गाढवांनीं आपली चालण्याची गति वाढवावी म्हणून मी त्यांना दोन दांडके हाणले. त्यामुळें गाढवें बिथरलीं. त्यांची गति तर वाढली नाहींच पण त्या दोन्ही गाढवांनीं बसकण घेतली. त्यांना थोडें मारून तीं उठतात का मीं पाहिलें. परंतु तीं मुळींच उठूं शकलीं नाहींत. अर्थात् त्यांच्या पाठीवर लादलेलीं ओझीं उतरणें ओघानेंच आलें. तीं उतरवून मीं त्यांना मुक्त केलें. हलकें वाटतांच तीं गाढवें उठलीं व त्यांनीं थेट आश्रमाकडे धूम ठोकली. आपल्या पाठीवरील ओझें इष्ट स्थळीं पोहोंचवितांच तीं मोकळीं होत आणि मुक्त झाल्याबरोबर स्टेशनवरून थेट माघारीं आश्रमांत जात असत. या नेहमींच्या सवयीप्रमाणेंच आतांहि त्यांनीं आपला मार्ग आक्रमिला.

इतक्या थोड्या वेळांत गाढवें परत आलेलीं पाहून, गंगाधरराव स्वतःच खादीचे गठ्ठे पडले होते तेथें आश्रमांतून येऊन पोहोंचले. मी त्या गठ्ठयांवर सचिंत बसून विचार करीत आहें, हें त्यांनीं पाहिलें. तीं त्यांना आश्रमजवळील टेकड्यांच्या जंगलांतील लाकडे तोडून त्यांचा मोळवा केला जात असे व तो विक्रीसाठीं बाहेर घेऊन जाणाऱ्या कांहीं बैलगाड्या स्टेशनकडे जात असलेल्या दिसल्या. त्या गाड्यांवरच खादीचे गठ्ठे चढवून ते स्टेशनवर वेळेला पोहोंचविण्यांत आले. गंगाधररावांनींच सांगितल्यामुळें त्या गाडीवाल्यांनीं आपल्या गाडीवर खादीचा एकेक गठ्ठा घेऊन तो स्टेशनपर्यंत नेण्याचें कबूल केलें होतें. खादीचे गठ्ठे वेळेवर स्टेशनवर पोहोचले. रेल्वेनें ते हुक्केरी स्टेशनवर व तेथून पुढें मोटारीनें निपाणीपर्यंत गेले व त्याच खादीनें निपाणी येथील पहिलें खादीचें दुकान उद्घाटित झालें!

त्यावेळीं मी सहज बोलतांबोलतां पण थोडें गंभीरपणें गंगाधररावांना विचारलें कीं आमच्याकडून होणाऱ्या देशभक्तीच्या वेळींच हीं गाढवें राखण्याची देशभक्ति आमच्या नशिबीं यावी काय? त्यावर त्यांनींहि तितक्याच गंभीरपणें मला सांगितलें कीं, या घटनेचें इतकें वाईट वाटून घेण्याचें काय कारण आहे? देशसेवा करावयास निघालेल्या सर्वांवरच असले प्रसंग येतात. आम्ही आज कित्येक वर्षे तोच उद्योग करीत आलों आहोंत, हें तूं पहात नाहींस काय? आम्ही दोघेहि खूप हसलों. ते परत आश्रमांत गेले व मी झपाट्यानें रेल्वेस्टेशनचा रस्ता धरला. झपाट्यानें जाण्याचें कारण माझ्या डोक्यांत विचारांचीं चक्रें उलटसुलट वेगानें फिरूं लागलीं होतीं.

आश्रमांतील खादीचा व्याप यावेळीं बराच वाढला होता. सुमारें २० ते २५ विणकर हातसुताची खादी विणण्याचें काम करीत असत. खादीच्या सुताचा व विणकरांच्या विणाईचा हिशेब ठेवण्याचेंहि काम वाढलें होतें. कारवारचा एक विद्यार्थी श्री. वासुदेव गोसावी यास या हिशेब लिहिण्याच्या कामांत गंगाधररावांनीं शिकवून तयार केलें होतें आणि आश्रमांतील खादीचें सर्व काम तोच पाहात होता. मला

हिशेब लिहावयास येत नाहीं आणि कानडीनध्यें तर मुळींच येत नाहीं, हें अगदीं स्पष्ट असल्यामुळें श्री. वासुदेव गोसावी यांच्याकडून तें काम गंगाधररावांनीं करविलें होतें आणि त्या किचकट कामांतून माझी कायमची मुक्तता केली होती. चि. गोसावी यानें हें काम कांहीं वर्षे उत्तम रीतीनें केलें. प्रामाणिकपणा हा त्याच्यामध्यें उत्कट गुण होता. तो विवाहित झाल्यावर आपल्या पत्नीसहि हुदलीस आणून स्वतंत्र बिऱ्हाड करून तो राहत असे. त्यानें आश्रमाच्या इतर कार्यकर्त्यांप्रमाणें स्वातंत्र्याच्या चळवळीमध्यें अनेकदां तुरुंगवास सोसलेला आहे. त्याच्या पत्नीनेंहि आश्रमांतील संस्कार आत्मसात् केले असल्यामुळें, तिनेंहि अनेकदां तुरुंगवास सोसला होता, एवढेंच नव्हे, तर 'अंडर-ट्रायल' (गुमानीं) असतांना पोलीसचा छळहि सोसला होता. गुमानींतून (अंडरट्रायलच्या लॉकअपमधून) तिनें मला हिंडलगा जेलमध्यें एक चिठी लिहून आपल्याला पोलीस-कडून होत असलेला छळ मोठ्या चातुर्यानें कळविला होता. तें सर्व मी जेल अधिकाऱ्यांना कळवलें आणि त्याच दिवशीं सायंकाळच्या आंत तिला त्या गुमानींतून हिंडलगा जेलमध्यें आणविली होती. सुमारें पंधरा दिवस तिला स्नान देखील मिळालेलें नसल्यामुळें तिच्या अंगाला भयंकर कंडू सुटलेला होता. हिंडलगा तुरुंगांत येतांच तिला स्नान मिळालें. कंडू कमी झाला व पोलिसांच्या छळांतून सुटल्यामुळें तिला हायसें वाटलें.

## ११.

# हुदली आश्रमाचा कर्नाटक-महाराष्ट्राशीं संबंध.

हुदलीमधील आश्रमाचा व विधायक कार्याचा संबंध महाराष्ट्राशीं व विशेषतः कर्नाटकाशीं वाढत गेला. बेंगळूर, बळ्ळारी, गदग, विजापूर, हुबळी धारवाड, कारवार आदि भागांतून नवयुवक आश्रमांत दाखल होऊं लागले. कर्नाटकांतील जे तरुण साबरमती आश्रमांत दाखल होत असत त्यांनाहि त्यांचें शिक्षण संपतांच गांधीजी हुदलीस गंगाधररावांच्याकडे पाठवीत असत. या सर्व तरुणांना गंगाधरराव स्वतः त्यांचा मुक्काम हुदलीमध्यें असतांना, बौद्धिक घेत असत, देशांतील परिस्थिति, चळवळी, विशेष समस्या, विशद करून सांगत असत, आणि त्याबरोबरच गांधीजींची विचारसरणी व तत्त्वज्ञान यांची माहिती करून देत असत. आज कर्नाटकांत भिन्नभिन्न कार्यक्षेत्रांत काम करीत असलेले अनेक निष्ठावंत कार्यकर्ते कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें, हुदलीमधील पहिल्या दोनतीन तुकड्यांमधीलच कार्यकर्ते आहेत असें दिसून येईल. राष्ट्रीय शाळा, हरिजन सेवा, खादीकार्य, अनेक राजकीय चळवळी, भूमिगत राहून केलेलें काम, दारुबंदी आणि पुढें भूदानयज्ञ आदि क्षेत्रांमधील कार्य, या सर्व आंदोलनांत गुंतलेले निष्ठावंत कार्यकर्ते, यांचा पुरवठा हुदलींतील कार्याशीं ज्यांचा संबंध आला होता अशांमधूनच झालेला आहे, याची साक्ष या चळवळींचा इतिहास दिल्याशिवाय राहाणार नाहीं. कांहीं वर्षे या आश्रमाचें काम झाल्यानंतर असा एक घूट निघाला कीं देशसेवेचा ज्यांच्या मनावर थोडाफार संस्कार झालेला आहे अशा कार्यकर्त्यांनीं आपल्या पसंतीनें क्षेत्र निवडावें व तेथें स्वतंत्रपणें काम करण्यास जावें आणि राष्ट्रीय विधायक कार्याचें केंद्र उत्पन्न करून दाखवावें व मधूनमधून आश्रमांत राहण्यास यावें. या कल्पनेला अनुसरून श्री. वामनराव देसाई विद्री यांनीं अक्तंगेरहाळ आणि श्री. रामचंद्र वडवी यांनीं मागोजीकोप हीं खेडीं पसंत केलीं. या दोन्ही कार्यकर्त्यांनीं आपापल्या निवडीच्या गांवामध्यें विधायक कार्याचें केंद्र निर्माण करून दाखविलें. श्री. दादासाहेब काळे यांनीं

प्रथम मुळधाळ व नंतर बैलहोंगलजवळील होयूर हें गांव निवडलें. तीं सर्व गांवें त्या त्या कार्यकर्त्यांनीं स्वातंत्र्याच्या लढ्यांतील इतिहासांत गौरवानें उल्लेख केलीं जातील अशी योग्यता प्राप्त करून देऊन देशसेवेला लावलीं. पाच्छापूर गांवीं श्री. अण्णु गुरुजींनींहि अशीच कामगिरी करून दाखविली आहे. कर्नाटकांतून अन्य जिल्ह्यांतून आश्रमांत आलेले विद्यार्थी आपलें आश्रमांतील शिक्षण संपतांच आपापल्या ठिकाणीं प्रत्यक्ष सेवाकार्य करण्यास निघून जात असत व आपल्या आश्रमीय ज्ञानाचा त्या त्या ठिकाणीं उपयोग करीत असत.



हुदलीमध्यें बसविलेला महात्माजींचा अर्ध-पुतळा.



साधूंच्या वेशांत भूमिगत कॉंग्रेस कार्यकर्ते.
(बसलेल्यापैकीं मध्यभागीं श्री. वडवी.)

बेकायदा–मीठ हातांत घेतलेले सत्याग्रही.



'श्री अंबाबाई तालीम संस्था मिरज' मध्यें व्यायाम-शिक्षणार्थ पाठविलेले कार्यकर्ते, आपल्या पाच व्यायाम–शिक्षकांसमवेत.



'गांधी-सेवा-संघा'चे सदस्य श्रमदानास जात आहेत.
सर्वांत पुढचे श्री. बसवंताप्पा आणि बसाप्पा यमकनमर्डी



त्या घराचा कांहीं भाग सार्वजनिक
ासाठीं दान करणारी उदारधी स्त्री.



स्वतः कातलेलें सूत आश्रमांत
घेऊन येणारी जख्खड म्हातारी





पुंडलीकजी व व्यंकटरामय्याजी यांच्यामधील मतभेद गु. गंगाधरराव समजून घेत आहेत.
डावीकडून.— १. गु. गंगाधरराव
२. पुंडलीकजी
३. व्यंकटरामय्याजी



१९२४च्या कॉंग्रेस अधिवेशनांतील कामाची पहाणी गु. गंगाधरराव घोड्यावरुन करीत आहेत.



आश्रमांत गु. गंगाधरराव 'बौद्धिक' घेत आहेत. (उजवीकडे खुर्चीवर बसलेले गु. गंगाधरराव.)

१२.

## एकाच रात्रीं आश्रमामध्यें दोन सभा

मी आश्रम चालवीत असतांना आश्रमामध्यें एके दिवशीं त्या आश्रमाचा व्यवस्थापक म्हणून न राहण्याचा मीं निर्णय घेतला. त्याची कथा थोडी गमतीदार असल्यानें ती येथें देत आहें.

माझें व श्री. वडवी यांचें नातें गाढ मित्रत्वाचें असल्यामुळें माझा ओढा त्यांच्याकडे असे. श्री. वडवी हे मागोजीकोप येथें गेल्यापासून माझें लक्ष त्यांच्याकडे व त्यांच्या कामाकडे विशेष लागून राहिलें होतें. एके दिवशीं मला कोणीतरी बातमी दिली कीं मागोजीकोप येथें श्री. वडवी अत्यवस्थ आजारी आहेत. तें ऐकून मी अस्वस्थ झालों, व लगेच गंगाधररावांकडे जाऊन म्हटलें कीं, "श्री. वडवी अत्यवस्थ असल्यामुळें मी त्यांना भेटून आल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. मला भाड्यासाठीं थोडे पैसे पाहिजे आहेत." त्यावर गंगाधरराव म्हणाले, "परवांच मागोजीकोपहून आलेली कांहीं मंडळी मला भेटली होती. वडवी व त्यांचे तेथील खादीकार्य याविषयींहि बोलणें निघालें होतें. वडवी आजारी असते तर मला त्यांनीं तसें सांगितलें असतें. शिवाय मी बेळगांवला गेल्यानंतर मागोजीकोप गांवीं कोणास तरी पाठवून चौकशी करवितों आणि तसें कांहीं असल्यास तुला बेळगांवला बोलावून घेतों."

त्यांचा हा विचार ऐकून मी निरुत्तर झालों पण मला चैन पडेना. आणि मला मागोजीकोपलाहि जातां येईना. म्हणून दुसरे गांवामध्यें जाऊन गंगाधररावांच्या कारकुनाकडून मी जरूर तेवढे पैसे मागून घेतले. (मी कधीं पांचचार रुपये मागितले तर कारकून मला देत असे व गंगाधररावहि त्याबद्दल त्याला कधीं विचारीत नसत.) आणि मी गंगाप्पा यमकनमर्डी यास मागोजीकोप गांवीं पाठवून दिलें. त्याला परत येण्यास दोनतीन दिवस लागले. चि. गंगाप्पा यमकनमर्डी यांच्याशीं त्यावेळीं गंगाधरराव खूप चर्चा करीत, बोलत बसत आणि रोज सकाळीं अगर संध्याकाळीं घोड्यावरून गांवांतून आश्रमांत येत असतांना गंगाप्पाला बोलावून घेत. मग त्या घोड्यावरूनच

गप्पा मारीत मारीत ते दोघे आश्रमापर्यंत येत असत. पण या दोनतीन दिवसांत त्यांना गंगाप्पा भेटूं शकला नाहीं. तो बाहेर कोठें गेला आहे तेंहि त्याच्या घरीं कोणाला माहीत नव्हतें.

गंगाधररावांच्या स्वभावाप्रमाणें त्यांनी इतरांबरोबर मलाहि 'गंगाप्पा कोठें गेला आहे?' म्हणून विचारलें. मीं म्हटलें, 'खेड्यांतील काम पाहण्यास गेला असावा किंवा बेळगांवला गेला असेल. उद्यां मी त्याच्या घरीं तपास करुन येईन. घरच्या लोकांनीं कांहीं घरगुती कामासाठींहि त्याला कोठेंतरी पाठविलें असणें शक्य आहे.' माझ्या या उत्तरानें गंगाधररावांना कांहींतरी संशय आला असावा. इतक्यांत जमा-खर्चाच्या घरच्या वह्या तपासण्यासाठीं कारकुनाकडून त्यांच्याकडे आल्या. त्यांत माझ्या नांवावर कांहीं रक्कम खर्ची पडलेली आहे हें गंगाधररावांनीं पाहिलें व 'हे पैसे कशासाठीं खर्च केलेस?' असें मला त्यांनीं सहज विचारलें. 'टपालखर्चासाठीं मला पैसे पाहिजे होते' असें हजरजबाबी उत्तर मीं दिलें. हा प्रश्न येथेंच सोडून देण्यांत आला होता.

हा सर्व प्रकार आगाऊच गंगाप्पाला सांगून ठेविण्याचें मी ठरविलें होतें. परंतु माझी आणि गंगाप्पाची भेट होण्यापूर्वीच, त्याची व गंगाधररावांची गांठ पडली. गंगाधररावांनीं गंगाप्पाला अनेक प्रश्न विचारून सर्व कांहीं समजावून घेतलें. "श्रीयुत वडवी आजारी असल्याचें वृत्त ऐकून पुंडलीकजी बेचैन झाले, त्यांनीं कारकुनाकडून पैसे मागून घेतले आणि ते वाटखर्चासाठीं देऊन मागोजीकोपगांवीं मला पाठवून दिलें होतें. मी आज सकाळींच येथें परत आलो आहें. श्री. वडवी यांची प्रकृति उत्तम आहे!" असें त्यानें गंगाधररावांना सांगितलें होतें. त्या दिवशीं सायंकाळीं गावांतून आश्रमांत परतण्यास मला बराच विलंब झाला. मी येण्यापूर्वीच आश्रमातील प्रार्थना संपून गंगाधररावांचें बौद्धिक सुरू झालें होतें. आधी जें काय चाललें असेल तें पाहावें, ऐकावें व मगच मोज्नास जावें असा मी मनाशीं विचार योजला होता. हॉलच्या दरवाजाजवळच गंगाप्पा बसला होता. त्यानें हातानेंच मला इशारा दिला कीं मी यावेळीं आंत येऊं नये, बाहेर उभे राहूनच सर्व कांहीं लक्षपूर्वक ऐकावें. मी तेथें बाहेर उभे राहून त्यांचें बोलणें ऐकण्यापूर्वी, गंगाधररावांनीं विद्यार्थ्यांना काय सांगितलें होतें तें मला माहीत नाहीं. पण मीं जो त्यांच्या बौद्धिकाचा भाग ऐकला, त्यांत गंगाधरराव जे बोलले त्याचा आशय मात्र असा होता—

"......अशा परिस्थितींत आश्रम मी चालू ठेवावा किंवा नाहीं याचा मी विचार करीत आहें. गांधीजींच्या सर्व शिकवणीचें सार किंवा रहस्य सत्य व अभय हें आहे. राष्ट्राला त्यांना निर्भय बनवावयाचें आहे. आणि तेवढ्यासाठीच आश्रम ठिकठिकाणीं स्थापण्याचा खटाटोप ते करीत आहेत. अशा आश्रमाचा व्यवस्थापक, आश्रमांतील बौद्धिक घेणारा व्यवस्थापकच, असत्य बोलूं लागला तर गांधीजींचा उद्देश कसा साध्य होणार? एक खोटी गोष्ट पचविण्यास चार खोट्या गोष्टी रचाव्या लागतात

आणि मग असल्याच्या साखळींतील दुव्यांना अंतच राहत नाहीं. अशा व्यवस्थापकानें तुम्हांला कितीहि उत्तम बौद्धिकें किंवा उपन्यास दिले तरी त्यांचा संस्कार तुमच्या मनावर फार काळ टिकणार नाहीं. तेव्हां या बाबतींत तुम्ही सर्व मिळून विचार करा आणि पहाटेच्या प्रार्थनेनंतर आपण या विषयावर पुन्हा चर्चा करूं."

हें सर्व भाषण झाल्यावर सर्व विद्यार्थी आपापल्या ठिकाणीं गेले. मी त्या दिवशीं जेवलोच नाहीं. थोड्या वेळानें मी गंगाधररावांना भेटलों आणि त्यांना गंभीरपणें सांगितलें कीं "मी आतांच बाहेर उभा राहून आपलें भाषण ऐकलें. आपण म्हणतां तें सर्व मलाहि मान्य आहे. मित्रप्रेमामुळें मी बेचैन झालों आणि आपल्याविषयीं मला आदरयुक्त भय (Awe) असल्यामुळें माझ्या हातून हें वर्तन झालेलें आहे. हें माझें समर्थन नव्हे. तथापि आपल्या भाषणांत माझें जें चित्र आपण विद्यार्थ्यांपुढें ठेवलेलें आहे, त्यानंतर या आश्रमांत विद्यार्थ्यांचीं बौद्धिकें घेणें मला शक्य नाहीं. आपल्याच दुसऱ्या एखाद्या कामांत मला जोडून द्या. मी सकाळच्या प्रार्थनेच्या पूर्वी आश्रमांतून बाहेर पडणार आहें. मला आपण जाऊं द्यावें अशी माझी प्रार्थना आहे."

आश्रमामध्यें दुडकी घंटा ही 'भयसूचक घंटा' समजली जात असे. टण्टण्, ठण्ठण्, अशी दुहेरी ठोक्याची घंटा स्वतः गंगाधररावांनींच वाजविली होती. सर्व विद्यार्थी एकत्रित येण्यापूर्वी गंगाधरराव मला म्हणाले, "तुझ्या बाबतींत माझ्याकडून अन्याय झाला आहे. तुझ्याबरोबर आधीं बोलून नंतरच मी काय तें जाहीर बोलणें आवश्यक होतें. आतां विद्यार्थ्यांपुढें मी जें काय पुनः बोलेन तें ऐकल्यानंतरहि तुझा आश्रम सोडण्याचा निर्णय कायम राहिला तर तूं निघून जा. तुला पाहिजे असेल त्या ठिकाणीं मी तुझी सर्व व्यवस्था लावून देईन."

सर्व विद्यार्थी एकत्र येऊन बसल्यानंतर त्यांना उद्देशून गंगाधरराव म्हणाले कीं, 'आतांच आपण ज्या घटनेविषयीं अर्धवट चर्चा केली, त्याविषयीं आपण कदाचित् गैरसमज करून घेऊन परतले असण्याचा संभव आहे. किंबहुना तसा गैरसमज उत्पन्न करण्यास मीच स्वतः कारणीभूत झालों आहें असें मला दिसून आलें आहे. म्हणून मी पुनः आपणा सर्वांना बोलावून घेतलें आहे. पुंडलीकजीबरोबर बोलून मी वस्तुस्थिति समजून घेतली. माझ्याविषयींच्या आदरामुळें व वडीलकीच्या भयानुळें आणि वडवीविषयींच्या मित्रप्रेमामुळें हें वर्तन पुंडलीकजींच्या हातून झालें आहे. चळवळींतील आपल्या सहकाऱ्यांविषयीं इतकें नितांत प्रेम असणारीं माणसें तरी आजच्या आपल्या समाजामध्यें किती निवतील? शिवाय 'आपल्यापेक्षां अधिक योग्यतेचा व्यवस्थापक खुशाल नेमला जावा, मी आनंदानें ही जागा सोडावयास तयार आहें' असेंहि पुंडलीकजींनीं आतांच मला स्पष्ट सांगितलें आहे. पुंडलीकजींविषयीं माझें जें मत होतें व जी आत्मीयता होती तशीच ती कायम आहे. आपल्या सर्वांशीं त्यांनीं जें नातें उत्पन्न केलें आहे तितकें तें मीहि करूं शकलों नाहीं, हें

आपण सर्वजण पाहातच आहोंत. तेव्हां अशा योग्य आश्रमव्यवस्थापकानें आपली जागा सोडून अन्य ठिकाणीं नव्यानें काम करावें हें माझ्याप्रमाणेंच आपणालाहि योग्य वाटणार नाहीं असें मला वाटतें."

यानंतर गंगाधररावांनीं 'तुला कांहीं सांगावयाचें आहे का? सांग—' असें मला उद्देशून म्हटलें. पण मी कांहींहि बोललों नाहीं, रात्रीं बराच वेळ त्यांच्याशीं चर्चा करीत एकटाच बसलों. पुढें माझ्या बिछान्यावर येऊन पडल्यानंतरहि बराच वेळ मी विचार करीत होतों. विद्यार्थ्यांच्या मनावर तसा कांहीं अनिष्ट परिणाम झालेला मला दिसून आला नाहीं. गुरुवर्य गंगाधररावांना देखील परिस्थिति कळून चुकलेली आहे. तेव्हां चालत्या कामांत माझ्या जाण्यानें खीळ पडणें मलाहि योग्य वाटेना. निघून जावयाचेंच म्हटलें तरी असें एकदम निघून जाणें बरोबर नाहीं, असाहि एक विचार आला. कांहीं दिवस पूर्ववत् काम करावें आणि पुढें केव्हां तरी स्वाभाविक व योग्य कारण दाखवून मगच जावें. सध्यां तरी आश्रमाच्या कामांत व्यत्यय येईल असें वर्तन आपण करूं नये असें मनाशीं पक्कें ठरल्यावरच रात्रीं मला झोंप लागली. पहाटेच्या प्रार्थनेच्या नंतर मी एवढेंच बोललों कीं, "बडवींच्या अत्यवस्थ आजारीपणाच्या बातमीचें प्रकरण झालेंच नाहीं, असें मानून मी आश्रमाचीं सर्व कामें पूर्ववत् चालू ठेवीन." एवढ्यावरच या प्रकरणावर कायमचा पडदा पडला. ही चर्चा आम्हा सर्वांपुढें गंगाधररावांनीं करावयासच नको होती असें कांहीं विद्यार्थी म्हणत, तर दुसरे कांहीं विद्यार्थी 'झालें तें सर्व यथास्थित झालेलें आहे, गंगाधररावांचीं दोन्हीहि भाषणें उत्तम झालीं, आणि पुंडलीकजींनीं जी दृष्टि ठेवली व जो निर्णय घेतला तोहि योग्यच आहे,' अशा मताचे होते. गु. गंगाधररावांनीं मला योग्य वेळीं सावध केलें हेंहि येथें मी कृतज्ञतेनें सांगतों.

१२.

## गंगाधररावांची चिंता

मतभिन्नतेची आम्हां दोघांमधील अडचण अथवा मानगड किंवा आडकाठी नाहींशी झाली असती तरी केवळ आश्रमांत कोंडून राहण्याची माझी वृत्ति नाहीं, मला कानडीहि लिहितांवाचतां येत नाहीं आणि हिशेब लिहिण्याचाहि कंटाळा आहे, तो लिहिणें मी समजूनहि घेत नाहीं हें गंगाधरराव पाहात होते. शिवाय माझीं अशीं कामें किंवा स्वतंत्र प्रवृत्ति मी अंगावर घेतली होती. म्हणून आश्रमांतील खादीचें काम सांभाळण्यास त्यांना कोणास तरी तयार करणें प्राप्तच होतें. त्यांच्या डोळ्यापुढें गंगाप्पा यमकनमर्डी हा मुलगा होता. पण या कामांत तो कायमचा टिकला नाहीं तर त्याच्या आयुष्याचें नुकसान होईल असें त्यांना वाटत होतें. त्यावेळीं बेळगांव लोकलबोर्डाचे अध्यक्ष श्री. पंडितप्पा चिक्कोडी हे होते. त्यांना सांगून चि. गंगाप्पाला लोकलबोर्डाच्या शाळेंत शिक्षक म्हणून जोडून द्यावें असा गंगाधररावांचा विचार होता. पण हें राष्ट्रकार्य सोडून शाळामास्तर होण्याचें गंगाप्पानें नाकारलें. गंगाधररावांना याचें आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला.

पुढें कांहीं दिवसांनीं गंगाधररावांनीं त्याला खादीकार्य करण्याविषयीं विचारलें. परंतु तो म्हणाला कीं 'वासुदेव गोसावी तें काम करीत आहे ना?' या उत्तराचाहि त्यांना अत्यानंद झाला. 'वासुदेव आज नाहीं उद्यां आपल्या जिल्ह्यांत कारवारला जाणारच. तो आम्हाला कायमचा कसा मिळेल?' या गंगाधररावांच्या म्हणण्याला, 'तो गेल्यावर आपण सांगाल तर मी तें काम करीन' अशी गंगाप्पानें साथ दिली. त्यामुळें किती 'सरळ सीधा विचार करणारा हा मुलगा आहे!' असें त्यांना वाटलें व गंगाप्पाला खादीकार्यांतच स्थिर करावें असें त्यांच्या मनानें घेतलें. सर्व चळवळींमध्यें तुरुंगवास सहन करीत आजपर्यंत तो खादीकार्यांतच गुंतलेला आहे.

## १४.

## खेड्यामध्यें राहून गंगाधरराव काय करीत होते ?

सन १९२८–२९ च्या काळांत गंगाधररावांनीं आपल्या मालकीची 'कुमरी' या नांवानें प्रसिद्ध असलेली जमीन गांधी सेवा संघाला दान केली व तसा कागद करून तो रजिस्टरहि करण्यांत आला. रेल्वेस्टेशनपासून मैल दीड मैलाचा रस्ता लोकल बोर्डाकडून पक्का रस्ता बनवून घेतला. त्यासाठीं गांवांतील लोकांच्याकडून आपापल्या जमिनींपैकीं जरूर तेवढा भाग रस्त्यासाठीं देवविला आणि यथाशक्ति श्रमदानहि करविलें. या कार्याला मूर्तरूप देतांना त्यांनीं कोणालाच विशेष त्रासहि होऊं दिला नाहीं. सन १९२९ सालीं गांवामध्यें 'सहकारी संघ'हि गंगाधररावांनीं लोकांकडून स्थापन करविला. तो सहकारी संघ अव्याहत आपलें कार्य आजपर्यंत करीत राहिलेला आहे. गांवांतील एका तरुण मनुष्यास या कामीं जोडून देण्यासहि त्यांनीं वेळ लावला नाहीं. स्टेशनरोड तयार झाल्यामुळें या खेड्यामध्यें येण्यास तितकेंच सोईचें झालें. सहकारी संघ स्थापनेमुळें सरकारी अधिकाऱ्यांची जा–ये वाढली. गांवापर्यंत रस्ता चांगला झाल्यामुळें कोणत्याहि ऋतूमध्यें या खेड्याला भेट देण्यास लोकपुढारी आळस करीनासे झाले. हुदलीमध्यें अनेक जातींचे व धर्मांचे लोक असले तरी लिंगायत, वैरड व मुसल्मान बंधूंची संख्या अधिक आहे. म्हणून १९२९ मध्यें बसवजयंतीहि साजरी करण्यास प्रारंभ करण्यांत आला. ज्या वस्तीमध्यें आपण काम करतों तेथील लोकांच्या जातींची व धर्मांची इत्थंभूत माहिती कार्यकर्त्या सेवकानें करून घेतलेली असणें अत्यंत आवश्यक आहे, असें गंगाधररावांचें मत होतें. एकदां सुरू झालेला हा बसवजयंतीचा उत्सव आजतागायत चालू आहे. त्यासाठीं कांहीं स्थानिक लिंगायत विद्यार्थी बसवाच्या जीवनाचा व विचारांचा अभ्यास करूं लागले आहेत उपर्युक्त दोनतीन महत्त्वाच्या गोष्टींमुळें गांवचा चेहराच बदलत चालला होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१५.

## धामव्वा देवीची स्वराज्ययात्रा

हुदली गांवामध्यें वीस वर्षांनीं एकदां धामव्वा (महालक्ष्मी) देवीची जत्रा भरविण्याचा प्रघात आहे. कर्नाटकांतील ही धामव्वा म्हणजे महाराष्ट्रांतील महालक्ष्मी आहे. या देवीच्या जत्रेमध्यें देवीच्या महारथाची मिरवणूक काढण्यांत येते. हा रथ ओढण्यासाठीं गांवांतील सर्व लहानथोरांचा हात लागतो. रेड्याचा बळी गांवाच्या वतीनें मोठ्या समारंभानें दिला जातो. इतर लोकांकडून आपापल्या नवसाप्रमाणें अगर घरांत येणाऱ्या पाहुणेमंडळींच्या धार्मिक इच्छेप्रमाणें कोंबडीं बकरीहि बळी पडतात. ही जत्रा चारपांच दिवस चालते. जत्रेला आसपासच्या खेड्यांतून शेकडों लोक उपस्थित राहतात. लोकांना लागणाऱ्या आवश्यक अशा वस्तूंचीं दुकानें लागतात. मेवामिठाईच्या दुकानांचीं पालें पडतात. लहान मुलांचीं खेळणीं विक्रीला येतात. खेड्यांतील पाळणे आणि फिरतीं चक्रें थोरांमोठ्यांनाहि करमणुकीचीं केंद्रें वाटतात व ते त्याची मौज लुटतात. एखादा खेळ ऊर्फ नाटकहि रंगतें. हजारों रुपयांची घडामोड त्या ४।५ दिवसांत होते. सारांश, हें जत्रेचें क्षेत्र म्हणजे एक टुमदार शहरच बनतें आणि हे यात्रेचे दिवस त्या संबंधित खेड्याला अतीव आनंद देतात.

या चार दिवसांच्या आनंदासाठीं त्या खेड्यांतील लोक जवळजवळ वर्षभर राबत असतात. यात्रेसाठीं रथ तयार करविण्याचे कामीं गांवांतील व बाहेरीलहि अनेक सुतार वर्षभर विनावेतन काम करतात. रथ मोठमोठीं चित्रें काढून शृंगारण्यांत येतो. हीं चित्रें सुद्धां खेड्यांतीलच कसबी रंगारी अल्पखर्चानें तयार करून देतो. जत्रेंत लहानमोठीं मातीचीं गाडग़ीमडकीं व इतर भांडींकुंडीं मोठ्या प्रमाणावर विकलीं जातात म्हणून गांवचे व अन्य खेड्यांतील कुंभार तीं रात्रंदिवस घडवीत असतात. गांवांतील बहुतेकांच्या घरीं पाहुण्यांची गर्दी होते. या जत्रेच्या वर्षी तरी लहानथोरांना फुरसद कशी ती नसते. सर्व गांव लोकांनीं व लोकांच्या कामानें सारखा खणखणत असतो. गांवांत चैतन्य संचारतें. गांवांतील जनतेचा जिवंतपणा उफाळत

असतो. सधन लोकांना जत्रेसाठीं मोठ्या रकमेनें वर्गणी द्यावी लागते व गरिबांकडूनहि गांवचे पंच त्यांच्या त्यांच्या कुवतीप्रमाणें वर्गणी घेतात. ही वर्गणी कोणीहि नाकारीत नाहीं व वसुलीसाठींहि खळखळ होत नाहीं. सारा आपखुषीचा व्यवहार होतो. आणि यामव्वा देवीच्या भीतीनें या व्यवहारांतील सर्व पै न् पैचा हिशेब राहतो. कोणीहि त्यांत अफरातफर करीत नाहीं.

सन १९३१ सालीं वीस वर्षांनंतर आलेली ही जत्रा आपण पुढाकार घेऊन पंचांकडून करवावी असें गंगाधररावांनीं ठरवलें. त्यांत मोठ्या जोडीदार पैलवानांच्या कुस्त्याहि करविण्याचा निर्णय घेण्यांत आला. गांधीजींच्या नवीन विचाराप्रमाणें या जत्रेमध्यें रेडा, बकरी, कोंबडी, कबुतरें बळी देण्याची प्रथा बंद करविण्याचा निश्चय गंगाधररावांनीं केला होता. यांतील हिंसाचाराची धार्मिक व सामाजिक कल्पना सोडून देणें धार्मिक वृत्तीच्या सामान्य लोकांना फार कठीण जातें. गंगाधरराव हुदलीमध्यें आले कीं असल्या चर्चांना ऊत येत असे. ज्यांचें जीवितच गंगाधररावांवर अवलंबून होतें अशा लोकांनीं प्राणीबलिदानाच्या कल्पनेचा त्याग करण्याचें मान्य करण्यास वेळ घेतला नाहीं. गांवच्या पंचांकडून महत्प्रयासानें ही पुण्य गोष्ट किंवा परिवर्तन गंगाधररावांनीं घडवून आणलें. गंगाधररावांच्या जमिनी लावणीनें करणाऱ्या त्यांच्या दोन अडीचशें रयतांनींहि या सदाचारास अनेक कारणांनीं संमति दिली. गांवांतील अज्ञानी गरीब जनता 'महाजनो येन गतः स पंथाः' या न्यायानें या लोकांच्या पावलावर पाऊल ठेवून चालण्यास तयार होत असते हें सांगावयास नकोच. या नवीन विचाराचा थोडासा प्रचार व चर्चा कानडी–मराठी वृत्तपत्रांतूनहि यथाक्रम त्यावेळीं झालेली होती.

या महाजत्रेमध्यें हुदलीगांवच्या बहुतेकांच्या घरीं बाहेरगांवचे आप्तइष्ट, स्नेही-सोबती, हौशी बघे लोक, नवशी माणसें आणि या धांदलींत लग्गा साधणारे गवरी असे विविध लोक आले होते. या सर्वांचा खर्च गांवांतील श्रीमंत लोक हौसेनें, आनंदानें, व धार्मिक बुद्धीनें सहन करीत असतात. त्यांना मदतीची जरुरी वाटत नाहीं. परंतु गांवांतील गरीब लोक व विशेषतः हरिजन बंधु यांना पाहुण्यांचा हा बोजा झेपण्यासारखा नसतो. अशा कुटुंबांची यादी करून आणि त्यांच्या घरीं किती पाहुणे येण्याचा संभव आहे अथवा यापूर्वीच्या महायात्रेंत कोणत्या कुटुंबांत किती पाहुणे आले होते, याचा विचार करून त्या सर्वांच्या घरीं त्या प्रमाणांत दरमाणशीं शिधा पोचविण्याची प्रथा आहे. ही जबाबदारी गंगाधररावांनीं आपल्या अंगावर घेतली होती. महायात्रेच्या आधीं एक आठवडा हा शिधा घरोघर पोचविला जातो. शिध्यामधें मीठ मिरची, तेल गुळापासून गहू–तांदळापर्यंतच्या सर्व वस्तूंचा समावेश असतो. या आनंदाच्या समयीं प्रत्येकाचें तोंड गोड व्हावें हाच यांत हेतु असतो. गांवांतील जनतेमध्यें सलोखा निर्माण करण्याचा हा किती उत्तम मार्ग आहे बरें !

या जत्रेमध्यें दोन दिवस लहानमोठ्या पैलवानांच्या कुस्त्याहि होत असतात. या कुस्त्यांची जबाबदारीहि गंगाधररावांनीं स्वीकारली होती. त्यासाठीं कोल्हापुराहून कांहीं पेहेलवान आले होते. पंचवीस रुपयांपासून दोनशें रुपयांपर्यंत पैलवानांना तयारीच्या खुराकासाठीं आधीं तीनचार महिने द्यावे लागत. त्यावेळीं छोटा मिया व तेरदाळ शिद्दा यांची प्रसिद्ध कुस्ती या जत्रेमध्यें झाल्याचें मला आठवतें. आजच्या सभा, संमेलनें, परिपदांप्रमाणें भिन्न भिन्न कामांसाठीं समिती नेमण्याची प्रथा त्या वेळीं नव्हती. प्रत्यक्ष कुस्त्यांतील फडामध्यें व्यवस्था राखण्यांत माझा हात होता, एवढें मला आठवतें; कारण मी कुस्ती खेळणारा ना!

हातामध्यें एक वेताची काठी घेऊन गंगाधरराव कुस्तीच्या विस्तीर्ण खणामध्यें फिरत असलेलें दृश्य माझ्या डोळ्यांसमोर आजहि उभें राहतें. कुस्तीच्या खणामधून कोणी इकडून तिकडे जातांना त्यांना दिसल्यास, तो इसम खणाच्या बाहेर पोहोंचेपर्यंत त्याला गंगाधरराव वेताच्या छडीनें मारून पिटाळीत असत. अशीं एकदोन उदाहरणें झाल्याबरोबर मैदानाला आपोआप शिस्त लागली. सरकारी पोलीसपार्टीहि व्यवस्थेसाठीं हजर होती. परंतु त्यांना केवळ प्रेक्षकच म्हणून गंगाधररावांनीं उभें केलें होतें. कुस्तीच्या खणांत एकाहि पोलिसाला किंवा पोलीस अधिकाऱ्यास त्यांनीं येऊं दिलें नाहीं व तेहि तसलें धाडस करण्याच्या भानगडींत पडले नाहींत.

जसजशी ही महायात्रा जवळ येत गेली तसतशी गांवची व्यवस्थाहि पूर्ण होत गेली. रथ बांधून आणि श्रृंगारून तयार झाला. गांवांतील गरीब कुटुंबांच्या यादी-प्रमाणें त्यांच्या घरीं शिधा पोहोंचविण्यांत आला. दुकानें उभारूं देण्याची जागा व व्यवस्था पुरी होत आली. गांवांतील व आजूबाजूच्या खेड्यांतील तरुणांना स्वयंसेवक म्हणून नोंदविण्यांत आलें. आश्रमांतील लोकांच्याकडे स्वच्छतेचें काम सोपविण्यांत आलें होतें. गंगाधररावांच्या घरीं पंचांच्या बैठकी रोज, एखादा लहानमोठा प्रश्न उपस्थित होतांच, भरूं लागल्या. गंगाधरराव कांहीं दिवस हुदलीमध्येंच राहावयास आले होते. अशीं अनेक कामें गांवचे पंच करीत असल्यामुळें त्यांच्यामध्यें संघटनाशक्तीचा विकास झालेला आहे. गांवांतील लोकहि पंचांचा निर्णय सहसा धुडकावून लावण्यास धजत नाहींत. ही पंचांची शक्ति, व 'पांचामुखीं परमेश्वर' कल्पना व त्यांचें स्थान मरूं देतां उपयोगी नाहीं, तें जतन करून ठेवलें पाहिजे असें गंगाधररावांचें मत होतें. एका विशिष्ट मतभिन्नतेला चर्चा-भांडण वा विरोधाचें स्वरूप आलें असतां, गंगाधर-रावांच्या विरुद्ध जनतेंतील कांहीं लोकांनीं गांवच्या पंचांकडे दाद मागितली. गंगाधर-रावांनीं पंचांपुढें आपलें म्हणणें मांडलें होतें. पंचांचा निर्णय गंगाधररावांच्या विरुद्ध गेला आणि त्यांना पंचांनीं दंडहि केला; व त्यांनींहि तो सामान्य लोकांप्रमाणें पंचांकडे भरलेला आहे.

अशा रीतीनें महायात्रेची बहुतेक तयारी झाली. त्या इंग्रज रियासतीच्या काळांत एका मामलेदारांना गंगाधररावांना धडा शिकवण्याची बुद्धि झाली. महायात्रेची

होत असलेली सर्व तयारी ते मामलेदार पहात होते. अगदीं आयत्या वेळीं ही यात्रा बंद पाडावी असें त्या मामलेदारानें ठरवलें होतें, याची गुणगुण गंगाधररावांना लागली होती. म्हणून गांवच्या पंचांकडूनच सर्व कामें ते करवीत असत, ऑफिशियली ते पंचांचा निर्णय हा शेवटचा निर्णय मानीत असत. ही व्यवस्थाहि मामलेदारसाहेबांना माहीत झाली होती. या मामलेदारांनाहि आपली योग्यता व स्थान दाखवावें व त्यालाहि त्याच्या सत्तेच्या मर्यादा दाखवाव्यात असें गंगाधररावांनीं मनाशीं ठरविलें होतें. सर्व पंचांना त्या मामलेदाराकडून अशी नोटीस आली कीं 'रोगराई फैलावण्याचा संभव दिसत असल्यामुळें ही महायात्रा बंद करण्यांत आली आहे.' ही नोटीस महायात्रेच्या आदल्या दिवशींच सर्व पंचांना देण्यांत आली. सर्व पंच गंगाधररावांच्या वाड्यांत जमा झाले. त्या नोटिशीचा त्या बैठकींत विचार झाला, व मामलेदारांची नोटीस मानावयाची नाहीं असा पंचांनीं निर्णय घेतला. नोटीस बजावण्यासाठीं आलेला कारकून व अधिकारी गंगाधररावांच्या घरींच राहिले. त्यांच्याबरोबर आलेल्या पोलिसांची राहण्याची व खाण्यापिण्याची व्यवस्था करण्यांत आली. त्यांना यात्रा संपेपर्यंत बेळगांवला परत जाऊं दिलेंच नाहीं. ते कारकून व अधिकारीहि मनांतून लोकांच्याच बाजूचे होते. तेव्हां त्या दृष्टीनें मुळींच त्रास किंवा आडकाठी आली नाहीं. गंगाधररावांनीं पंचांना स्पष्ट कल्पना दिली होती कीं हें प्रकरण वाढणार व पंचांवर खटले भरले जाणार. तथापि खटले कोर्टांत चालविण्यास, अन्य जी मदत लागेल ती करण्यास, आपण स्वतः तयार आहों, असें आश्वासनहि गंगाधररावांनीं पंचांना दिलें होतें. या सरकारविरोधी लढ्यामुळें गांवामध्यें मल्लाच उत्साह आला. दुसऱ्या दिवशीं म्हणजे महायात्रेच्या पहिल्याच दिवशीं रथाची रीतसर पूजा होऊन रथ ओढण्यास प्रारंभ झाला. अधिकाऱ्यांनीं मामलेदाराची नोटीस रथासमोर पुन्हा वाचून दाखविली. रथाच्या दोराला गंगाधररावांनीं व पंचांनीं प्रथम हात लावला आणि महात्मा गांधींच्या जयजयकारांत रथ सरकूं लागला. सकाळीं दहा वाजतांना रथ ओढण्यास प्रारंभ झाला आणि रथ इष्टस्थानीं जाऊन पोहोचण्यास दोन प्रहरचे चार वाजले. वाटेंत एक खड्डा होता तो शेकडों लोकांनीं माती टाकून एकदोन तासांत बुजवला व तो प्रचंड रथ तेथूनच नेण्यांत आला. पुढें चार दिवस ही महायात्रा चालली. यथासांग सर्व धार्मिक विधी व कामें झालीं. कोणत्याहि प्रकारची रोगराई फैलावली नाहीं. या महायात्रेला सर्व जनतेनें स्वयंस्फूर्तीनें 'स्वराज्य यात्रा' असें नांव दिलें. गांवांतील आणि बाहेरून आलेल्या सर्व लोकांनीं या चार दिवसात खेळ, पोवाडे, भजनें, कुस्त्या यांचे भरपूर मनोरंजक कार्यक्रम केले व आनंदाची पेठ खुली केली.

पण या प्रसंगांतील खरें वाळतपण व खरी अडचण यानंतरच सुरू झाली. सर्व पंचांवर खटले भरण्यांत आले. गंगाधररावांच्या वाड्यांत पंचांच्या बैठकी रोज भरूं लागल्या. बेळगांवमध्येंहि बेळवी, भीमराव पोतदार यांच्याशीं कायदेशीर सल्लामसलती सुरू झाल्या. आपली बाजू लंगडी आहे, हें मामलेदारसाहेबांच्या ध्यानीं

आल्यामुळें म्हणा किंवा अनेक कायदेपंडितांनीं तसा सल्ला त्यांना दिला म्हणून म्हणा, मामलेदारसाहेबांनीं पंचांविरुद्ध सुरू केलेल्या कारवाईला जोर येऊं शकला नाहीं. कोर्टामध्यें रीतसर खटला चालू झाला. पंचांच्या बाजूनें के. श्री. अनंतराव मंडगी काम चालवीत होते. निश्चित कालावधीनंतर नेहमीं होणाऱ्या जत्रांना किंवा धार्मिक सामुदायिक कार्यक्रमासाठीं सरकारी परवानगी विचारणें आवश्यक नसतें. केवळ मामलेदारांना त्याची बातमी दिली म्हणजे काम भागतें असा तेव्हां कायदा होता किंवा तसा रिवाज निघाला. तशी बातमी गांवच्या पोलीसपाटलांनीं सरकाराकडे दिलीहि होती. एवढेंच नव्हे तर यात्रेच्या तयारीची माहिती वेळोवेळीं कळविली असल्याचें कोर्टाच्या नजरेस आल्यामुळें, कोर्टानें पंचांना निर्दोषी ठरवून खटल्याचा निकाल दिला. श्री. बसन गौडा पाटील, श्री. बारिमनी निंगाप्पा, श्री. करबसु, श्री. शिवरायी खणगोपी आणि लक्ष्मण पत्तार हे त्यावेळीं ग्रामपंच होते. यांत लक्ष्मण पत्तार याची सही चुकून करविली गेली होती. वास्तविक सदर पत्तार हा सरकारचा हस्तक होता. तथापि गांवांतील वातावरण ध्यानांत घेऊन ते इतर पंचांना धरून व त्यांच्याच कलानें वागलेले आहेत. मामलेदारसाहेबांना मात्र या ग्रामन्याच्या महायात्रेची आठवण कायम ध्यानांत राहाण्याजोगी झाली व गंगाधररावांची ओळखहि न विसरण्यासारखी पटली.

१६.

## व्याख्यान देण्याचें शिक्षण

मी व माझे एक स्नेही कै. वामनराव देसाई विद्री दोघे अनेक वेळां गंगाधररावांना विचारीत असूं कीं आम्हांला तुमच्यासारखें व्याख्यान देण्यास कां शिकवीत नाहीं. एकदां त्यांच्या मनानें विनोद करण्याचें ठरवलें. आजपासून तुम्हांला व्याख्यान देण्यास मी शिकवणार आहें असें तें म्हणाले. रात्रीं भोजन झाल्यानंतर सभा भरवण्यांत आली. अध्यक्षस्थानीं गंगाधरराव, आम्ही दोघे वक्ते आणि श्रोतृगण म्हणून घरांतील आचारी अशी सभा धारली. अध्यक्ष आपल्या पलंगावर झोपूनच बोलत होते. अध्यक्ष म्हणजे 'सभापति' असल्यामुळें, तो वाटेल तेथें बसेल किंवा आडवाहि होईल अशी सुरवात करून अध्यक्षाचे अधिकार काय काय असतात ते सर्व त्यांनीं आम्हांला समजून सांगितले. 'राष्ट्रीय शिक्षण' हा व्याख्यानाचा विषय होता. चारपांच मुद्दे त्यांनीं आम्हा दोघांना लिहून घेण्यास सांगितले. प्रत्येक मुद्यावर बोलावयाचें तें सर्व अध्यक्षांनीं बोलूनहि दाखविलें आणि शेवटीं आम्हांस सांगितलें 'पुढें चार हजार श्रोतृसमाज बसला आहे, असें कल्पून मोठ्यानें ओरडून बोला!' पुढें एकच मनुष्य बसला असतांना चार हजार माणसें बसलीं आहेत असें कल्पून बोलतां येणें मला कठीण वाटलें. मी म्हटलें, प्रथम वामनराव बोलतील व मी मग बोलेन. माझे मित्र वामनराव खरोखरच मोठ्यानें ओरडून अर्धा तास कानडीमध्यें बोलले. नंतर माझी पाळी आली. परंतु माझ्यानें बोलवेना. माझा आवाजच चढेना. मनांत असूनहि भाषण मोठ्यानें ओरडून करणें मला जुळेना. 'हें मला शक्य नाहीं' असें म्हणून मी खालीं बसलों. गंगाधरराव म्हणाले, 'वामनरावांना बोलण्यास लावून त्यांची मौज पाहिली व आणि आतां तूं बोलत नाहीस हें चांगलें नाहीं. तूं मोठ्या आवाजांत पांच मिनिटें तरी बोल.' रात्रीं एक तासपर्यंत त्यांनीं मला समजावण्याचा प्रयत्न केला, विनंती केली, प्रार्थना केली आणि शेवटीं कशाचाच कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून आम्हा दोघानाहि त्यांनीं झोपायला जाण्यास सांगितलें. त्या रात्रीं मला झोप आली नाहीं. पुढें एक महिनाभर

मी गंगाधररावांच्या बरोबरच राहत असूनहि ते माझ्याबरोबर बोललेच नाहींत. मला तें असह्य झालें. त्यांना सोडून जाण्याचा निर्धार मी केला, व एके रात्रीं त्यांना तसें कळवलें. त्यावर 'ही शिक्षा तुला फारच कठोर झाली' असें म्हणून त्यांनीं माझी क्षमा मागितली. पण माझें मन दुखावल्यामुळें मला त्यांच्याकडे राहावें असें वाटेना. त्यांना सोडून गेल्यावर गीतेवर प्रवचनें देत हिंडावें असें ठरवून महाराष्ट्र व वऱ्हाडभर मी दौरा काढला. त्या काळीं तपस्वी बाबासाहेब परांजपे यांनीं वऱ्हाडांतील साठसत्तर पुढाऱ्यांचीं नांवें व पत्ते मला देऊन त्या सर्वांना दाखविण्यासाठीं एक परिचय-पत्र देऊन ठेवलें होतें. वऱ्हाडांत कोठेहि फिरण्यास तो पासपोर्ट किंवा खुला परवानाच होता. कांहीं दिवस त्या प्रकारें हिंडल्यावर पुनः गंगाधररावांच्याकडे जावें असें मला वाटूं लागलें. आणि त्यांनाहि मी परत त्यांच्याकडे यावें असें वाटत होतें. परंतु दोघेहि आपापली इच्छा स्पष्टपणें एकमेकांस कळविण्याचें टाळत होतों. शेवटीं महात्माजींच्या अनुज्ञेप्रमाणें मी साबरमतीहून बेळगांवास परत आलों. हा चार महिन्यांचा काळ आम्हां दोघांच्याहि मानसिक अस्वस्थतेमध्येंच गेला. त्याकाळचीं त्यांचीं मला आलेलीं पत्रें मी 'अनुग्रह' पुस्तकामध्यें दिलेलीं आहेत.

१७.

## सन १९३२ चा स्वातंत्र्याचा लढा

सन १९३२ सालचा स्वातंत्र्याचा लढा चांगलाच रंगला होता. त्यांत कर्नाटकानें मोठ्या हिरीरीनें भाग घेतला होता. विशेषतः बेळगांव जिल्ह्यानें त्या लढ्यामध्यें आपल्या परंपरेला जागून उत्तम कामगिरी बजावलेली आहे. परंतु तो सर्व इतिहास मी येथें देत नाहीं. केवळ हुदली गांव व हुदलीजवळील 'कुमरी-आश्रम'कडून या लढ्यामध्यें जें कार्य झालेलें आहे तेवढ्याचीच माहिती मी येथें देत आहें.

१९३० च्या मिठाच्या सत्याग्रहापासून या लढ्याला रंग चढत चालला होता. एका व्याख्यानाला कै. गु. गंगाधरराव रत्नागिरीला गेले होते. तेथून परत येतांना तेथील बेकायदा मीठ आपल्या मोटारकारमधून त्यांनीं बेळगांवास आणलें होतें. ता. ६ एप्रिल या दिवशीं कर्नाटकामधील पहिला मिठाचा सत्याग्रह गंगाधरराव यांनीं बेळगांव मार्केटमधील सभेमध्यें तें मीठ विकून केला. हा बेकायदा मीठ विकण्याचा पहिला मान गंगाधररावांना मिळाल्याबद्दलहि कर्नाटकांतील कांहीं पुढाऱ्यांनीं थोडीशी कुरकुर केली होती. गंगाधररावांनीं विकलेलें बेकायदा मीठ श्री. नारायणराव जोशी वकील यांनीं विकत घेतलें होतें. म्हणून दोघांनाहि अटक झाली. मी स्वतः ता. १३ एप्रिल रोजीं मार्केटमध्यें जाहीर सभेंत बेकायदा मीठ विकून सत्याग्रह केला होता. अर्थात त्या दिवसापासून हुदलीजवळील कुमरी आश्रमानें चळवळीचें निशाण फडकविलें होतें. आश्रमाचें मामुली काम स्थगित करण्यांत आलें. सर्व सामानसुमान, कागदपत्र, पुस्तकें आणि आश्रमांतील भांडींकुंडीं यांची व्यवस्था लावण्यांत आली. केवळ एका सैन्याच्या तळाचें स्वरूप आश्रमाला देण्यांत आलें. पांचपंचवीस लोकांना स्वयंपाक करून भोजन करतां येईल एवढीच व्यवस्था आश्रमामध्यें शिल्लक ठेवली होती. आश्रमाच्या जमिनीमध्यें त्यावेळीं केळीची बाग होती. सुमारें पांचशें केळीचीं झाडें होतीं. सत्याग्रहींना भात, भाजी, केळीची शिकरण, तूप, चपाती एवढें जेवण मिळत असे. म्हणजे ते सत्याग्रही आपल्या हातांनींच स्वयंपाक तयार करून घेत असत. या आश्रमांतूनच

एकेका सत्याग्रहीला त्याच्या वैयक्तिक विशिष्ट कामगिरीची योजना आंखून पाठविण्यांत येत होती. कोर्टामध्यें एका सत्याग्रहीला 'तुम्ही भोजन कोठें करतां व काय काय खात असतां?' असा प्रश्न विचारण्यांत आला. त्यानें आश्रमांतील कार्यक्रम व सत्याग्रहीच्या भोजनाचा 'बेत' सांगून टाकला. तेव्हांपासून हुदली गांवांतील सत्याग्रही पकडला जाऊन तो कोर्टात हजर होईपर्यंत जे जाबजबाब होत आणि पुढें कोर्टाच्या जबानींतहि या कुमरी आश्रमांतील 'तूप-शिकरण-पोळीचा' उल्लेख आल्याशिवाय राहात नसे. बेळगांव जिल्ह्यांतील अन्य ठिकाणच्या सत्याग्रहींना देखील 'कुमरी आश्रमांतील तूप-शिकरण-पोळी खावयास गेला नव्हतां काय?' असा प्रश्न सरकारी वकील विचारीत असत.

श्री. वामनराव देसाई यांच्या नेतृत्वाखालीं एक तुकडी बैलहोंगल भागांत, श्री. वडवी यांच्या मुखंडत्वाखालीं, दुसरी तुकडी गोकाक तालुका व अथणी तालुका येथें, आणि श्री. केशवराव गोखले हे आपल्याबरोबर चिक्कोडीच्या सत्याग्रही तुकडीला घेऊन शिरोड्यास गेले. श्री. शिवराव कोप्पळ व डॉ. कोवाडकर यांनीं आपापल्या तुकड्या घेऊन नियतस्थळीं प्रयाण केलें. बेळगांवास सत्याग्रहीची जी छावणी उघडण्यांत आली होती त्याची योजना व तेथील व्यवस्था श्री. पुंडलीकजी व डॉ. कोवाडकर पहात होते. या छावणींतील सर्व सत्याग्रहींच्या हातीं बेकायदा मीठ देऊन त्यांचा एक सामुदायिक ग्रूप फोटो काढविण्याची टूम निघाली. पण ही गोष्ट पोलिसांना समजली व ते पाळतीवर राहिले. हा ग्रूप फोटो टिळकवाडी येथें घेण्यांत येणार आहे अशी हूल उठवून तो फोटो सत्याग्रहींच्या छावणीबाहेरच एका बाजूला घेण्यांत आला व अशा प्रकारें पोलिसांना चकविण्यांत आलें.

या सत्याग्रहाच्या छावणीची सर्व व्यवस्था आपल्या शिरावर घेणारे श्री. दे. भ. शिवराव कोप्पळ यांची थोडीशी माहिती या ठिकाणीं देणें माझें मी कर्तव्यच मानतों. श्री. दे. भ. शिवराव कोप्पळ हे एक कॉंग्रेसचे एकनिष्ठ सेवक आणि बेळगांवच्या 'तरुण भारता'चे एक जिवलग स्नेही. स. १९०८ पासून तों १९३५ पर्यंत अनेक आपत्तींशीं-कौटुंबिक व सार्वजनिक-तोंड देऊन स्वातंत्र्याच्या सर्व चळवळींमध्यें त्यांनीं हिरिरीनें भाग घेतलेला आहे. लोकमान्यांची 'होमरूल'ची चळवळ असो, किंवा *महात्मा गांधींची 'असहकारिते'ची चळवळ असो, शिवराव नेहमीं स्वातंत्र्यासाठीं* होणाऱ्या आंदोलनाच्या बिनीवर असावयाचे! सर्व कुटुंबच्या कुटुंबच चळवळीमध्यें भाग घेणारीं कांहीं कुटुंबें बेळगांव जिल्ह्यामध्यें आहेत, त्यांपैकींच श्री. शिवराव कोप्पळ यांचें एक कुटुंब होय. सन १९२१ सालीं 'तरुण भारता'चे संपादक श्री. बाबुराव ठाकूर याच्यासमवेत श्री. शिवराव कोप्पळ यांना पिकेटिंगबद्दल पहिली शिक्षा झाली. त्या सालीं क्रिमिनल कैद्यांच्या उपद्रवामुळें सरकारला तुरुंगांत गोळीबार करावा लागला होता. त्यावेळीं श्री. शिवराव व बाबुराव तुरुंगांत होते. स. १९३० सालीं कायदेभंगाच्या कॉंग्रेसच्या चळवळींत शिवरावांना नऊ महिन्यांची शिक्षा झाली होती.

स. १९३२ मध्यें गांधीजींच्या चळवळींत त्यांना अठरा महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. श्री. शिवराव मूळ हल्याळचे रहिवासी होते. त्यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालेलें होतें. लहानपणापासूनच त्यांना गाण्याचा व नाटकांचा नाद होता. सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय नट श्री. दत्तोपंत हल्याळकर यांचे ते भाचे होते. श्री. शिवराव उत्तम नकलाकारहि होते. बेळगांवमध्यें प्रथम कांहीं दिवस त्यांचें एक कापडाचें दुकान होतें. ते आपल्या दुकानामध्यें परदेशी कापड विक्रीला ठेवीत नसत. त्यांचा स्वभाव निर्भीड, निःस्पृह, आणि करारी होता. अपमानाची व अन्यायाची त्यांना भयंकर चीड होती. कॉंग्रेसचें कार्य प्रथम आणि प्रपंचाची चिंता नंतर, अशी त्यांच्या कुटुंबांतील सर्वांचीच वागणूक होती. कोणत्याहि सार्वजनिक कार्यांत ते कमी लेखत नव्हते. कॉंग्रेसचे ते एक खरे शिपाईगडी, किंबहुना सरदार होते. त्यांचा स्वदेशाभिमान जाज्वल्य होता. ते शिस्तीचे भोक्ते होते. कॉंग्रेसनें 'मिठाचा सत्याग्रह' आंदोलनासाठीं उघडलेल्या सत्याग्रहींच्या शिबिरांत त्यांच्यामुळें मिलिटरी शिस्त राखण्यांत आली होती. त्यांच्या देशसेवेचें व्रत त्यांचे चिरंजीव श्री. सदानंद कोप्पळ यांनीं निष्ठेनें चालू राखलेलें आहे. स्वातंत्र्याच्या सर्व चळवळींमध्यें व पुढें संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनामध्यें व पुढें महाराष्ट्र-म्हैसूर लढ्यामध्यें चि. सदानंद कोप्पळ यांनीं वडलांच्या लागणीनें व हिरिरीनें भाग घेतलेला आहे. श्री. शिवराव कोप्पळ यांचें ता. १२ फेब्रुवारी १९३५ रोजीं अकालीं निधन झालें. त्यांची जागा सहजासहजीं भरून निघणें शक्यच नव्हतें. तथापि त्यांच्या चिरंजिवानें ती पोकळी बऱ्याच अंशीं भरून काढलेली आहे.

थोड्याच दिवसांत कुमरी आश्रम जप्त करण्यांत आला. तेथें पोलीसपार्टी ठेवण्यांत आली. तेव्हां पोलीस तेथील केळीं खाऊं लागले. कांहीं पोलिसांनीं तर केळीच्या घडांचा व्यापारहि केला. आश्रमांतील सागवानी खांब, तुळ्या, चौकटींचीं दारें वगैरे मोडून त्याचें फर्निचर करूनहि कांहीं पोलिसांनीं पळविलें. या काढलेल्या लाकडाच्या जागीं जंगलांतील लाकडें आणून उभीं केलीं. आश्रमांतील कार्यकर्ते हुदली गांवांतच भूमिगत राहून तें सर्व उघड्या डोळ्यांनीं पहात पण चळवळीकडे लक्ष देऊन त्यांनीं त्याचा प्रतिकार केला नाहीं.

हुदली गांवांतील त्यावेळचे पोलीस पाटील श्री. बसनगौडा पाटील यांनीं चळवळीस फारच मदत केलेली आहे. गंगाधररावांनीं तुरुंगांत जाण्यापूर्वी गांवांतील सर्व जाणत्या लोकांना "हा शेवटचा लढा आहे, यांत आम्हांला यश मिळणारच आहे. आपण सर्वांनीं आपापल्या कुवतीप्रमाणें मदत करण्यास पुढें यावें आणि कोणाची विशेष कुचंबणा असेल तर करामत करून दाखवावी. या स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासांत हुदलीचें नांव सोनेरी अक्षरांनीं लिहिलें जाईल असें करावें." असें कळकळीचें आवाहन केलें होतें. श्री. बसनगौडा पाटील यांनीं आपल्या हिंमतीवर धैर्यानें पण समयसूचकतेनें अनेकांची मालमत्ता व जीवित त्याकाळीं संभाळलेलें आहे. कोणाच्याहि घरावर दंडाच्या वसुलीसाठीं जप्ती येणार असल्यास त्याची आगाऊ खबर देण्यास त्यांनीं कधीं

कसूर केली नाहीं. घरची सर्व मालमत्ता, चीजवस्तू आणि बायकामुलें घरांतून हलविण्याचें काम पूर्ण झाल्यानंतरच पोलिसांना त्या घराकडे ते जप्तीसाठीं घेऊन जात. सत्याग्रहींना पकडण्यासाठीं 'झडती वॉरंट' येणार असल्यास त्याचीहि आगाऊ बातमी सत्याग्रहींना मिळत असे. हुदली गांवामध्यें होणाऱ्या व्याख्यानांचे रिपोर्ट त्या त्या सत्याग्रहींना दाखवूनच ते सरकाराकडे रवाना होत असत.

१८.

## अध्यक्षांना दोन वर्षे पण व्याख्यात्याला चार महिनेच सक्तमजुरीची शिक्षा

आश्रमामध्यें श्री. भास्कर विष्णु काळे तथा दादा काळे बी. ए. हेहि आश्रमांतील एक कार्यकर्ते असल्यामुळें त्यांची थोडीशी माहिती येथें देणें आवश्यक आहे. दादांचें कॉलेजचें शिक्षण पुण्यामध्यें झालेलें आहे. त्यांना कानडीहि चांगलें येतें. संस्कृत, गणित, खगोलशास्त्र, हे त्यांचे आवडीचे विषय आहेत. संस्कृत रघुवंश मी त्यांच्यापाशींच वाचला. देशसेवेला आपलें आयुष्य त्यांनीं वाहून घेतलें असल्यामुळें ते अविवाहित राहिले. ब्रह्मचर्य पालन करून एखाद्या तपस्वी जनाप्रमाणें ते राहात असत. प्रथम सुळधाळ खेडें त्यांनी आपलें कार्यक्षेत्र म्हणून निवडलें होतें. त्याकाळीं सर्व विधायक काम या आश्रमामार्फत होत असत, किंवा आश्रमांत तयार झालेले व आश्रमांत संस्कार घेतलेले कार्यकर्ते बाहेर जाऊन विधायक कार्य आपापल्या ठिकाणीं करीत असत. त्यांच्या यशाचें मोजमाप, त्यांच्या त्यांच्या क्षेत्रांतून किती सत्याग्रही किंवा कार्यकर्ते जातीनें चळवळींत पडून तुरुंगाची यात्रा आनंदानें व निर्भयतेनें करूं शकले, यावरून अजमावलें जात असे. दादा ज्या ज्या गांवीं राहावयास गेले त्या त्या ठिकाणीं अशा प्रकारचे कार्यकर्ते व विधायक कार्याचें केंद्र त्यांनीं निर्माण करून दाखविलें आहे. चळवळीं-मध्यें कार्य करतांना तुरुंगांत जाणें व चळवळ नसेल त्या वेळीं एखाद्या विधायक कार्यामध्यें आपल्याला गुंतवून घेणें, हाच त्यांच्या जीवनाचा कार्यक्रम आहे. मद्यपान-बंदीच्या चळवळींत त्यांनीं मोठी कामगिरी केली आहे. आजहि ते होसूर खेड्यामध्यें विधायक कार्य करीत आहेत. 'दादांच्या स्वभावांतील गोड गमती' हें एक सुरस गोष्टींचें भांडार आहे. त्यांतील एकदोन प्रसंग येथें दिल्याशिवाय मला पुढें जाववत नाहीं.

एकदां दादा आम्हांला नक्षत्रें कशीं निर्माण झालीं याची माहिती देत होते. तेव्हां आश्रमाच्या मध्यामध्यें उसाचें गुन्हाळ चालू होतें. गुन्हाळांतून गरमगरम गूळ आणून तो एका ताटांत ठेवला होता. तें ताट दादांच्या समोरच एका लहान टेबलावर

होतें. आम्ही कांहीं मंडळी त्यांच्या सभोंवतीं खुर्चीवरच बसलों होतों. पृथ्वी झरास्यानें फिरत असतांना त्यांतील एक भलामोठा तुकडा उडाला व तो दूर फेकला गेला. तुकडा कसा फेकला गेला असेल याचें प्रात्यक्षिक त्या ताटांतील गुळावरच ते करून दाखवीत होते. तो उडालेला प्रात्यक्षिकाचा तुकडा ते आपल्या तोंडांत टाकीत व याप्रमाणें तो उडालेला तुकडा अदृश्य होई असें स्पष्टीकरण करीत. अशा प्रकारच्या प्रात्यक्षिकामुळें समोरच्या ताटांतील सर्व गूळ संपला आणि त्याबरोबरच त्या दिवशीचा आमचा वर्गहि संपला. किती गोड होतें हे प्रात्यक्षिक!

असेंच दुसरें एक मजेदार उदाहरण. गंगाधररावांनीं दोन चांगल्या जातीचीं शिकारी कुत्रीं पाळलीं होतीं. तीं दिसत मोठीं पण होतीं पिलेंच. सर्वांचीं जेवणें झाल्यावर आपल्या पानांतच त्या दोन कुत्र्यांच्यासाठीं दोन भाकऱ्या दुधामध्यें बारीक कुसकरून त्या कुत्र्यांना घालण्याचें काम आम्ही सर्वजण आळीपाळीनें करीत असं. एकदां हे काम करण्याची पाळी दादांच्याकडे आली. भोजनप्रसंगीं चर्चा नेहमींच चालते तशी ती आश्रमांतहि चाले. त्या दिवशीं चर्चेला विशेष रंग चढला. त्यामध्यें दादाहि रंगून गेले. ते मोठ्या आवेशांत मेजून बोलत आणि हातानें कुत्र्याची भाकरी कुसकरण्याचें काम करीत होते. पण लक्ष सारें चर्चेंत भरलेलें. त्या आवेशाच्या भरांत त्यांनीं त्या कुत्र्यासाठीं कुसकरलेल्या भाकऱ्या अनवधानानें आपणच केव्हां खाऊन टाकल्या तें त्यांनाच काय पण कुणालाच कळलें नाहीं. आणि नेहमींप्रमाणें चर्चेचा भर ओसरल्यावर आमच्याबरोबर ते उठून गेले. पण इकडे खाण्याची वेळ टळल्यावर कुत्रीं केकाटूं लागलीं. तेव्हां दादांना आठवण झाली. ते धावतच आपल्या पानाकडे गेले; पण तिथें कुठें होती भाकरी! झाला प्रकार दादांच्या लक्षांत यावयाला वेळ लागला नाहीं.

१९३२ च्या चळवळीमध्यें तुरुंगवास स्वीकारण्याची दादांची पाळी आली. हुदलीमध्यें जाहीर भाषण करून सत्याग्रहाचा कार्यक्रम आंखण्यांत आला. कार्यक्रमाची नोटीस सरकारला पोचविली. त्या दिवशीं आमचे एक स्नेही कार्यकर्ते हुदलीस कांहीं विचारविनिमयासाठीं आले होते. जाहीर सभेचे अध्यक्ष म्हणून त्यांनाच निवडण्यांत आलें. दादांचें व्याख्यान झालें. दादा तसे कांहीं मोठे वक्ते नव्हेत. त्यांनीं केवळ गांधी–सिद्धांताच्या दोन गोष्टी सांगितल्या आणि आपलें भाषण त्यांनीं पंधरावीस मिनिटांत संपविलें. आमच्याकडे आलेले स्नेही कार्यकर्ते श्री. बाबुराव कोठावळे, कोल्हापूर, यांनीं सभेच्या प्रारंभीं व्याख्यात्यांना भाषण देण्यास एकाच वाक्यानें विनंती केली व शेवटीं 'सभेचें काम संपलें' या एकाच वाक्यांत सभा संपविली. त्यांना इतक्यांत तुरुंगांत जायचें नव्हतें. भावी अनेक योजना व व्यवस्था अद्यापि त्यांच्याकडून व्हावयाची होती. परंतु पोलीस अधिकाऱ्यांनीं दादा आणि बाबुराव कोठावळे या दोघांनाहि लागलीच अटक केली, त्यांच्यावर रीतसर खटले भरले. ते कोर्टापुढें चालून व्याख्यात्यांना म्हणजे दादांना चार महिने सक्तमजुरी व दंड झाला आणि अध्यक्षांना म्हणजे श्री. बाबुराव कोठावळे यांना दोन वर्षें शिक्षा व दंड झाला. दोघेहि सुखानें तुरुंगांत गेले.

## १९.

## मदवाल जवळील सिंदीचीं झाडें तोडण्याचा सत्याग्रह (१९३१)

सिंदीचीं झाडें तोडण्याचा सत्याग्रह करण्याचा आदेश महात्माजींनीं दिला होता. हुदलीच्या आश्रमानें हुदलींतील तरुणांच्या मदतीनें मदवालमधील सिंदीच्या झाडाचें वन तोडून टाकण्याचा कार्यक्रम आंखला होता. या कामीं हुदली येथील दादासाहेब तथा देवजीकल्लो देशपांडे व श्री. दत्तोपंत अध्यापक यांचा पुढाकार होता. सरकारला तशी नोटीस देऊन कुमरी आश्रमांतील कार्यकर्ते सत्याग्रहास पायीं निघाले. वाटेंत जातांना जीं खेडीं लागलीं त्या त्या ठिकाणचे कार्यकर्तेहि या तुकडीमध्यें समाविष्ट होत गेले. अंकलगीचे श्री. देसाई आपली बंदूक घेऊन 'कोण सिंदीचीं झाडें तोडण्यास पुढें येतो, पहातों' असें जाहीर करून मदवालास पोहोंचले होते. सिंदीचीं तीनचारच झाडें तोडलीं असतील. एवढ्यांत श्री देसाई त्या ठिकाणीं अवतरले. त्यांनीं सिंदीचें वन तोडण्यास उद्युक्त झालेला तो समाज पाहिला. ते गांगरले. त्यांची गाळणच उडाली. मग काय, लोकांनीं त्यांना घेरलें. सत्याग्रही पथकांत सामील झालेल्या उत्साही जनतेनें त्यांचे कपडे काढून त्यांच्या अंगावर खादी चढवली व डोक्यावर खादी टोपी घालविली. त्यांच्या हातची बंदूक वर केव्हांच दूर झालेली होती. तेव्हां त्यांना चार धक्के देण्यासहि कांहीं मंडळींनीं कमी केलें नाहीं. श्री. अध्यापक व श्री. दादासाहेब या पथकपुढाऱ्यांनीं मध्यें पडून श्री. अंकलगी देसाई यांना संरक्षण दिलें, त्यांना वांचविलें. नाहींतर मल्लाच प्रसंग ओढवल्यावांचून राहिला नसता. तथापि झालेल्या अत्याचाराचें खापर पोलीस रिपोर्टमध्यें हुदली आश्रमांतील कार्यकर्त्यांच्या डोक्यावरच फोडण्यांत आलें. हुदलीचे पोलीस पाटील थोरले श्री. बसनगौडा यांनीं आपल्या धैर्यानें व मैत्रल्यानें हुदलीस त्यावेळीं वांचविलें आहे. नाहींतर हुदलीस पोलीसांनीं चांगलेंच भरडून काढलें असतें. या कार्यक्रमाला निघण्यापूर्वी हुदलीमध्ये श्री. अध्यापक यांनीं एक व्याख्यान दिलें होतें. त्या व्याख्यानाचे हुदलीचे पाटील व कुलकर्णी या दोघांनीहि परस्पर-

विरोधी असे दोन अहवाल लिहून सरकारकडे पाठविले होते. सिंदीचीं झाडें तोडण्याच्या बाबतींतील ते रिपोर्ट होते. परंतु शेवटीं पोलीस पाटील यांचा रिपोर्टच सरकारनें खरा व ग्राह्य मानला व त्यामुळेंच गांव बचावला. या प्रकरणीं पोलीस पाटील श्री. बसनगौडा यांनीं 'वाटल्यास आपली कोठेंहि बदली करा अगर माझा राजीनामा घ्या!' अशी निर्भय मागणीहि केली होती. त्याचा उपयोग व परिणामहि झाला, हें त्या वृत्तान्ताला सरकारनें जो मान दिला त्यावरूनच समजण्यासारखें आहे.

२०.

## तीन सरदारांच्या घोड्यावरून मिरवणुकी व सत्याग्रह

आश्रमांतील तीन सत्याग्रही मुलुखगिरीला निघणार होते. आश्रमातर्फे त्या तीन कार्यकर्त्यांचा सत्याग्रह होणार असल्याचें जाहीर झालें. सरकारला त्याची पूर्वसूचना देण्यांत आली. या तीन कार्यकर्त्यांना तीन घोडे देण्यांत आले. श्रीयुत विरूपाक्षी वेळद, श्री. वारिमनी अल्लीसाहेब व श्री. गंगाप्पा यमकनमर्डी असे तीन सरदार सिद्ध झाले. श्री. विरूपाक्षी वेळद हा एक सुखवस्तु व्यापाऱ्याचा मुलगा. त्याला या चळवळींत आणण्याचें काम गंगाप्पा यमकनमर्डी यांनीं केलें होतें. त्याचप्रमाणें अल्लीसाहेब या आपल्या मित्रासहि आपल्याबरोबरच तुरुंगयात्रा घडविण्याचें सत्कार्यहि याच गंगाप्पानें केलेलें आहे. कांहीं मुसल्मान अधिकारी या अल्लीसाहेबास या कामापासून काढता पाय घेण्याचा उपदेश परोपरीनें करीत असत. त्याच्यावर खटला भरल्यानंतरहि त्यांनीं या सत्कार्यांतून निवृत्त व्हावें म्हणून अधिकाऱ्यांनीं प्रयत्न चालू ठेवले होते. 'तूं मुसल्मान आहेस. स्वातंत्र्याच्या चळवळीशीं तुझा काय संबंध आहे ! ही चळवळ हिंदूंची आहे. असल्या हिंदूंच्या चळवळींत जाणें तुझ्या मुसल्मान धर्माला शोभणारें नाहीं. तूं चळवळींत शिरूं नकोस. आणि पुनः या चळवळींत न पडण्याचें आश्वासन देशील तर आम्ही तुला सोडून देऊं. तुझा गुन्हा तुला माफ करूं ' अशी वारंवार समजूत ते मुसल्मान अधिकारी देत. पण अल्लीसाहेब आपल्या विचारापासून ढळला नाहीं. तो दृढ राहिला. आणि त्यानें मोठ्या आनंदानें तुरुंगवासच पत्करला व भोगला.

या तीन सरदारांची घोड्यांवरून गांवभर मिरवणूक काढली. मिरवणूक संपूर्ण झाल्यानंतर त्यांच्या सत्कार्याचा जयजयकार होत असतांच त्यांना गिरफदार करण्यांत आलें. पुढें त्यांना बेळगांवांत नेलें व लागलीच त्यांच्यावर खटला भरून त्यांना सक्तमजुरीची शिक्षाहि सुनावण्यांत आली. श्री. विरुपाक्षी यांना सहा महिने सजा व १०० रु. दंड झाला. जनतेच्या उत्साहाला भरती आलेली होती. हुदली गांवांतील असल्या अनेक कार्यक्रमांमुळें गांवांतील इतरहि कांहीं तरुण त्या चळवळींत भाग घेण्यास पुढें येऊं लागले. त्या सर्व कार्यकर्त्यांना हुदलींतील जनतेची पूर्ण सहानुभूति असे.

यापुढें या सत्याग्रहीनें एक भाषण केलें. तो म्हणाला, 'राजकारणाच्या बाबतींत आपण सर्व लोक इतके अज्ञानी असाल असें मला वाटलें नव्हतें. तुरुंगांतून माफी मागून बाहेर येण्यासारखें कांहींहि वाईट किंवा बोचक तेथें नाहीं; त्यांत होणारी दुष्कीर्ति व छीःथू मला समजत नाहीं, असें का आपल्याला म्हणावयाचें आहे? मला या मानापमानाची पूर्ण जाणीव आहे. आम्ही सर्व कार्यकर्ते मिळूनच तेथें राहतों. सर्वजणच जर असे आपण तुरुंगांत अडकून पडलों तर चळवळीचा अधिक उठाव करण्यास बाहेर कोणी अनुभवी कार्यकर्ता शिल्लक राहणार नाहीं, हें पाहून मी माफीचें निमित्त करून बाहेर आलों आहें. वास्तविक हा माझा मोठ्यांतला मोठा त्याग आहे. चळवळीची थोडीशी संघटना करून, पुन्हा जाहीर व्याख्यानांचा एक दौरा करून, व आंदोलनाला अशा प्रकारें जोर आणल्यामुळें जादा शिक्षेस पात्र होऊन, मी पुन्हा तुरुंगांत जाणार आहें. माझी पूर्वीची शिक्षाहि मला भोगून संपवावी लागेल. आतां मी जें म्हटलें वा सांगितलें त्याची सत्यता आपणां सर्वांना या आठवड्यांतच प्रत्ययाला येईल. आणि नंतर आपण जो हा प्रकार माझ्या बाबतींत केलात त्याचा पश्चात्ताप करण्याची पाळी आपणावरच येईल व तसा पश्चात्ताप झाल्याचा प्रसंग पाहण्याचें भाग्य या डोळ्यांना लाभो व तें सामर्थ्य परमेश्वर आपणा सर्वांना देवो एवढी माझी प्रार्थना त्याच्या पायापाशीं आहे." आणि प्रत्यक्षांत झालेंहि तसेंच. एका आठवड्याच्या आंतच तो सत्याग्रही पुनः तुरुंगांत आला. या घटनेनंतर सरकारनें कोणाच्याहि माफीच्या अर्जाचा विचार करण्याचें सोडून दिलें.

श्री. रामनगौडा यांच्यावरील खटला चालू होता. कोर्टापुढें त्यांना हजर करण्या-पूर्वी त्यांना खानावळींत जेवण देत असत. त्यांना माफीचा सत्याग्रही म्हणून कोर्टांत उभें करायचें होतें. साहजिकच तो खटल्याच्या तारखेला माफी मागणार असा सर्वांचा पक्का समज. त्याला जेवणासाठीं खाणावळींत आणिलें आणि त्याच्यावरील विश्वासानें पोलीसहि जरा गाफीलच राहिले होते. त्यावेळीं रामनगौडाचा एक लिंगायत मित्र त्याच खानावळीमध्यें भोजनास आला. त्याच्या गळ्यांतील तें चांदीचें जाडजूड शिवलिंग त्याच्या शर्टावर रुळत होतें. रामनगौडाच्या शेजारींच त्याचा लिंगायत मित्र जेवणास बसला. जवळ पोलीस नव्हताच. तेव्हां या मित्रानें रामनगौडाबरोबर हलक्या आवाजांत बोलणें सुरू केलें. 'कुठून आणलास हा माफी मागण्याचा नामुष्कीचा विचार? तूं एकट्यानें माफी मागितलीस तर काय चळवळ ओस पडणार आहे? आणि समज तूं माफी मागितलीस व बाहेर आलास तर अशी काय धनदौलत सरकार तुला देणार आहे कीं पिढ्यानुपिढ्या ती तुझ्या उपयोगी पडेल! उलट तूं असा माफी मागून बाहेर आलेला पाहून लोक तुझी छीः थू करतील. खवळलेली जनता तुझें जीवन नकोसें करून टाकील. आणि मग सारी हयात, कशाला मागितली मीं ही माफी, असा पश्चात्ताप करीत तुला बसावें लागेल! याशिवाय वैयक्तिक पापपुण्याचा झाडा त्या शिवपरमेश्वरापुढें कसा देणार, हा विचारहि कर. तुझ्याशिवाय इतके लोक तुरुंगांत राहिले ते काय मूर्खच

आहेत असें तुला वाटतें का? त्यापेक्षां तुझें शहाणपण कांही वेगळें आहे का? सोड हा माफीचा विचार आणि तुझ्या इष्टमित्रांबरोबरच तूंहि तुरुंगांत राहा. थोडी कळ सोस पण आपल्या कुळाला बट्टा लावूं नकोस. तुझ्यासारखा एखादा इसम आला काय आणि गेला काय, सरकारला दोन्ही सारखेंच आहे. तेव्हां तूं कांहीं झालें तरी माफी मागूं नको." अशा प्रकारें रामनगौडाला समजुतीनें सांगून त्याच्या मित्रानें माफीपासून त्याला निवृत्त केलें आणि जेवण आटोपून तो लिंगायत मित्र निघून गेला. हा रामनगौडाचा मित्र म्हणजे हुदली आश्रमांतील कार्यकर्ता, गळ्यांत लिंग अडकवून लिंगायत बनलेला माझा मित्र श्री. वडवीच होता हें पोलिसांना मागाहून कळलें. आपल्या या मित्राला अभिवचन दिल्याप्रमाणें श्री. रामनगौडा यानें कोर्टात माफी मागितली नाहीं. त्यामुळें पोलिसांची चांगलीच फजिती झाली.

तुरुंगांत माफी वार्ड म्हणून एक वेगळाच भाग ठेवला होता. जो कोणी माफी मागेल व तसा अर्ज करील त्याला त्या माफी वार्डात ठेविलें जात असे. त्या माफी वार्डातील सत्याग्रहींना कोणतेंहि काम द्यावयाचें नाहीं, अन्न चांगलें द्यावयाचें व अन्य सुखसोईहि द्यावयाच्या, अशी व्यवस्था होती. एका खेड्यांतील एका वृद्ध सद्गृहस्थानें माफीचा अर्ज लिहून देऊन त्या माफी वार्डात प्रवेश मिळवून घेतला व तेथील माफी मागण्यास प्रवृत्त झालेल्या सत्याग्रहींना उपदेश देऊन कानपिचक्या देण्यास प्रारंभ केला. 'सरकारी काम आणि अर्धा जन्म थांब' अशी एक म्हणच होऊन बसली आहे ना! माफी मागणारांचे अर्ज सरकारकडे जाऊन, त्यांचा विचार होऊन माफी मागणाऱ्याकडून लिहून घेण्याचा सरकारी (फॉर्म) नमुना तयार होऊन, तो छापवून तुरुंगाच्या अधिकाऱ्याकडे पोहोंचण्यास तीनचार महिने तरी लागले. तो फॉर्म भरून त्यावर सही करून घेण्याची वेळ येतांच माफी वार्डमधील सर्व सत्याग्रहींनीं त्या माफीपत्रावर सही करण्याचें नाकारलें. तोंपर्यंत बहुतेक सत्याग्रही तुरुंगांतील जीवनाला रुळलेले होते. वरीलसारख्या २।३ घटनांमुळें माफी मागण्याची सरकारची मोहीम थंडावली व धोरणहि पार बदलून गेलें. त्या काळचे तुरुंगांतील विविध अनुभव व चळवळींतील घटना मनोरंजक व उद्बोधक असल्या तरी या मर्यादित जागेंत त्या किती म्हणून सांगाव्यात!

## २२.

## आश्रमांतील कार्यकर्त्यांना फटके खावे लागले

हुदली आश्रमांतील सत्याग्रहींचा हा प्रवाह थांबविल्याशिवाय बेळगांव जिल्ह्यावर वचक बसविला जाणार नाहीं, असें पोलीस अधिकाऱ्यांस वाटत होतें. कुमरी आश्रमाशीं प्रत्यक्ष अप्रत्यक्ष संबंध झाला असलेले कित्येक कर्तबगार कार्यकर्ते जिल्हाभर पसरलेले होते, ही गोष्ट पोलिसांना नीटशी उमगलेली नव्हती. म्हणून हुदलींतील दोन सत्याग्रही मुलांना फटके देऊन पाहण्याचें पोलिसांनीं ठरवलें. लक्ष्मण तुक्कार व मोदीनसाब अरळीकट्टी या दोन कोवळ्या तरुणांवर पोलिसांनीं आपला फटके देण्याचा प्रयोग केला. या अत्याचारामुळें हुदलीमधील लोक दबले किंवा भ्याले नाहींत पण त्यामुळें अधिक चवताळले. आश्रमांतील जमिनीवरील जे केळीचे घड लोंबत होते, त्या सर्व केळीच्या फडांवरील घड लोकांनीं एका रात्रीं कापून आणले व केळीचे खुंट तसेच उभे ठेवले. दुसरे दिवशीं हें पोलिसांच्या लक्षांत येतांच, नव्हे प्रत्यक्ष दिसतांच, त्यांनीं गांवामध्यें त्याचा कसून तपास आरंभला पण त्यांना कशाचाहि मागमूस लागूं शकला नाहीं. कारण सर्व गांव व गांवचे पोलीस पाटील अगदीं एकदिलानें वागत होते. आश्रमाच्या मार्फत एकामागून एक सत्याग्रही वीर तुरुंगांत पाठविण्याचा रतीब चालूच होता.

१९३२ सालींच श्री. वडवी यांना बेळगांव जिल्ह्यांतून हद्दपार करण्यांत आलें. त्यामुळें त्यांना धारवाड हुबळीकडेच राहावें लागलें. तथापि हुदलीशीं त्यांचा संपर्क कमी झाला नव्हता. वैचारिक सूत्रें हुदलीगांवापुरती वडवींच्या हातींच होतीं. हुदलीचे लोक धारवाडपर्यंत जाऊन त्यांची सल्ला घेत असत. कार्यकर्त्यांना फटके मारून कार्यकर्त्यांना हद्दपार करून, चळवळीचा जोर व सत्याग्रहींचा ओघ फारसा कमी होऊं शकला नाहीं. आश्रमांतील बहुतेक कार्यकर्ते यावेळीं तुरुंगामध्येंच होते. पण दोघां सत्याग्रहींना अटक झाली तो प्रसंग फारच गमतीदार आहे, म्हणून त्याची हकीगत येथें देतों.

श्री. वडवी यांनीं एक पत्रक (बुलेटिन) काढलें होतें. ते प्रत्येक आठवड्याला एक पत्रक काढीत, त्याचा प्रचार करीत आणि चळवळींसाठीं सत्याग्रही उभे करीत

असत. या पत्रकांबाबतहि तसेंच आहे. त्यांनीं त्या पत्रकाला 'नववा महिना' असा मथळा दिला. 'नववा महिना' म्हणजे चळवळीचा नववा महिना असा त्याचा अर्थ होता. पण लोकांना वाटलें कीं 'नववा महिना' हें नाटक असावें. वड्वी स्वतः हद्दपार झालेले. पण तेच हें बुलेटिन दिवसा ढवळ्या अगदीं बँड लावून, भाड्याच्या टांग्यांत बसून बेळगावांत वांटीत होते. बँडवाल्यांना किंवा टांगेवाल्याला याची कांहींच कल्पना नव्हती. ते आपलें काम मामुली समजून करीत होते. पोलीस स्टेशनजवळहि हा टांगा आला. आणि आपली ती जाहीरात (!) वांटून गेला. त्यावेळीं पोलीसांनींहि ती नाटकाची जाहिरात म्हणूनच घेतली. आणि 'नववा महिना' या नांवावर खूष होऊन ते आनंदित झाले. त्यांनीं ती जाहिरात न वाचतांच फौजदारसाहेबांच्या टेबलावर माहितीसाठीं ठेवून दिली. फौजदारसाहेबांनीं ती वाचून पाहतांच त्यांचे डोळे खाडकन उघडले. त्यांनीं टेबलावरील घंटा वाजवली. दोन पोलीस बरोबर घेतले व ती 'नववा महिना' नाटकाची जाहिरात घेऊन ते स्टेशनाबाहेर पडले. पोलिसांना ही गडबड काय आहे तें समजलेंच नाहीं. ते त्यांच्या मागोमाग गेले. चौकावर त्यांनीं चौकशी केली आणि त्या जाहिरातीचा मागोवा घेतला. टांगा थांबवला. स्वतः फौजदारसाहेबांनीं बँडवाला, टांगेवाला, त्याचे घोडे व श्री. वड्वी सर्वांनाच अटक केली व यथाक्रम त्यांना शिक्षाहि झाली.

सन १९३० च्या अखेर हिंडलगा जेलमधून माझी सुटका झाली. परंतु मला लागलीच 'ब्रिटिश इंडिया' मधून हद्दपार केलें. म्हणून मी मिरज संस्थानांत गेलों. तेथें पोलिसांनीं मला पोलीसचौकीमध्येंच बसविण्याचा प्रयत्न केला. मिरजसंस्थाननें देखील मला आपल्या संस्थानांतून हद्दपार केलें होतें. माझ्या पूर्वीच्या एका व्याख्यानावर मजवर खटला भरण्याचा विचार होता. दुसऱ्या दिवशीं सकाळींच मला अटक होणार होती. मी त्या रात्रीं मिरजेमध्यें श्री. सोनोपंत शिरोळकर वकिलांच्या घरीं उतरलों होतों. त्यांच्या वाड्याच्या दरवाजांत तीन पोलिसांचा पहारा बसविण्यांत आला होता. बेळगांवहून निघतांना गु. गंगाधरराव देशपांडे यांची मुलगी सौ. यमूताई हिनें लाडवांचा एक डबा मला दिला होता. तो लाडवांचा डबाच मी पोलिसांच्या स्वाधीन केला. त्यांनींहि आपणाला जातील तितके लाडू खाण्यास संकोच केला नाहीं. लाडू खाऊन, पाणी पिऊन विवेहि पोलीस डाराडूर झोपल्यानंतर रात्रौ दोन वाजतां मी मिरज सोडून सांगलीस निघून गेलों. सांगलीस संस्थानी राजकारणाचे तज्ञ नेते श्री. गणपतराव अभ्यंकर यांनीं मला आपल्या घरीं ठेवून घेतलें होतें. श्री. अभ्यंकरांच्या घरीं मी सरासरी सहा महिने होतों. माझ्यावरील हद्दपारीचा हुकूम बेकायदेशीर आहे असा माझा दावा होता. माझा खटला श्री. गणपतराव अभ्यंकरांनीं चालविला. त्यांत माझ्यावरील हद्दपारीचा हुकूम सरकारला परत घ्यावा लागला. त्या प्रकरणाची इत्थंभूत हकीगत मी 'पुंडलिक, खंड २'मध्यें देणार आहें. त्याची येथें पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं.

२५.

## चि. बापू गोखले-एक निष्ठावंत कार्यकर्ता

चि. बापू गोखले हा बेळगांवचा राहणारा. बेळगांवामध्यें गोखले यांचें एक प्रतिष्ठित कुटुंब आहे. त्या कुटुंबांतील हा एकच मुलगा देशकार्याला वाहिलेला होता. निर्भयता व मनाचा सरळपणा हे दोन गुण त्याच्यामध्यें उठून दिसत असत. गांधी विचारसरणीवर त्याची निष्ठा होती. बहुतेक सर्व चळवळींमध्यें तो तुरुंगांत गेलेला होता. कोणी कांहीं चूक वा अपराध केला आहे असें त्याला वाटल्यास त्याची चर्चा संबंधित व्यक्तीजवळच करण्यास किंवा त्यांच्याकडून खुलासा मिळवण्यास त्याला कधीं संकोच वाटला नाहीं. त्यासाठीं आपल्याला काय किंमत द्यावी लागेल किंवा संबंधित व्यक्ती वयानें, ज्ञानानें अगर तपानें किती मोठी आहे, याचें भान त्याला राहात नसे. हे गुण आमच्या आणखी एका मित्रामध्यें आहेत. असल्या फटकळ पण निष्ठावंत कार्यकर्त्यांना इतर कार्यकर्ते जरा वचकूनच असत व त्यांच्या फसल्याहि भानगडींतच पडत नसत. ते केव्हां कोणाला काय बोलतील याचा अंदाज कोणासहि बांधतां येण्यासारखा नसतो. किंबहुना हीच त्यांची खरी शक्ति असते. असले कार्यकर्ते पू. आप्पासाहेब पटवर्धन यांच्याकडे आकर्षित न होतील तरच आश्चर्य! आमचा हा चि. बापू गोखले कांहीं काळ पू. श्री. आप्पासाहेब पटवर्धन यांच्याकडे कणकवलीमध्यें राहात होता. असल्या कार्यकर्त्यांची खरी कदर करण्याची वृत्ति किंवा जन्मजात स्वभाव आप्पासाहेबांच्या मध्यें आहे. त्यांच्या अडीअडचणींकडे ते लक्षहि देत असत. कांहीं काळ त्याचें वास्तव्य पू. श्री. आप्पासाहेब पटवर्धन यांचे सांनिध्यांत रत्नागिरी जिल्ह्यामध्येंहि होतें. १९३० सालीं त्यांनीं कायदेभंग चळवळींत प्रथम प्रवेश केला. तेव्हांपासून अखेरपर्यंत त्यांनीं आपला देह अक्षरशः देशकार्यार्थ झिजविला आहे. सन १९३०, ३२, ४०, ४२ च्या सर्व आंदोलनांमध्यें त्यांना खडतर शिक्षा भोगावी लागली आहे. सन १९३२ व १९४२ सालीं त्यांनीं दोन दीर्घ उपोषणेंहि केलीं. येरवडा जेलमध्यें आपल्याच हातानें

स्वतःचा स्वयंपाक करण्यास आपणास अधिकाऱ्यांनीं परवानगी द्यावी म्हणून त्यांनीं उपवाससत्याग्रह केला होता. हा सत्याग्रह वीस दिवस चालू होता. शेवटीं तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं त्यांची व महात्माजींची भेट करविली आणि बापूजींच्या आज्ञेप्रमाणें चि. बापूनें आपला उपवास सोडला. स्वातंत्र्याची चळवळ व विधायक कार्य याशिवाय त्याला दुसरा ध्यास नव्हता. त्याचें व्यक्तिमत्व व विचार चांगले होते. देशासाठीं आमरण अविवाहित राहण्याचा त्याचा निर्धार होता. आहारामध्यें वारंवार भिन्नभिन्न प्रयोग करून पाहण्याची लहरहि त्याला येत असे. पू. आप्पासाहेबांच्या सांनिध्यांत आल्यानंतर कांहीं काळ केवळ बेकायदा मीठ मिळूं शकलें तरच तें खायचें असाहि निर्धार त्यानें केला होता. स्वतःवर असा प्रयोग करीत रहाणारे तीनचार कार्यकर्ते त्यावेळीं बेळगांव जिल्ह्यामध्यें होते. चंदगडचे श्री. रामकृष्ण प्रभु व बैलहोंगल येथील श्री. सिद्रामाप्पा हरकुणी यांची आठवण या ठिकाणीं होते. त्यांच्या प्रयोगांतील दोष दाखवून, त्यांच्या जीवनांतील व आचरणांतील विसंगति दाखवून, चकाट्या पिटण्याच्या भरांत त्यांचा उपहास करणाऱ्यांना,—त्यांच्या अंगचें धैर्य, सिद्धान्तनिष्ठा व चिकाटी दिसून येईल तरच–स्वतःची चूक कळून येईल. प्रसिद्ध गांधीभक्त पू. मन्सार्ळींच्या जातीचेच हे लोक आहेत. असल्या कार्यकर्त्यांमुळेंच गांधी-विचारसरणी कळाला लागली आहे, हें विसरून चालणार नाहीं. पू. सेनापति बापटांनीं "देशाचा संसार आहे माझ्यावरी—ऐसें थोडें तरी वाटूं द्या हो!' अशी सर्वांनाच हाक मारलेली आहे. पण हे कार्यकर्ते देशाचा थोडा नव्हे तर सर्वच संसार आपल्यावर आहे असें मानणाऱ्यांपैकीं आहेत. आयुर्वेदाचा अभ्यास करून आपल्या ज्ञानाचा लाभ खेड्यांतील जनतेला मोफत करून द्यावा हा छंद एकदां बापू गोखले यांच्या मनानें घेतला व त्यांत त्यांना यशहि लाभलें. सत्याग्रहीचे आवश्यक सर्व गुण त्यांच्या अंगीं होते. त्यांचा करारी बाणा, निर्भय वृत्ति, सेवामय त्यागपूर्ण जीवन, तरुणांस आदर्शभूत होतें. त्यांनीं देशासाठीं फकिरी पत्करलेली होती. ते आपल्याला 'आरोग्यानंद' म्हणवून घेत. आपल्या आहारांतील प्रयोग स्वतःवरच वारंवार करीत राहिल्यानें म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा, चि. बापू गोखले यांनीं १९४५ च्या जून महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत रत्नागिरी जिल्ह्यांतील लांजे गांवीं क्षयाच्या विकारानें आपली इहलोकींची यात्रा संपविली. त्यांच्या अकाली निधनानें बेळगांव जिल्ह्याचें कधींहि भरून न निघणारें अपरिमित नुकसान झालेलें आहे.

एवंगुणविशिष्ट बापू गोखले यानें जस आश्रम तेथील पोलिसांना न दुमानतां आपल्या ताब्यांत घेण्याचें ठरविलें. जस आश्रमाच्या सर्व इमारतींना सरकारी सील केलेलीं कुलुपें होतीं. बाहेरच्या उघड्या पडवीमध्यें बारा सशस्त्र पोलीस व एक हवालदार मिळून राहात असत. आश्रमापासून पन्नास पावलांवरच सांगली संस्थानची हद्द आहे. त्या हद्दींत उभें राहिल्यास ब्रिटिश पोलिसांना कोणासहि अटक करतां येण्यासारखी नव्हती. आश्रमाच्या इमारतींचें सरकारी सीलचें कुलूप व दरवाज

फोडून आपल्या आश्रमांत जाऊन सकाळची प्रार्थना करण्याचा निर्णय या सत्याग्रहींनीं घेतला होता. पहांटेलाच आश्रमाजवळील सांगली हद्दींत लोक जमले. त्यांतीलच ७।८ सत्याग्रहींनीं आश्रमाच्या दरवाज्याजवळ जाऊन एका मोठ्या दगडानें सरकारी कुलूप तोडलें व दरवाजाहि मोडून फाढला. सर्वजण आश्रमांतील इमारतीमध्यें शिरले आणि तिथें वरून त्यांनीं आपली सकाळची प्रार्थना केली व मोठ्या आवाजांत 'वंदे मातरम्' गीत म्हटलें. सांगली हद्दीमध्यें उभे असलेल्या लोकांनीं गांधींच्या नांवाचा जयजयकार केला. त्या जयघोषानें पोलीस लोक डोळे चोळीत उठले. आश्रमाचा आपला ताबा सत्याग्रहींनीं घेतलेला त्यांनीं पाहिला. पण त्या जनसमुदायापुढें ते कांहीं करूं शकले नाहींत. त्यांनीं मुकाट्यानें झाल्या प्रकाराचा रीतसर पंचनामा केला आणि आश्रमांत घुसलेल्या सर्व सत्याग्रहींना अटक झाली. कायद्याप्रमाणें पुढील सर्व विधी बेळगांव येथें उरकून घेऊन सर्वांना सक्तमजुरीची शिक्षा सुनावण्यांत आली. 'दुसऱ्याचा आश्रम जप्त करून आपल्या ताब्यांत ठेवणें हा सरकारी गुन्हा असून तो परत आमचा आम्ही आपल्या ताब्यांत घेणें, यांत कोणत्याहि प्रकारचा गुन्हा नाहीं' असें धोरण सर्व सत्याग्रहींनीं अंगिकारलेलें होतें. या घटनेनें त्याकाळीं सर्व जिल्हाभर उत्साहाचें भरतें आलें होतें. हा सर्व कार्यक्रम चि. बापू गोखले याच्या मार्गदर्शकत्वाखालींच झालेला होता.

## २६.

# गणपति उत्सव आणि गांवांतील फरशी

गांवच्या लोकांनीं सार्वजनिक गणेशोत्सव प्रतिवर्षीं घडवून आणण्याची आणि कार्यक्रम आंखून पार पाडण्याची जबाबदारी अंगवळणीं पाडून घेतली होती. दहा दिवसांच्या व्याख्यात्यांची निवड करविण्यास 'सार्वजनिक गणेशोत्सव मंडळ' आमच्याकडे आश्रमांत येत असे. सन १९३१ सालीं यानिमित्त 'मंडळ' मार्गदर्शनार्थ आश्रमाकडे आलें असतां गंगाधरराव म्हणाले कीं, 'एखादें विशिष्ट कार्य हातीं घेऊन त्यासाठीं व्याख्यानें व्यावींत व करवावींत. पुंडलीकजींना या बाबतींत विचारावें.' अर्थात् या बाबतींत गणेश उत्सव मंडळीशीं माझी पुष्कळच चर्चा झाली. मला वाटलें तें मीं त्यांना सुचवलें. कन्नड भाषेंत 'हुदल' म्हणजे चिखल. 'हुदली' म्हणजे पावसाळ्यांत ज्या गांवामध्यें चिखल होतो तें गांव असा असणेंहि शक्य आहे. पावसाळ्यामध्यें हुदलीगांवीं अतिशय चिखल होत असे. सुळधाळ स्टेशनपासून गांवापर्यंतचा रस्ता लोकलबोर्डाच्या मदतीनें व गांवांतील श्रमदानानें व भूमिदानानें चांगला झालेला होताच. 'गांवांतील सर्व रस्ते घडीव फरसबंद करावेत. त्याकरितां यंदाच्या गणेशोत्सवांत दहाहि व्याख्यानें मी एकटाच देईन' असें मी मंडळाला कळवलें. मंडळानें ही कल्पना मंजूर केली. गांवांतील रस्ते फरसबंद करण्यांतील फायदे व त्यायोगें जनमानसावर होणारे संस्कार माझ्या कुवतीप्रमाणें मी लोकांना समजावून सांगितले. या कामांत कोणा एका व्यक्तीचा फायदा आहे असें नाहीं, तर सर्वांचाच फायदा, विशेषतः बैल वगैरेसारख्या मूक जनावरांचाहि फायदा असल्याचें लोकांना विशद करून सांगण्यांत आलें. हुदलीगांवाला लागूनच डोंगर असल्यामुळें दगडांना तोटा नव्हता. डोंगरमालक इनामदाराकडून मोफत दगड मिळवणें, वड्डर लोकांकडून खाणींतून ठराविक साच्याचे दगड फोडून काढविणें, डोंगरावरून ते दगड गांवांत आणविणें, घडविणें आणि फरशी बांधवण्याच्या कामीं वाळूचा पुरवठा करवणें, गवंड्यांकडून मोफत काम करविणें व रोजच्या दिवसभराच्या कामासाठीं मनुष्यबळाचा पुरवठा होत राहील असें करणें

आणि घेतलेली गांवकऱ्यांची प्रतिज्ञा पार पाडण्याचा उत्साह, नेट व चिकाटी लोकांमध्यें कायम राखणें, अशा अनेक समस्या आमच्यापुढें उभ्या राहिल्या. या कार्याला केवळ विचारांच्या क्षेत्रांतून कृतीच्या क्षेत्रांत उतरविण्यापूर्वी गांवांत एक स्वतंत्र जाहीर सभा घेऊन लोकांना मी निक्षून बजावलें होतें कीं, 'वाटल्यास हा विचार येथेंच सोडून द्या. या कामाला प्रारंभच करूं या नको. पण एकदां आपण सर्वांनीं या कामाला संमति देऊन उघड्या डोळ्यांनीं माझ्याकडून प्रारंभ करविल्यानंतर मी तें काम अर्धवट टाकूं देणार नाहीं. तें काम तरी संपेल किंवा त्या कामीं मी तरी संपेन. तेव्हां आतांच काय तो विचार करा व या फंदांत पडूं नका. आपण संकटांत येऊं नका आणि मलाहि त्या संकटांत लोटूं नका." पण लोकांनीं एकमतानें ठराव मंजूर केला आणि कार्याला आरंभहि केला. या वेळीं माझे मित्र वडवी हद्दपार स्थितींत असल्यामुळें, मी एकाकी झालो होतों.

डोंगरांतील दगड इनामदाराकडून मोफत मिळाले. मग बाकीच्या गरजांचा विचार करण्यास आम्ही प्रारंभ केला. डोंगरांतील दगड बाहेर काढून ते ठराविक साच्यानें फोडण्याचें काम वड्डर लोकांच्याशिवाय इतराना जुळतच नाहीं. वड्डर लोकांना एकत्र जमवून त्यांच्याकडून हें काम मोफत किंवा कमी मजुरीनें करविण्याची मीं शिकस्त केली. वड्डर लोकांच्या डोक्यामध्यें समाजासाठीं मोफत राबण्याचा विचार आम्ही घालूं शकलों नाहीं. मनुष्यानें परोपकार कां करावा, समाजसेवा कां करावी, समाजसेवा म्हणजेच ईश्वरसेवा कशी, वगैरे विचार त्यांच्या डोक्यांत भरतील व ते आपल्या उपयोगी पडतील असें करणें व अगदीं त्यांना पटेल असें समजून सांगणें, मला साधलें नाहीं. कारण धार्मिक वा सामाजिक-कोणत्याहि गृहीत सिद्धांतांची त्यांच्या मनाची बैठक अशी त्यांच्या जीवनांतच नव्हती. आणि त्यांच्या कांहीं प्रश्नांना आमच्यापाशीं उत्तर नव्हतें. शेवटीं एक दिवस त्यांना भोजन द्यावें व एकच दिवस त्यांनीं समाजासाठीं मोफत राबावें असा समेट झाला. पण त्या दिवसाचें काम आणि खर्च यांचें प्रमाण मात्र व्यस्त निघालें. त्यांना दिल्या जाणाऱ्या मजुरीपेक्षां अधिक खर्च मला त्यांच्या भोजनासाठीं करावा लागला आणि त्यांचें काम मात्र त्यांच्या नेहमींच्या वेळेइतकेंहि त्यांनीं केलें नाहीं. डोंगरांतील दगड फोडण्यासाठीं लागलेल्या रकमेपैकीं रु. ६०० कर्ज म्हणून दत्तोपंत अध्यापक यांनीं त्या कामाला दिलें होतें. तें त्यांनीं मोठ्या कष्टानें लोकांकडून वसूल करवून घेतलें. डोंगरामध्यें फोडून पडलेले सुमारें ४५००० दगड गांवामध्यें आणण्याचें काम अत्यंत कष्टाचें होतें. गांवामध्यें ज्या शेतकऱ्यांच्या घरीं बैलगाड्या होत्या अशांची यादी करून, कोणी किती दगड डोंगरांतून गांवापर्यंत वाहून आणावेत याची गावपंचाच्या संमतीनें वांटणी केली. डोंगरांतील मोठे दगड किंवा फरशा गाडीमध्ये घालून डोंगरांतून गांवांत आणावयाच्या म्हणजे गाडी खिळखिळी होते. बैलांनाहि खाचखळग्यांतून चालणें त्रासाचें होतें. खाणीपर्यंत गाडी जाण्यासारखी नसेल तर दगड खाणीवरून गाडीपर्यंत वाहून आणावे लागतात, अशा अनेक

जिकीरीमुळें गाडींतून एका खेपेस जास्तींत जास्त दहा ते बारा दगड आणले जात. अशा स्थितींत तो ४५००० दगडांचा डोंगर हलायचा तरी केव्हां आणि कसा ? त्यांतच कांहीं शेतकरी चुकारहि निघत. हणवर नांवाच्या एका रयताच्या वांट्याला १०० दगड डोंगरांतून गांवांत आणण्याचें काम आलें होतें. त्यानें अगदीं ल्हान ल्हान पसतीस दगड एकाच खेपेंत आपल्या गाडींतून आणले. त्यांपैकीं एकहि दगड फरशी म्हणून वापरतां येण्यासारखा नव्हता. ज्यांनीं एकहि दगड डोंगरांतून आणण्याचें मान्य केलें नव्हतें असेहि लोक गांवांत होते. त्यांच्याशीं आमचें मुळींच भांडण नव्हतें. कारण बोलूनचालून तो खुषीचा सौदा होता, धर्माची ती बाब होती. पण एकदां डोंगरांतून दगड आणून देण्याचें मान्य केल्यावर त्यांत चुकारपणा करणें किंवा फसवणूक करणें या गोष्टीची मला चीड होती. हणवर यानें असे छोटे निरुपयोगी दगड आणून मला चकविलें आणि वर 'हे दगड नव्हेत काय ! ही काय माती आहे का !' अशा तऱ्हेनें माझ्याशीं हुज्जत घातली. मी त्याच्या बोलण्यानें खवळलों. माझा राग अनावर झाला. मी त्याला गाडीवरुन खालीं ओढलें व भर रस्त्यामध्यें बाजारांतच चारदोन चपराका हाणल्या. बाजारांतील लोक हा सर्व प्रकार पहात राहिले ! मी गंगाधररावांचा मनुष्य म्हणूनच मला कोणी विरोध केला नाहीं कीं माझ्यावर हात टाकला नाहीं ! आणि दुर्दैव असें कीं त्याच दिवशीं माझें 'अहिंसा व समाजसेवा' या विषयावर जाहीर भाषण होतें. सायंकाळीं सभेमध्यें प्रथमच मी हणवर नांवाच्या त्या रयताची व लोकांची माफी मागतली पण "चूक माझीच होती. मी पुनः असें करणार नाहीं. आपण दिलेल्या शिक्षेला मी पात्रच होतों. माझ्या वांट्याला आलेले शंभर दगड मी डोंगरांतून आणून देतों." असें हणवर यांनीं त्याच सभेमध्यें सांगितल्यामुळें त्याच्यापुढें मी अधिकच ठेंगणा दिसूं लागलों, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. या घटनेमुळें सर्वच रयतांनीं आपापल्या वांट्याला आलेले दगड प्रामाणिकपणें डोंगरांतून गांवांत आणले. हणवरनेंहि आपल्या वांट्याचे दगड दोनच दिवसांत आणून टाकले व आपलें वचन पूर्ण केलें.

२७.

## गांव फरशी आणि माझा उपवास

या गांवफरशीच्या कामांत, स्वातंत्र्याच्या चळवळीमध्यें आम्ही सर्व तुरुंगांत जात असल्यामुळें, खंड पडत असे. अर्धे काम संपल्यानंतर डोंगरांतून फरशीचे दगड गांवांत आणण्याचें काम जवळजवळ बंदच पडलें होतें. मी पुष्कळ प्रयत्न केला, प्रचार केला, गावपंचांची (दैवाची) मदत घेऊन पाहिलें पण कामाला उठाव येईना. कांहीच जमेना. म्हणून मी गांवांतील लोकांना जमवून एक व्याख्यान दिलें. झालेलें काम, अडचणी आणि रेंगाळणारें काम व लोकांची या बाबतींतील उदासीनता याचा पाढा लोकांपुढें वाचला. आणि 'उद्यांपासून मी उपवास करणार आहें. डोंगरांत फोडून पडलेल्या सर्व फरशा गांवांत आल्यानंतरच मी अन्न घेईन' असें निकरावर येऊन जाहीर केलें. गांवांतील सर्व रयतांनीं डोंगरांतून दगड आणण्याचें काम एकजुटीनें केलें तरी तें काम पूर्ण होण्यास एक महिना लागण्यासारखा होता. म्हणजे माझ्या त्या बोलण्यानें २०।२५ दिवसांचा उपवास तरी अटळच होऊन बसला. दुसऱ्याच दिवसापासून माझ्या घोषणेप्रमाणें एका सार्वजनिक जागेवर बसून मी उपवासाला प्रारंभ केला. गंगाधरराव त्यावेळीं वर्ध्यास गांधीजींकडे गेले होते. त्यांना मीं ही हकीगत कळविली. त्यांनीं वर्ध्याहून बेळगांवास तार केली, व कै. गु. बाबासाहेब सोमण यांना सर्व परिस्थिति समजून घेण्यासाठीं हुदलीस पाठविलें. आजूबाजूच्या ५।६ खेड्यांतील गाडी मालक असलेले रयत वाजतगाजत येऊन हुदलीसाठीं डोंगरांतील दगड गांवांत आणून टाकण्यास तयार झाले. हा उठाव माझे मित्र कै. वामनराव देसाई बिद्री व अन्य मित्र यांनीं केला असावा असें वाटतें. पण ही योजना हुदलीच्या लोकांनीं मान्य केली नाहीं. कारण ती परगांवची मदत म्हणजे हुदली गांवची एक प्रकारें बेअब्रू आहे असें लोकांना वाटत होतें. गांवांतील पंच आणि श्री. कल्लोपंत देशपांडे, श्री. भाऊराव देशपांडे व अमृतराव देशपांडे या तीन लोकांनीं या फरशीच्या कामीं प्रथमपासूनच आस्थेनें लक्ष घातलें होतें. कै. गु. बाबासाहेब सोमण बेळगांवाहून हुदलीस आल्यानंतर सर्वांच्या मतें समेट म्हणून खालील गोष्टी ठरल्या—

१ रोज फरशीच्या कामीं बांधकामाला किती दगड लागतात म्हणजे रोज किती दगड घडविले जातात याचा हिशेब करण्यांत आला आणि तेवढे दगड बांधकामासाठीं पुरविण्यास पांच बैलगाड्या रोज सतत कामावर राहतील ही योजना गावपंचांनीं आपल्या अंगावर घ्यावी व दगड पुरवावे.

२ या व्यवस्थेंत ज्या दिवशीं खंड पडेल त्या दिवशीं आपला उपवास पुनः सुरू करण्यास पुंडलिकजींना मोकळीक असावी.

३ अशी परिस्थिति आल्यास व इतर जवळपासच्या गांवांतील लोक गाड्या घेऊन मदतीस आल्यास गांवांतील लोकांनीं त्यांना हरकत करूं नये, मान्यता द्यावी.

हा समेट झाल्यानंतर मीं उपवास सोडला. हा उपवास ४–५ दिवस चालू होता. फरशीच्या बांधकामाला रोज पांच ते दहा गाड्या वाळू लागत असे. गावपंचांनीं याची व्यवस्था केली; पण एखादे दिवशीं वाळू बांधकामास कमी पडल्यास एक रयत-मल्लापा कॅंचाप्पा तोटगी-न कुरकुरतां आपल्या गाडींतून वाळू आणून देत असे. पण त्या कामाचें ओझें वारंवार त्याच्यावरच पडूं लागलें. म्हणून एके दिवशीं त्यानें उभे चोवीस तास केवळ वाळू आणण्याचेंच सतत काम करून मला सांगितलें कीं "आज या कामाला आमचा शेवटचा रामराम (डॉक मुजरी) घ्या. माझ्या वांट्याचें सर्व काम केल्यावरहि कित्येक दिवस अडीअडचण म्हणून मी वाळू पुरविण्याचें काम आपल्या सांगण्याप्रमाणें केलें आहे. पण ही अडचण रोजचीच होऊं लागली तर मला तें काम कसें जुळणार!" त्याच्या या विनम्र वृत्तीमुळें त्याला मी शेवटपर्यंत 'डॉक मुजरी' या नांवानेंच हाक मारीत असे. वाळू काय किंवा दगड काय, तें पुरविण्याच्या कामांत खरी अडचण गाडी किंवा बैल मिळविण्याची नसे, तर त्या गाडीमध्ये वाळू किंवा दगड भरण्याला जें मनुष्यबळ लागत असे त्याची खरी वाण होती. गांवांतील तरुण कार्यकर्ते व गांवपंच यांनीं ही अडचण दूर केली म्हणूनच त्या वस्तू वेळेवर मिळाल्या.

रोज फरशीच्या कामावर लागणाऱ्या मजुरांचाहि प्रश्न सोडवणें भाग होतें. घडविलेले दगड बांधकामापर्यंत वाहून आणण्याचें काम लोकांकडून मोफत करविण्यासाठीं मला अनेक उपाय योजावे लागले. गुरें रानांत घेऊन जाण्यास गांवाला तीन वेळां होत्या, त्या गावपंचाकडून सकाळीं बंद करविल्या. ज्यांनीं आपल्या वांट्याचें काम केलें असेल त्यांचींच जनावरें बाहेर जाऊं द्यावयाचीं, ज्यांना कामाला येणें सवड नसेल त्यांनीं एका दिवसाची एका मजुराची मजुरी द्यावी असेहि उपाय योजून पाहावे लागले. फरशी बांधणीचें काम चार पांच वर्षें होत होतें. अर्थात् चारपांच गवंड्यांना रोजची मजुरी देण्यासहि कांहीं दिवसांनीं सुरू केलें. या कामाची जबाबदारी श्री. दयाप्पा यमकनमर्डी यांनीं आपल्या शिरावर घेतलेली होती. 'सार्वजनिक कामासाठीं राबणारा असा एकेक दयाप्पा यमकनमर्डी प्रत्येक गांवामध्यें निर्माण झाला पाहिजे' असे उद्गार महात्माजींच्या तोंडून निघाले होते. आजूबाजूच्या खेड्यांतूनहि अशा प्रकारें गांवामध्यें मुख्य रस्ते फरसबंद करण्याची प्रवृत्ति दिसून येऊं लागली. हुदली गांवांतील लहान-

सहान बोळामधूनहि त्या त्या मार्गांत राहणाऱ्या लोकांनीं आपापले बोळ फरसबंद करण्यास प्रारंभ केला. श्री. शिवरायी खणगोपी यानें आपल्या घराकडे जाणारा रस्ता आपल्या हिंमतीवर पण सार्वजनिक श्रमदानानें करविला होता. श्री. शिवराई थेकार व इतर कांहीं मंडळींनीं आपापल्या रस्त्यावरील फरशी अशाच रीतीनें श्रमदानानें व ग्रामपंचायतीच्या मदतीनें करविली आहे. गांवांतील किती रस्ते या प्रकारें फरसबंद झाले याला अनेक तऱ्हेनें महत्त्व असलें तरी सार्वजनिक कार्यासाठीं व हितासाठीं विनावेतन राबण्याचे आणि सेवाभाव बळावण्याचे संस्कार यामुळें लोक-मानसावर झाले हाच विशेष महत्त्वाचा व मोलाचा परिणाम आहे असें मला व माझ्या बरोबर राबणाऱ्या कार्यकर्त्यांना वाटतें.

रस्त्यावर फरशी बांधावयाची ती कासवाच्या पाठीसारखी, मध्यें उंचवटा राखून दोन्ही बाजूंला गटारें काढून बांधावी की दोन्ही बाजूला चढ ठेवून मध्यंतरीं गटारवजा खोलगट पन्हळ ठेवून रस्ता बांधवावा याविषयींहि पुष्कळच भवति न भवति झाली होती. पू. काकासाहेब कालेलकर यांच्याशींहि या बाबतींत बराच पत्रव्यवहार मीं केला होता. शेवटीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंला गटारें न ठेवतां, त्या रस्त्याच्या मध्यावर खोलगटपणा राखूनच रस्त्याची फरसबंदी करण्यांत आली. दोन्ही बाजूंला गटारें ठेवल्यास ती कायमची घाण राहणार असेंच सर्वांना वाटत होतें. जी कांहीं घाण असेल ती मध्यावर येऊं द्या. हुदलीगांव उतारावर असल्यामुळें आणि फरशीहि उतार राखूनच बांधविल्यामुळें ज्या पावसानें पूर्वी सारा गांव राड व चिखलमय होत असे तोच गांव एकाच मोठ्या पावसानें स्वच्छ धुवून निघूं लागला. ही फरशी तयार करण्याच्या कामीं गांवांतील लहानथोर सर्व धर्मांचे व पंथांचे लोक पुष्कळच राबलेले आहेत. मी या कामांत गांवांतील सर्वच जनतेवर अमर्याद सत्ता गाजविली आहे. माझा सर्व रागीटपणा व छळ लोकांनीं प्रेमानें सहन केला आहे. हें काम पाहण्यास कै. श्री. दा. वि. गोखले यांना गंगाधरराव यांनीं मुद्दाम पुण्याहून बोलावून घेतलें होतें.

२८.

## केंद्र कुमरी-मळ्यांतून हुदलींत आणिलें

हुदलीपासून दोन मैलांवर असलेल्या 'कुमरी' नांवाच्या गंगाधररावांच्या मळ्यामध्यें आश्रम चालवीत असतांना आम्ही हीं कामें हुदली गांवात करीत होतों. गांवांतील या सर्व विधायक कार्यामध्यें आश्रमांतील कार्यकर्ते भाग घेतच असत असें नाहीं. कारण आश्रमांतील दिनक्रम व शिक्षण वेगळें स्वतंत्रपणेंच चालू होतें. गांवामध्यें मनुष्यबळाचें प्रदर्शन व प्रात्यक्षिक करून दाखवावयाचें असल्यास तेवढ्यापुरतेंच आश्रमांतील कार्यकर्त्यांना गांवामध्यें आणले जात असे. त्या काळीं आश्रमामध्यें बहुतेक कार्यकर्ते महाराष्ट्र व विशेषतः कर्नाटकांतून आलेले असत. आश्रमांतील त्यांचें शिक्षण संपतांच ते आपापल्या ठिकाणीं सेवाकार्य करण्यास निघून जात. त्यामुळें आश्रमांतील कामाचा किंवा शिक्षणक्रमाचा कोणत्याहि प्रकारचा प्रभाव हुदली गांवावर पडत नसे. गंगाधरराव आपल्या मळ्यांत एक आश्रम चालवितात व त्यांनीं तो मळाहि गांधी सेवा संघास दान दिला आहे, एवढेंच लोकांना माहीत होतें; आणि घंटेप्रमाणें आश्रमांतील सर्व कामें चालतात एवढेंच त्या आश्रमाविषयींचें ज्ञान लोकांना होतें. गांवामध्यें मी व श्री. पडवी मिळून सारखीं नवीं नवीं कामें व प्रवृत्ति सुरू करण्याचा सपाटा चालविला होता. त्यासाठीं आम्हांला गांवांतच राहाणें इष्ट वाटे. दिवसभर काम करतां यावें म्हणून गांवांतच एक घरहि आम्हीं निश्चित केलें होतें. कोणाचें तरी पडकें घर घ्यावयाचें, ते दुरुस्त करून त्यांत राहावयाचें आणि शेवटीं ते मालकाला देऊन पुनः तसेंच दुसरें एखादें पडकें घर घ्यावयाचें, हा उद्योगच कित्येक वर्षे श्री. पडवी मास्तरांच्या हातून झालेला आहे. अशा प्रकारें गांवांतील बऱ्याच घरांचें स्वरूप बदलून गेलें व गांवाला कांहींसा उजाळा मिळाला.

कुमरीमधील सर्वच कार्यकेंद्र गांवांमध्यें आणावें हा विचार माझ्या मनांत निश्चित झाल्यानंतर, गांवांत एक मोठी दगडी इमारतच बांधावी असें मी योजिलें. ही इमारत गांवांत बांधावी किंवा गांवाबाहेर बांधावी हा प्रश्न प्रामुख्यानें आमच्यापुढें

कर्ज तरी मी फेडावें, अशी कळकळीची प्रार्थना कराल, तर मी आतांच स्पष्ट सांगून ठेवतों कीं मी कोणतीहि मदत करणार नाहीं, कोणतीहि आर्थिक जबाबदारी किंवा कर्ज फेडण्याचें ओझेंहि मी घेणार नाहीं. मग तुम्ही माझाच द्वेष करूं लागाल. तेव्हां आजच ही योजना रद्द करावी आणि आपण वेळेवर सावधान झाल्याबद्दल खिरापत वाटून खऱ्या लोकसेवेला लागावें. या माझ्या विचाराकडे लक्ष देऊन आपण सर्वांनीं पुनः विचार करावा आणि काय तो निर्णय घ्यावा.

यानंतर मी सभेमध्यें सांगितलें कीं, "आम्ही या सर्व गोष्टींचा विचार करूनच या कामाला लागलों आहोंत. मोठ्या योजना आम्ही आंखल्या आहेत. म्हणून त्यांचा पायाहि तितकाच मोठा व भक्कम पाहिजे. आपल्याकडून आशीर्वादापेक्षां अधिक कशाचीहि अपेक्षा आम्ही करणार नाहीं. कोणतेंहि आर्थिक ओझें आपल्यावर लादणार नाहीं. कशाचीहि जबाबदारी आपल्यावर टाकणार नाहीं. आम्ही काढूं तें कर्ज आम्हीच पाहून घेऊं. पाया भरण्याचा प्रारंभ एक शुभ शकुन म्हणून आपण करावा असें आम्हांला वाटतें. आपली सर्व भीति अनाठायीं होती, असें एका वर्षांत आपल्या निदर्शनास आणून देऊं. तेव्हां पाया खोदण्याचा प्रारंभ आज आपण करावा."

हें माझें भाषण गंगाधरराव यांनीं हातांत कुदळ घेऊन उभ्या उभ्याच ऐकलें आहे. शेवटीं पुनः गंगाधरराव म्हणाले, 'उघड्या डोळ्यांनीं व निर्धारानें आपण हें काम अंगीकारीत आहांत, याचा मला आनंद झाला. आतां ही इमारत पूर्ण बांधून उभी करावी व आपल्या योजनेंतील अन्य भागहि प्रत्यक्षांत आणावा, हेंच आपलें 'स्वराज्य' म्हणून आपण सर्वांनीं मानलें पाहिजे. हातांत घेतलेलें काम तडीला नेण्याची चिकाटी आपल्यामध्यें आली पाहिजे. आपण या कामांत कसें यश मिळवितां याकडे माझें लक्ष राहील. या कामांत आपल्याला यश मिळावें अशी ईश्वराची प्रार्थना करून पाया उकरण्यास मी पहिली कुदळ मारीत आहें. गांवच्या लोकांनाहि मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं हीं मुलें आपल्या गांवांत येऊन, आपली सेवा करण्यास इतकीं झटत आहेत, त्याची कदर आपण केली पाहिजे. त्यांना स्वतःला यांत कांहींहि मिळवावयाचें नाही, प्राप्तव्य नाहीं. माझ्या खेड्यांत येऊन हीं मुलें राबतात याचें माझ्या मनावर मलतें ओझें आहे. त्याची कल्पना मी शब्दांनीं व्यक्त करूं शकत नाहीं. हीं मुलें करीत असलेल्या सेवेस मी व आपण लायक आहोंत किंवा नाहीं याचीच परीक्षा व्हावयाची आहे. आपल्या सर्वांच्या सहानुभूतीचें आश्वासन आपल्या सर्वांच्या वतीनें या मुलांना देऊन, मी आतां पाया खोदण्यास प्रारंभ करीत आहें."

चुरमुरे व खोबरें लोकांना प्रसाद म्हणून वांटत असतांना श्री. कल्लोपंत देशपांडे व थोरले बसनगौडा यांनीं आभार मानले. त्या दिवशीं सायंकाळपर्यंत बराच पाया उकरला गेला. मिळेल तेथून कर्ज काढून ती इमारत मीं दीड वर्षांत बांधून पुरी केली. घरांतून स्टेशनकडे किंवा स्टेशनकडून घराकडे घोड्यावर बसून जातांना त्या इमारतीकडे जाण्यास गंगाधरराव कधींच आळस करीत नसत किंवा चुकत नसत. या

इमारतीसाठीं पुरेशा लांबीचा एक सोट तुळई घालण्यास पाहिजे होता. आयत्या वेळीं तो दांडेलीहून आणविला आणि लोखंडी दोन लांब गर्डर पाहिजे होते ते बेळगांवहून श्री. कृष्णराव याळगी यांनीं आपल्या खर्चानें हुदलीस देणगी म्हणून पाठवून दिले होते. इमारतीचा नकाशा वगैरे कांहींहि बनविले नव्हते. ज्यावेळीं जें ध्यानांत येईल तशी ती इमारत बांधून उभी केली. विनायोजना जशी झाली तशी ती झाली. पण इमारत उत्तम झाली आहे असे पाहाणारास वाटल्यावांचून राहात नाहीं.

या इमारतीला लागणारें सर्व लाकूड आम्हांला अर्ध्या किंमतींत मिळवून देण्याची कृपा श्री. वैकुंठभाई मेथा, मुंबई, यांनीं केली आहे. माझ्याबरोबर काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांना उत्तम घरें असावींत, त्यांना पोटाची कधीं ददात असूं किंवा भासूं नये, आणि गांवामध्यें त्यांची प्रतिष्ठा वाढावी असें मला नेहमीं वाटायचें. म्हणून माझ्या इमारतीसाठीं लागणाऱ्या लाकडांबरोबरच त्या कार्यकर्त्यांना त्यांचीं घरें बांधविण्यास लागणारें लाकूडहि मीं आणविलें. हेतु एवढाच होता कीं या कार्यकर्त्यांच्या इमारतींना लागणारें लाकूड त्यांना स्वस्त किमतींत मिळावें. तें सर्व लाकूड आल्यानंतर त्या त्या कार्यकर्त्यांना तें त्यांच्यासाठीं मागविलेलें लाकूड देण्यांत आलें.

अशा तऱ्हेनें आपल्या घरासाठीं लाकूड स्वीकारणाऱ्यांपैकींच एकानें श्री. वैकुंठभाई मेथा यांना हें लिहून कळवलें कीं, 'पुंडलीकजींनीं संस्थेसाठीं मागविलेलें सर्व लाकूड संस्थेच्या इमारतीसाठीं लागलेलें नाहीं. गांवांतील कांहीं लोकांना हवें असलेलें लाकूडहि त्यांत समाविष्ट करून तें त्यांना निम्म्या किंमतींत मिळवून दिलेलें आहे, मला ही गोष्ट समजल्यानंतर मी श्री. वैकुंठभाईंना लिहिलें, कीं आपण अर्ध्या किंमतीला देवविलेलें लाकूड संस्थेच्या इमारतीला तर उपयोगी पडलेलेंच आहे पण माझ्याबरोबर काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचीं घरें सुधारण्यासहि त्या लाकडांचा उपयोग झाला आहे.' या माझ्या पत्रास उत्तर म्हणून श्री. वैकुंठभाईंनीं मला लिहिलें होतें कीं 'संस्थेच्या इमारतींना उपयोगी पडून उरलेलें लाकूड कार्यकर्त्यांचीं घरें सुधारण्यासहि उपयोगी पडलें, हें कळून मला आनंद झाला.' श्री. वैकुंठभाईंनीं अशी उदारदृष्टि स्वीकारली आणि यामुळेंच हें प्रकरण येथेंच संपलें.

२९.

## लोकांशीं भांडण्याचा प्रसंग

गांवांतील कार्याचा आमचा व्याप वाढूं लागला व आमचें केंद्र कुमरी मळ्यांतून गांवांत आलें. मी विकत घेतलेल्या जागेवर इमारत बांधून झाल्यानंतर त्याला लागून असलेली पडजागा व इमारती मिळतील तेवढ्या घेणें क्रमप्राप्त झालें. आजूबाजूच्या लागून असलेल्या घरमालकांची चकबंदी व आडभिंती आमच्या जागांशीं लागूनच असल्यामुळें थोड्याशा किंबहुना टीचभर जागेसाठीं किंवा हवेच्या अथवा पाण्याच्या निचऱ्यासाठीं व हक्कासाठीं भांडत बसण्याची पाळी आमच्या नशिबीं येणें क्रमप्राप्तच होऊन बसलें. 'पुंडलीकजी, तुम्हाला काय पोर का बाळ, तुम्ही असें अभिनिवेशानें, एखाद्या स्वार्थी, कुटुंबवत्सल माणसासारखें भांडणें किंवा वर्दळीला येणें तुम्हाला शोभतें काय?' असें जो तो मला विचारूं लागला. हा विचार ध्रुवतारा म्हणून मीं डोळ्यांपुढें ठेवला असता तर संस्थेसाठीं मीं विकत घेतलेली जागा थोडीशीहि सुरक्षित राहिली नसती. एखादा संसारी माणूस आपल्या जागेला किंवा आपल्या हक्काला जपतो त्यापेक्षां संस्थेच्या जागेला अधिक जपलें पाहिजे अशी वस्तुस्थिति आहे. आम्ही सर्वजण एखादी संस्था उभारण्यासाठींच धडपडत असलों तरी, मी कर्ज काढून बहुतेक कामें करीत असल्यामुळें सर्व कांहीं माझ्या मालकीचें व माझ्या नांवावरच होतें, व तेंच स्वाभाविक होतें. ही भांडणाची प्रवृत्ति पुढें धक्काबुक्कीपर्यंत गेली होती. आम्ही विकत घेतलेल्या जागेंतील एक पडकी भिंत पाडून ती जागा साफ करावयाची होती. पण त्यालाच लागून राहात असलेल्या एका सोनारानें-लक्ष्मण पत्तारानें-या गोष्टीस आक्षेप घेतला व प्रत्यक्ष आडकाठीहि घेतली. त्याला श्री. वडवी यांनीं घट्ट पकडून धरलें व त्याच्या समक्ष ती भिंत पाडण्यांत आली. असे तंटे ज्यांच्याशीं आम्हाला करावे लागले त्यांची सहानुभूति अर्थातच आम्ही गमावली व आम्हाला म्हणजे आमच्या कोणत्याहि सार्वजनिक कामाला विरोध करणारांची संख्या गांवांत वाढवून घेण्यास आम्हीच कारणीभूत झालों. एवढेंच नव्हे, तर आमच्याबरोबर काम करणाऱ्या लोकांमध्येंच

३०.

## भजनी मेळा व प्रभातफेरी

सन १९३४ सालीं आम्ही गांवामध्ये एक भजनी मेळा स्थापन केला. त्या भजनी मेळ्याच्या साधनसामग्रीची म्हणजे टाळ, मृदंग, दिमडी वगैरेची जुळवाजुळव करण्यास प्रारंभ झाला. पुणें व पंढरपूर या गांवीं कांहीं मुलांना शिक्षणासाठीं म्हणून मुद्दाम पाठवून एक भजनी फड तयार करवावा असाहि थोडाबहुत प्रयत्न झालेला आहे. या भजनी मेळ्यानें पहांटे प्रभातफेरी काढावी व लोकांना पहांटे उठण्याची संवय लावावी हा त्यांत उद्देश होता. पूर्वी स्त्रिया दळण्यासाठीं व पुरुष शेतकामासाठीं खेड्यांमध्यें पहांटे उठत असत. पण आतां तीनचार मैलांवर अंकलगी गांवीं पिठाची गिरणी झाली असल्यामुळें (आतां हुदलीगांवांतच एक नव्हे, दोन पिठाच्या गिरण्या झालेल्या आहेत.) गांवांतील मध्यम स्थितींतील बहुतेक रयत अंकलगीपर्यंत चालत जाऊन, तेथें पिठाच्या गिरणीबाहेर रांकेंत उभें राहून धान्य दळवून आणूं लागले होते. त्यामुळें दळण्यासाठीं पहांटे उठणें आणि दळतांना जात्यावर मुलांबाळांवरून किंवा देवाधर्माचीं गाणीं म्हणणें जवळजवळ बंदच झालें होतें. शेताचें काम वर्षातून जवळजवळ सहा महिनेपर्यंत असत नसल्यामध्यें सकाळीं सात वाजेपर्यंत फारशी हालचाल दिसून येत नसे. गांवाला संडास किंवा पायखाने नसल्यामुळें गांवाला लागून गांवाबाहेर शौचाला बसण्यासाठीं कांहीं स्त्रिया व पुरुष पहांटे उठत असत हें वेगळें! गांवांतील लोकांना पहांटे उठण्याची पुनः संवय लागावी म्हणून आश्रमांतील कार्यकर्त्यांनीं पहांटे चांगल्या आवाजांत भजनें म्हणत प्रभातफेरी काढून गांवभर फिरण्याचा उपक्रम करण्यांत आला. हा भजनी मेळा रस्त्यांतून भजनें म्हणत जात असतांना तो पहाण्यासाठीं घराच्या दरवाजामध्यें लोक येऊन उभे राहात असत. देवाधर्माचीं पदें, अभंग, राष्ट्रीय गीतें, शिक्षणाचें महत्त्व विवरणारीं पदें या प्रभातफेरीमध्यें म्हटलीं जात. अगदीं भर पावसाच्या दिवसांतहि, ही प्रभातफेरी बंद पडूं दिली जात नसे. गांवांतील कांहीं वयें लोकहि नादलुब्ध होऊन या मेळ्याच्या

## ३१.

# प्रभातफेरी गेली पण ग्रामसफाई आली

कुमरी आश्रमांतून केंद्र हुदली गांवांत आल्यानंतर आश्रमांत कर्नाटकांतील सर्व भागांतून कार्यकर्ते येऊं लागले होते. त्यांना प्रत्यक्ष देशसेवेचा कार्यक्रम म्हणून ग्रामसफाईला प्रारंभ करण्यांत आला होता. गांवांतील अनेक कार्यकर्ते या ग्रामसफाईमध्यें भाग घेतच असत. शिवाय आपल्या घरापुढील जागेमध्यें व रस्त्यावर सडासंमार्जन करून रांगोळी काढण्याची प्रथा व जुनी परंपरा या खेड्यामध्यें बंद झालेली होती. ती चांगली प्रथा व उपयुक्त जुनी परंपरा पुन्हा सुरू करण्यासाठीं ग्रामसफाई कार्यकर्त्यांकडून करविणें हा नवा उपक्रम आम्हीं केला. कार्यकर्त्यांनीं आपल्या घरापुढील जागा साफ करावी व आपण रोज तें पहात स्वस्थ उभें रहावें ही गोष्ट कित्येकांना कशीशीच वाटूं लागली. त्यामुळें कार्यकर्ते गांव झाडत झाडत आपल्या घरापुढें येण्यापूर्वीच घरापुढील जागा झाडून, सडा घालून त्यावर छान रांगोळी काढलेली आम्हाला पहावयास मिळूं लागली. ही नीति महिना पंधरा दिवसांतच गांवांतील कित्येक कुटुंबांनीं आपलीशी केली. कार्यकर्त्यांनीं गांवांतील लहानमोठ्या गल्ल्या आपसांत वांटून घेतल्या व हें गांवसफाईचें काम सुमारें १॥–२ तासांत संपवून सर्व कार्यकर्ते आश्रमांत परत येत असत. गांवांतील मध्यमवर्गीय कुटुंबांनीं ही प्रथा स्वीकारली ती आजतागायत चालू आहे.

ग्रामसफाईचें काम झाल्यानंतरच श्री. वडवी व मी मिळून विहीरीवर स्नानाला जाऊन तासभर पोहून घरीं येत असूं, त्यानंतर स्टोव्ह किंवा शेगडीवर स्वयंपाक करीत होतों. भात, कणकेचे मुटके व भाजी हेंच आमचें सामान्य भोजन असे. आठवड्याला दोन रुपयांचें तूप विकत घेण्याचें आम्हीं ठरविलें होतें. पण रात्रीचें तूप आम्हांला आवांच घाला, संध्याकाळीं आम्ही तूप खाणार नाहीं, असें म्हणत म्हणत दोन रुपयांचें तूप दोनच दिवसांत संपवून बाकीचा आठवडा आम्ही बिनतुपाचेंच भोजन करीत असूं. आम्ही दोघेच हातांनीं स्वयंपाक करून जेवत होतों तोंपर्यंत आमचें स्वयंपाकगृह आम्हाला व्यवस्थित व भरलेलें कधींच राखतां आलें नाहीं. पानांत भात घेतल्यानंतर

कोणास तरी दुकानांत पाठवून आणा अर्धा आण्याचें मीठ आणविण्याचें आमच्या नशिबीं कायमचेंच लागलेलें होतें. एकदां तर बेळगांवच्या सौ. रमाक्का याळगींनी आमचें स्वयंपाकगृह व्यवस्थित थाटून दिलें. एक मध्यम उंचीचें कपाट. त्यांत मीठ, मिरची, तेल, फोडणीचे दाणे, असल्या जिन्नसापासून तों तांदूळ, गहू, कर्णाक, मेतकूट, जुणक्याचें पीठ, येथपर्यंत सर्व जिनसांचे लहानमोठे डबे करून, त्यांवर त्या त्या जिनसाचीं नांवें घालून, प्रत्येक डब्यांत लहानमोठे शिंपले किंवा चमचे ठेवून, लोणच्यासाठीं लहान बरण्या देऊन, हें सर्व कसें व्यवस्थित ठेवावें तें आम्हाला त्यांनीं समजून सांगितलें. आतां अगदीं व्यवस्थित वागावयाचें असें त्यांच्यापुढें ठरवून, त्यांनींच मालमसाल्यांनीं भरून दिलेले ते सर्व डबे व बरण्या घेऊन मी हुदलीस आलो. आणलेलें सामान सर्व संपेपर्यंत म्हणजे सुमारें महिनाभर तें आमचें स्वयंपाकगृहाचें कार्य सुंदर चाललें होतें. गांवांतील कांहीं स्त्रिया देखील आमच्या स्वयंपाकगृहाची ती व्यवस्था पाहून गेलेल्या आहेत. पण त्यांपैकीं एकेका डब्यांतील सामान संपूं लागल्यानंतर त्या वस्तूशिवायच कसें चालवावयाचें याकडेच आमची बुद्धि चालू लागली. पुढें तर त्यांतील एकेक डबा व एकेक बरणी केव्हां व कोठें गेली हेंच आम्हाला कळलें नाहीं. त्याचप्रमाणें आम्ही अनेक घरें बांधवीत असतां तें कपाटहि मोडून तोडून कुठें नाहींसें झालें याचाहि पत्ता लागला नाहीं. माठाला लावण्यासाठीं मोठे मीठ वाटीच्या तळव्यानेंच ताटांत बारीक करण्याची आमची जुनी परंपरा तेवढी आमच्याजवळ राहिली आणि स्वयंपाकघरांतील व्यवस्थेचा आमचा वेताळ पूर्वस्थळावर आला !!

ग्रामसफाईचें काम अव्याहत तीनचार वर्षें चाललें होतें. त्याची आवश्यकताच पुढें भासेनाशी झाली. म्हणूनच तें थांबविण्यांत आलें. कोणी मोठा पुढारी गु. गंगाधररावांना भेटण्यास येणार असेल तर त्या दिवशीं पहांटे चार वाजतां सर्वांना उठवून, समग्र गांवाची सफाई होत असे. त्यांत मात्र गांवांतील सर्व लोक भाग घेत असत. आपलें गांव आपण सर्वांनीं मिळून झाडण्यांत कमीपणा कसला ? असें लोकांना वाटूं लागलें. गांवामध्यें त्या काळीं गंगाधरराव यांच्या खालोखाल श्री. बळ्ळोपंत देशपांडे व श्री. माऊराव देशपांडे यांना लोक मानीत असत. हे दोघेहि गांवसफाईच्या कामाला प्रत्यक्ष जातीनें येत असल्यामुळें, त्याचें सर्व श्रेय त्यांनाच दिलें पाहिजे.

३२.

## तरुण संघाची स्थापना

हुदली गांवांतील विधायक कार्य अधिकाधिक व्यापक व टिकाऊ पायावर चालावें या हेतूनें गांवामध्यें एक तरुण संघ १९३५ मध्यें स्थापण्यांत आला. आमचे विचार कार्यान्वित करण्यासाठीं आम्ही या संघामध्यें एकमतानें ठराव मंजूर करवून घेऊन 'तरुण संघाच्या' समासदांना सर्व जबाबदारी उचलण्यास प्रवृत्त करूं लागलों. आम्ही त्यांच्याबरोबर काम करीत होतोंच. जें कांहीं काम हुदलीमध्यें होईल तें आपल्या तरुण संघाच्या मदतीनेंच व्हावें व होत आहे ही भावना तरुण संघाच्या सभासदामध्यें उत्पन्न करण्याचा प्रयत्न आम्ही विचारपूर्वक करीत होतों.

हा तरुणसंघ स्थापनेच्या दिवशीं गंगाधररावहि हजर होते. त्यावेळीं एक सहभोजन झालें. सहभोजनाला गंगाधररावहि हजर होते. या सहभोजनांत सर्व जातींचे व सर्व धर्मांचे तरुणांनीं भाग घेतला होता. अर्थात् गांवांतील जुन्या धार्मिक वृत्तीच्या लोकांना हें सहभोजन मान्य नव्हतें. म्हणून तरुण संघांतील तरुणांवर खेडेगांवांतील नेहमींचें शस्त्र जो बहिष्कार तो घालण्यांत आला. गंगाधरराव त्यांत असल्यामुळें पूर्वीच्या हरिजन शाळेसारखाच पुनः प्रसंग आला. हा बहिष्कार कसा घालावा व तो टिकवावा कसा याच्या वाटाघाटीमध्येंच पंचवीस दिवस गेले. पुढें हळूहळू या विषयाचा ऊहापोहच कमी कमी होत गेला आणि शेवटीं तो कानावरहि येईनासा झाला. या प्रश्नाचा कालहरणानें निकाल लावला.

सरासरी दोन वर्षे अशा प्रकारें तरुण संघाचें काम चालू होतें. पुढें सन १९३७ सालीं गांधीसेवासंघाचें संमेलन झाल्यावेळीं महात्माजी हुदलीस आले असतां त्यांच्यापुढें ठेवण्यासाठीं 'तरुण संघाची घटना' तयार केली. ही घटना कानडीमध्यें लिहिली होती. त्याचें हिंदीमध्यें भाषांतर करून मी ती महात्माजींना वाचून दाखविली. त्यांत महात्माजींनीं लक्ष घालून कांहीं सुधारणा करविली. यांत अनुभवा-प्रमाणें बदल किंवा सुधारणा होत जाईल, असेंहि त्यांनीं सांगून ठेवलें होतें. त्यावेळीं

महात्माजींशीं झालेली सर्व चर्चा आज आठवत नाहीं. पण एका महत्त्वाच्या मुद्याची चर्चा त्यावेळीं झाली असल्यामुळें, तिचें मात्र विस्मरण होणें शक्य नाहीं. या तरुण संघाचे कायमचे अध्यक्ष म्हणून मी किंवा श्री. वडवींनीं राहावें की नाहीं, हा महत्त्वाचा मुद्दा होता. मला वाटत होतें कीं आम्हां दोघांपैकीं कोणी तरी कायमचे अध्यक्ष म्हणून राहावें. हा मानाचा प्रश्न नव्हता. तरुण संघाला अधिकारानें मार्गदर्शन करण्याचें सुकाणूं आपल्या हातीं असावें, संस्था स्थापन करून नांवारूपाला आणतांना जे श्रम व खटपट करावी लागते, त्यासाठीं जें वातावरण उत्पन्न करावें लागतें, रात्रंदिवस माथाकूट करावी लागते, त्याची जाणीव व ज्ञान, अगदीं प्रथमपासून आमच्याबरोबर काम करणारांना आणि सामान्य जनतेला मुळींच असत नाहीं. या 'तरुण संघांत' आम्हीहि पहिल्यापासूनच होतों, आमचाहि अधिकार या संघावर आहे, अशी भावना समासदांमध्यें उत्पन्न होते व ती आवरणें फारच कठीण जातें. गांवसुधारणा व गांवची प्रत्यक्ष सेवा आणि गांवाची नीति (morale) योग्य मार्गावर अचूक राखणें यापेक्षां संघानें अन्यत्र लक्ष घालूं नये, असें मला वाटत होतें; म्हणून मी किंवा वडवींनीं संघाचे कायमचे अध्यक्ष व्हावें असा माझा आग्रह होता. याच्या उलट श्री. वडवी यांना वाटत होतें कीं "आपल्याला गांवामध्यें सुधारणा करावयाची आहे. तेव्हां संघांतीलच एखाद्या समासदाला अध्यक्ष करावें, आणि आपण बाहेर राहून त्यांना मार्गदर्शन करावें. आम्ही किती दिवस येथें राहणार आहोंत? शेवटीं गांवांतील तरुण पिढीच गांवाचें भवितव्य ठरविणारी आहे. बाहेर राहून आपलें मार्गदर्शन प्रत्यक्षांत आणणें आम्हाला शक्य न होईल तर संघाचा अध्यक्ष म्हणूनहि आम्ही तें करूं शकणार नाहीं. लोकमानसावरील आमची श्रद्धा यांत कसाला लागणार आहे. नियमानें किंवा कायद्यानें बांधून जबरदस्तीनें असलीं कामें होत नसतात व कोणी तशीं करूंहि नयेत." आम्हां दोघांचें म्हणणें ऐकून घेऊन महात्माजींनीं श्री. वडवींच्या विचारालाच पुष्टी दिली. त्यांचें म्हणणें 'तुम्ही कोणीहि अध्यक्ष होऊं नका. 'तरुण संघाला' आपल्या वाटीनेंच वाढूं द्या, सुधारूं द्या अथवा कुधारूं द्या.' अर्थातच महात्माजींचा निर्णय आम्हीं मान्य केला. 'तरुण संघां'तील समासदानें अगदीं निर्व्यसनी राहिलें पाहिजे, असा कटाक्ष संघाच्या घटनेप्रमाणें राखलेला होता. पण संघामध्यें कांहीं समासद विडी व सिगारेट ओढणारे होतेच. अध्यक्षहि धूम्रपानाचें व्यसन सोडूं शकले नाहींत. आम्हीहि त्याकडे डोळेझांक किंवा कानाडोळा करावयास शिकलों होतों. याचें मत्यंतर व परिणाम पुढें टेनन्सी बिलाच्या वेळीं दिसून आला. टेनन्सी ॲक्टाच्या कलमाप्रमाणें मालकानें जमिनीचा फाळा १½ च घेतला पाहिजे आणि मालक तसें न करतील तर त्यांना तसें करण्यास भाग पाडण्याचें आंदोलन सुरू केलें पाहिजे असा ठराव तरुण संघाच्या सभेमध्यें आला होता व अशा तऱ्हेचें वातावरण तरुण संघामध्यें किंवा संघाच्या समासदांमध्यें उत्पन्न झालें होतें. 'हें तरुण संघाचें

काम नव्हे. लोकांची प्रत्यक्ष सेवा करण्यापुरतेंच आपलें क्षेत्र तरुणसंघानें सीमित करून घ्यावें. वाटल्यास दुसरी एखादी समिति स्थापन करून त्या समितीच्या वतीनें लोकांना वाटेल तसलें आंदोलन सुरू करण्यास मोकळीक आहेच. 'तरुणसंघां'तील समासदांना त्या नवीन समितीचे समासदहि होतां येईल. पण घटनेप्रमाणें आणि लोकसेवेची दृष्टि कायम राहावी म्हणून या तरुण संघानें असल्या कामांत तूर्त लक्ष गुंतवूं नये' असा माझा सल्ला या बाबतींत होता. परंतु आमच्या सल्ल्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यामुळें त्या तरुण संघाची व आमचीहि शक्ति मात्र कमी कमी होत गेली.

'गंगाधरराव आम्हांला पोटाला घालतात व म्हणूनच त्यांना मिळून आम्ही मालकशाहीविरुद्ध होणाऱ्या या लढ्याला भीत आहोंत व मालकशाहीची म्हणजे गंगाधररावांची बाजू घेऊन भांडत आहोंत" असा आरोप आमच्याबरोबर कामें करणारे कार्यकर्तेच करूं लागले. आयती तयार असलेली संस्था या कामीं वापरण्याचा मोह तरुण संघाचे समासद आवरूं किंवा टाळूं शकले नाहींत. 'हे कार्यकर्ते यांनींच तयार केलेले आहेत, त्या आतां त्यांच्या लाथा' असें गांवांतील जमीनमालक व विशेषतः ब्राह्मण जमीनमालक आमच्या तोंडावर म्हणूं लागले होते. आमची स्थिति मृदंगासारखी झालेली होती. लोकसेवेचीं मामुली कामेंहि स्थगित झालीं. 'तरुण संघ' निष्क्रिय बनला. बारा तेरा वर्षे आस्थेनें जतन करून उभी केलेली संस्था कोलमडून पडली. घरांत राहणाऱ्या घुशींनींच घराचा पाया भुसभुशीत करावा तशी स्थिति 'तरुण संघाची' झाली. माझा सल्ला मी लेखी दिलेला होता तो 'तरुण संघाच्या' दप्तरांत आहे.[1]

---

[1] नम्र अभिप्राय व सल्ला.

"टेनन्सी ॲक्टाचा अम्मल रयत व जमिनीचे मालक यांच्यामध्यें कायदेशीर व्हावा व त्यासाठीं जरूर तर संघटनेचें काम हातीं घ्यावें या बाबतींत तरुण संघानें माझा सल्ला विचारला होता. त्यावेळी मी माझें मत खालीलप्रमाणें व्यक्त केलेले आहे :

"सल्लागाराचें मत हें शिफारस-वजा असतें, हुकूमवजा असत नाहीं. कोणत्याहि घटनेमध्यें सल्लागाराचें हेंच स्थान असतें व असावें. माझा आजचा सल्ला ही शिफारस म्हणून समजला पाहिजे.

तरुण संघाचें काम केवळ सेवारूप व आत्मपरीक्षणात्मक असावें. त्यांतच तरुण संघाची उन्नति व महत्त्व आहे. तरुण संघाच्या वतीनें टेनन्सी ॲक्टासारखीं कामें हातीं घेऊं नयेत.

गांवच्या सर्व लोकांची जाहीर सभा बोलावून एक कमिटी बनवून त्या कमिटीमार्फत हें काम केलें जावें असें मला वाटतें. त्या कमिटीनें हें काम कसें करावें, याविषयींहि माझे विचार मी योग्य वेळीं जरूर तर सांगेन.

'समग्र ग्रामसमिती'च्या कार्यकर्त्यांना या कामांत भाग घ्यावयाचा असल्यास त्यांना भी

'तरुण संघा' मार्फत पुढील वर्षभरांत जें व्हावें असें आम्हांला वाटत होतें तें निवेदन करून त्याला धरून तरुण संघाकडून मार्गदर्शनार्थ ठराव मंजूर करून घ्यावा, या हेतूनें 'रंगधुळी' येथें 'तरुण संघाची' वार्षिक सभा घेण्याची प्रथा आम्हीं स्थापन केली होती. हुदली गांवापासून सुमारें तीन मैलांवर दूर एका क्षेत्राच्या ठिकाणीं संक्रांतीच्या दिवशीं लोक जात असतात. त्या क्षेत्राला 'रंगधुळी' म्हणतात. तरुण संघाच्या सर्व सभासदांनीं एकत्रित जमावें, सर्वांनीं मिळून तेथें स्वयंपाक करावा व शेवटीं तिसऱ्या प्रहरीं तरुण संघाची वार्षिक सभा घ्यावी व विचारविनिमय करावा, ही प्रथा निर्वेधपणें कांहीं वर्षें चालू होती. पुढें 'तरुण संघांत' मतभेद उत्पन्न झाल्यामुळें आम्हाला आवडणार नाहींत, अशा बाहेरच्या लोकांना संक्रांतीच्या दिवशीं रंगधुळी येथें होणाऱ्या या वार्षिक सभेस अध्यक्ष म्हणून जाणूनबुजून निमंत्रित केलें जाऊं लागलें व आम्ही रंगधुळीच्या वार्षिक सभेस हजर रहाण्याचें टाळण्याकडेच आमची प्रवृत्ति होऊं लागली

•

---

समितीच्या कामांतून मुक्त करून देईन. मात्र समितीमध्यें राहून त्यांना असल्या कामांत भाग घेतां येणार नाहीं.

केवळ यापूर्वी मी अमुक बोललों आहे म्हणूनच त्याला कोणी चिकटून बसूं नये. आपलें मत बदललें असल्यास तसें स्पष्टपणें सांगण्यास कोणासहि प्रत्यवाय नसावा.

. जो ठराव आपण मंजूर करतों त्याची जबाबदारी आपल्या शिरावर उघडपणें घेण्यास प्रत्येक सभासदानें तयार असलें पाहिजे. असें असेल तरच ठरावाला अनुकूल मत द्यावें. मगच योगत्याहि ठरावाला जोर येत असतो.

मंत्री—पुंडलीकजी कातगडे
२१-५-१९४८

## ३३.

# हरिजनवस्तींत स्वतंत्र विहीर

सन १९३५ सालींच हरिजन बंधूंच्यासाठीं त्यांच्याच वस्तीमध्यें स्वतंत्र विहीर खणून ती खालपासून दगडांनीं बांधून द्यावी, असा विचार आम्हीं ठरवला. हरिजनांसाठीं स्वतंत्र विहीर बांधविल्यास अस्पृश्यतेवर आम्हीच शिक्कामोर्तब करण्यासारखें आहे, अशी शंकाहि आमच्यापैकीं कांहींनीं पुढें मांडली होती. आपल्या वस्तीमध्यें किंवा गल्लीमध्यें गांवांतील अनेकांनीं अशा विहिरी बांधविलेल्या आहेत. गांवामध्यें मध्यावर एक विहीर गंगाधररावांच्या आत्याबाईनेंहि बांधवून दिलेली आहे. तेव्हा हरिजनांनीं आपल्या वस्तीमध्यें विहीर बांधविण्यास कोणती हरकत आहे? या व अशा सर्व तऱ्हेच्या चर्चेचा व भवति न भवतीचा परिणाम व अखेरचा निर्णय एवढाच झाला कीं 'ही हरिजनांची विहीर गांवांतील सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या श्रमदानानें बांधविण्यांत यावी, गवंड्यांनीं हें काम मोफत करावें, डोंगरांतून लागणारे दगड लोकांनीं मोफत वाहून आणून द्यावेत व त्यांत हरिजनबंधूंनींहि आपल्या हातून होईल ती मदत व श्रमदान द्यावें.'

ब्राह्मण, लिंगायत, जैन, मराठा व मुसल्मान यांनीं या हरिजन विहिरीच्या कामीं जातीनें श्रमदान व आर्थिक मदत दिलेली आहे. बेळगांवचे लोखंडाचे व्यापारी श्री. विठ्ठलराव गावडे यांनीं या विहिरीसाठीं लागणारें लोखंड व लोखंडी गडगडा मोफत दिलेला आहे. गांवांतील गवंड्यांनीं व विशेषतः श्री. बसाप्पा यमकनमर्डी यांनीं केवळ अत्यल्प मजुरी घेऊन काम केलेलें आहे. ही विहीर बांधवून काढण्यास श्री. किशोरलाल मश्रूवाला यांनीं 'गांधी सेवा संघा'कडून दीडशें रुपये मदत करविली आहे. ही शिफारस श्रीमान रघुनाथराव घोत्रे यांनीं केलेली होती.

येथें एक नवीन प्रश्न उत्पन्न झाला. त्या विहिरीच्या जागेजवळ कातडें कमविणाऱ्या एका ढोराचें घर होतें. त्या कातड्याच्या घाण पाण्याची दुर्गंधी सर्व हरिजन वस्तीभर पसरलेली होती. आणि आतां तेंच घाणपाणी त्या विहिरीमध्यें झिरपून जात असे. विहिरींमुळें ती जागा अधिक साफ व उठावदार दिसूं लागल्यामुळें

त्या ढोरानें आपल्या घराचा दरवाजा घराची भिंत फोडून त्या दिशेला बसविण्याचें ठरविलें. त्या भिंतीला लागून आम्हांला एक दगडी भिंत बांधावी लागली. वास्तविक हा तंटा आम्हाला त्या विहिरीच्या पाण्याची स्वच्छता टिकविण्यासाठीं करावा लागला. घराचा दरवाजा या बाजूला लावण्यामध्यें विहिरीपुढील जागा आस्ते आस्ते आक्रमित करण्याची त्या ढोराची ती सुरुवात होती. दुसऱ्याची किंवा सार्वजनिक जागा आक्रमण्याची हुदली गांवामध्यें एक खास पद्धत आहे. एखादा मोठा दगड आपल्या घराच्या भिंतीजवळ आणून ठेवावयाचा. पुढें त्या दगडावर हातपाय धुण्यास प्रारंभ करावयाचा, कांहीं दिवसांनंतर ही दगडांची संख्या वाढवावयाची, नंतर त्या अव्यवस्थित पडलेल्या दगडांचा कट्टा बनवावयाचा, मग त्या कट्ट्याच्या कडेला एक लहानसा कूड बांधवावयाचा, त्या कुडाच्या जागीं पुढें एक लहानशी पडदी घालावयाची आणि शेवटीं त्यावर एक लहानसें छप्पर टाकून तेथें भजी व चुरमुरे विकण्याचें एक लहानसें दुकान सुरू करायचें आणि ती जागा आपल्या वहिवाटीखालीं घ्यावयाची. आक्रमणाची हीच रीत कमीअधिक प्रमाणानें पुष्कळ लोक अवलंबीत असतात, मग यांत सार्वजनिक रस्ता किती अरुंद आणि वाकडातिकडा होतो याकडे कोणीच लक्ष देत नाहीं. गांवचे पंच किंवा ग्रामपंचायतीचे धुरीणहि या गोष्टीकडे फारसें लक्ष देत नाहींत, याचें कारण गांवामध्यें कोठें ना कोठें अशा प्रकारचें आक्रमण त्यांनींच केलेलें किंवा करण्याच्या कामांत त्यांचेहि हात बरबटलेले असावयाचेच. तें लोकांच्या डोळ्यावर येईल ही त्यांना भीति होती. आमच्याबरोबर काम करणारांमध्येंहि असली आक्रमणप्रवृत्ति असलेले कार्यकर्ते कांहीं कमी नव्हते. परंतु गांवांत भांडखोर तेवढे आम्हीच. कोणाकोणाशीं आणि किती भांडायचें हा आमच्यापुढें प्रश्न होता.

गावामध्यें बहुतेक रस्ते फरसबंद झालेले होते, ही गोष्ट मीं पूर्वी निवेदन केलेलीच आहे. त्या फरशीवर शेकोटी पेटविली तर त्या फरशीचे दगड कमजोर व ढिसूळ होतात. हें अनेक वेळां लोकांना समजून सांगितल्यानंतरहि गांवामध्यें फरशीवरील शेकोट्या कमी झालेल्या नव्हत्या. त्या शेकोट्यांपुढें बसून हिवाळ्यांत सकाळीं शेकत बसलेल्या लोकांपैकी कोणी एखाद्यानें मला तेथून जातांना पाहिल्यास तो मनुष्यच इतरांना रागाचा आव आणून म्हणत असे कीं, 'काय करावें बुवा! शंभर वेळां सांगितलें तरी तुम्ही ऐकतच नाहीं. फरशीवर शेकोटी पेटविल्यानें तो दगड नुसता ढिसूळ होतो असे नाहीं तर सबंध फरशीच ढिली होते. हाडांचीं काडें करून व जिवाचें रान करून पुंडलिकजींनीं फरशी बांधविली आणि तुम्ही अशी खिळखिळी ती करून उखडून टाकणार ना! आत्तांच्या आत्तां पाणी आणून त्या शेकोटीवर घाला आणि ती विझवून टाका पाहूं!'

एखादे वेळीं दगडांवर पेटती शेकोटीच मला पाहावयास मिळत असे. तेथें शेकत बसलेला एकहि माणूस नसे. त्यांना कोठून तरी मी येत आहें अशी बातमी लागल्यामुळें ते लोक आधींच पळून गेलेले असत! तेथें कोण शेकत बसलेले होते हें

आजूबाजूच्या कोणासच माहीत नसे!! कारण तेच लोक मुळीं त्या शेकोटीभोंवतीं जमून शेकत बसलेले असावयाचे!!! मला तें सर्व माहीत आहे हेंहि ते जाणूनच असत. खेड्यांतील ही प्रवृत्ति कशी बदलावयाची हा एक आमच्यापुढें कूट प्रश्न होता. या प्रश्नाचें उत्तर आम्हांला कधींच सांपडलें नाहीं. शिक्षणाच्या मार्फत जनमानस तयार करीतच दोनचार पिढ्यांमध्यें ही वृत्ति बदलतां आल्यास तोच अगदीं जवळचा मार्ग (shortest cut) आहे, असें मानून आम्ही आमच्या कामाला लागत असूं.

ही हरिजन विहीर बांधवून संपूर्ण तयार झालेल्या दिवशींच गंगाधररावांना भेटण्यासाठी श्री. शंकरराव देव व श्री. केशवराव जेधे पुण्याहून हुदलीस आलेले होते. त्यांच्या हस्तेंच या 'हरिजन विहिरीचें' उद्घाटन झालें. गांवभर सर्वांना चुरमुरे खोबरें वांटण्यांत आलें. त्या विहिरींतील पाणी स्वतः ओढून श्री. शंकरराव देव व श्री. केशवराव जेधे यांनीं प्रथम प्राशन केलें.

## ३४.

## रस्तादुरुस्ती व गांवांतील इतर कामें

रस्तादुरुस्ती व गांवांतील इतर नवीन नवीन उपक्रमांतील कामासाठीं मनुष्यबळाची आवश्यकता अत्यंत भासूं लागली.

खडीच्या रस्त्याची (Mettled Road) दुरुस्ती एखादें वर्ष पुढें ढकलली तर चालूं शकेल पण फरसबंद रस्त्याची दुरुस्ती वेळच्या वेळींच झाली पाहिजे. कारण एक फरशी ढिली झाली किंवा उचटली गेली तर ती एका आठवड्याच्या काळांत चोरीला जात असे. त्या फरशीच्या जागीं सामान्य दगड बसवून भागण्यासारखें नसतें. त्यामुळें इतर फरशाहि उचटून वर येत असत. 'पडत्या फळाच्या आज्ञेच्या' कथेचें स्मरण येथें झाल्याशिवाय राहत नाहीं. कोठली फरशी कोणीं नेली, ती कोणाच्या घरीं गेली, किंवा कोणाच्या जनावरांच्या गोठ्यामध्यें बसविली गेली हें सर्वांना अंदाजानें किंवा प्रत्यक्ष माहीत असलें तरी त्याचा छडा लावतां येत नसतो. याचीं कारणें अगदीं उघड आहेत.

आणि म्हणूनच फरशीची दुरुस्ती वर्षाच्या वर्षालाच नव्हे, तर फरशीकडे जातां येतां लक्ष ठेवून लागलीच करावी लागते. यासाठीं मनुष्यबळ आपल्या हाताशीं कायम रहावें म्हणून आठवड्यांतून एक वार (दिवस) सोडण्याची जुनी प्रथा पुनः प्रचारांत आणविण्याची खटपट केली व पंचाकडून हें काम करविण्यांत आम्हाला यश लाभलें. 'वार सोडणें' याचा अर्थ गांवांतील सर्वांनींच आपल्या शेतीचें किंवा धंद्याचें काम आठवड्यांतून एक दिवस बंद ठेवणें आणि तो सबंध दिवस सार्वजनिक कामामध्यें खर्च करणें असा आहे. ग्रामपंचांनीं 'वार सोडण्याचा' आदेश दिल्यामुळें गांवांतील सर्व कामें बंद होत असत. पण त्या दिवशीं सार्वजनिक कामाला तो वेळ दिला जात असे असें मात्र नव्हे. सबंध गांवांतील १०।१५ माणसें—आणि तींहि ठराविक माणसेंच—सार्वजनिक कामाला लाभत असत. कांहीं लोक थोडें काम करून, व कांहीं तर केवळ चेहरा दाखवून उपस्थितीची नोंद झाली आहे अशी खात्री होतांच निघून जात. आमच्याबरोबर काम करणारे कार्यकर्ते व तरुण संघाचे कांहीं सभासद नियोजित

कामाला मिळत असत इतकेंच! 'गांवचें काम म्हणजे आपलें स्वतःचें किंवा आपल्या घरचें काम,' असें वाटण्यापेक्षां 'सर्वांचें काम म्हणजे कोणाचेंच काम नव्हे' ही इचीच प्रत्यक्षामध्यें अनुभवास येऊं लागली होती. स्वतःच्या शारीरिक श्रमानें, हातून होणाऱ्या गांवसेवेनें आपल्या मनावर चांगले संस्कार व्हावेत व होवाव, हा आमचा प्रयोग व्हावा तसा यशस्वी होईना आणि प्रत्यक्ष फळहि दिसेना.

आम्ही या समस्येचा विचार, चिंतन व चिंता करीत होतोंच. हिंदुस्थानमध्यें अशा प्रकारें ग्रामसेवेचे प्रयोग कोठें कोठें व कसे कसे चालले आहेत यांची माहितीहि आम्ही मागवीत होतों. वर्ध्याजवळ सिंधीगांवीं मीराबेन (मिस स्लेड) यांना मुद्दाम राहाण्यास गांधीजींनीं पाठविलें होतें. तेथील कामाची व प्रयोगाची माहिती मोठ्या रसभरित भाषेमध्यें श्री. महादेवभाई देसाई स्वतः 'हरिजन' या इंग्रजी साप्ताहिकामध्यें लिहीत असत. त्यांच्या अनुभवापेक्षां कितीतरी पटीनें चांगला व उत्साहजनक असा आमचा हुदलीचा अनुभव होता. तें रंगदार वर्णन वाचून आमच्या मनामध्यें त्यांची तुलना आपोआपच होऊन जात असे. सिंधीगांवांतील जनतेपेक्षां हुदली गांवांतील जनतेनें आमच्या कोणत्याहि योजनेला अधिक साथ दिली होती. लोकांना आपल्या गांवच्या कामामध्यें निव्हाळा वाटत असे व अभिमानाची शिकवणहि असे. या ठिकाणीं ही गोष्ट देखील मुद्दाम उल्लेखिली पाहिजे कीं आमच्या कोणत्याहि कामांत आम्हाला साथ देण्यासाठीं गंगाधररावांच्या रयतांवर आम्ही केव्हांहि प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दडपण वा वजन आणविलेलें नाहीं. उलट गंगाधररावाचे त्यावेळचे कारकून तर स्वभावानें असे होते कीं, आपलें ठराविक काम सोडून आपल्या विशिष्ट चाकोरीच्या बाहेर ते कधींहि जात नसत. तथापि आम्हाला या गोष्टीचीहि जाणीव होती कीं आम्ही सर्व कार्यकर्ते गंगाधररावाच्यामुळेंच या खेड्यांत आलों आहोंत व आम्ही करीत असलेलीं सर्व कामें त्यांना आवडवात व त्या कामांच्या प्रगतीकडे गंगाधररावांचेंहि लक्ष आहे, ही गोष्ट गांवांतील लोकांना व विशेषतः गंगाधररावांच्या रयतांना माहीत होती. म्हणूनच ती जनता आमचा अतिक्रम, आग्रह किंवा उपद्याप सहन करीत असे. या वस्तुस्थितीचा कृतज्ञताबुद्धीनेंच मी येथें उल्लेख केलेला आहे. 'हीं मुलें गांवांत व्यर्थ काय उपद्याप करीत आहेत?' असा प्रश्न त्यांना भेटावयास येणाऱ्या रयतांना करून त्यांच्या तोंडून 'नाहीं. ते करीत आहेत तें काम चांगलेंच आहे. गांवच्या हिताचें व कल्याणाचेंच आहे. ते काय आपल्या स्वार्थासाठीं हीं कामें करीत आहेत? बिचारे एवढे ते राबत आहेत ते तरी कांहीं एका जातीसाठीं किंवा पंथासाठीं नव्हे तर सर्व जनतेसाठीं तें काम करीत आहेत. आपण जगासाठीं, भारतासाठीं, बाहेर वाटेल तेवढें काम केलें आहे, पण आमच्या या गांवासाठीं हे लोक आपल्यापेक्षांहि अधिक कष्ट घेत आहेत.' असे उद्गार वदवीत असत. गांवांतील लोकांनीं आमच्याविषयीं व आमच्या कामाविषयीं असे उद्गार काढलेले ऐकण्यास गंगाधररावांना आनंद वाटत असे, धन्यता वाटत असे. गंगाधरराव

Forwarded with compliments from the Ministry of Education & Youth Services Government of India.

३५.

## उर्मिनट्टी गांवांतील श्रमदानाचा प्रयोग कसा निभावला ?

या सर्व गोष्टी चालू असतांनाहि आमच्या कामाला लोक मिळण्याचा प्रश्न सुटलेला नव्हता. विश्वप्रयत्न करूनहि सार्वजनिक कामामध्यें स्वयंस्फूर्तीनें लोकांकडून श्रमदान करविण्यांत आम्हाला यश येण्याचीं चिन्हें दिसेनात. म्हणून आम्ही एक नवीन उपाय करून पाहण्याचें ठरविलें. आजूबाजूच्या दहापंधरा खेड्यांतील लोकांना महिन्यांतून एकदां भिन्न भिन्न खेड्यांमध्यें आळीपाळीनें बोलवावें. प्रत्येक खेड्यांतून आठदहा लोक जरी एक दिवसापुरते कामाला आले तरी शेदीडशे लोक जमतील. लोकांनीं आपलें जेवण–भाजी भाकरी–आपल्या बरोबर आणावें. कामाला लागणारीं साधनें, खोरें, कुदळ, घुट्टी, पहार वगैरे लोकांनीं आपलीं आपल्याबरोबर घ्यावींत. मग या सर्व सज्ज लोकांनीं ठरलेल्या खेड्यांत काम करावें. असा विचार करून जवळपासच्या १०।१५ गांवांतून आम्ही तशीं व्याख्यानें दिलीं. गांव आणि कामाचा दिवस ठरविला. सर्वांना आमच्या व्याख्यानामध्यें कोणतें काम करावयाचें व कोणत्या खेड्यांत हें काम प्रथम सुरू व्हावयाचें याची कल्पना दिली. या सार्वजनिक कामासाठीं श्रमदानासाठीं सर्व लोकांनीं उर्मिनट्टी गांवांमध्यें जमावें असें जाहीर निमंत्रण देऊन ठेवलें.

उर्मिनहट्टी गांवच आम्ही निवडण्याचें कारण असें होतें कीं, त्यावेळीं चि. गंगाप्पा यमकनमर्डी हा कार्यकर्ताच तेथें चरख्यामधील नवीन सुधारणा–म्हणजे चरख्याला नवीन चक्र बसवून देणें, खेड्यांतील सूत काढणाऱ्या स्त्रियांच्या चरख्यामध्यें प्रविष्ट करून देण्याचें काम करीत होता. त्यानेंच उर्मिनहट्टीमधील सामुदायिक कार्यक्रमाची पूर्वतयारी करून त्या गांवांतील वातावरण अनुकूल करून ठेविलें होतें. खेड्यांतील जाहीर सभेमध्यें व्याख्यानाच्या भरांत मनुष्याच्या तोंडून चार शब्द अधिकहि जातात. त्याप्रमाणें मी माझ्या भाषणांत सांगितलें होतें कीं 'प्रत्येकानें कामाला लागणारीं सर्व साधनें व आपलें जेवण आपल्याबरोबर आणावें. जेवणाच्या भरतीला आम्ही तेथें फक्त भरपूर शिरा सर्वांना खाण्यासाठीं देऊं. आमचा अंदाज

जास्तींत जास्त शंभर लोक कामाला येतील असा होता; आणि तितक्या लोकांना शिरा खाऊं घालण्याची तयारी व व्यवस्थाहि आम्हीं केली. उर्मिनहट्टी गांवांतील मुख्य रस्ता बांधवावा, एवढें त्या दिवशींचें काम होतें.

अशा तऱ्हेचा हा पहिलाच प्रयोग असल्यामुळें हुदली गांवांतून गवंडी, पायरवट व आमचे सर्व कार्यकर्ते आम्ही आमच्याबरोबर उर्मिनहट्टीस घेऊन गेलों होतों. पहांटेच गांवांतील बैलगाड्या जोडून, त्यांतूनच आम्ही उर्मिनहट्टी गांवीं पोहोंचलों. सकाळीं साडेसात वाजतां कामाला प्रत्यक्ष आरंभ व्हावयाचा होता. कामाला कोणी येतात किंवा नाहीं अशी शंकाहि माझ्या मनांत अनेकदां येऊन गेली होती. मी गंगाधर-रावांच्या घरच्या घोड्यावरून गेल्यामुळें सर्वांच्या आधीं उर्मिनहट्टीस पोहोंचलों होतों. कांहीं गांवचे लोक आदल्या दिवशीं रात्रींच तेथें मुक्कामास आले होते. आमच्या कल्पनेपेक्षां चौपट पांचपट लोक त्या गांवीं येऊन पोहोंचले होते. आणि आणखीहि कांहीं मागून हळूहळू येऊन पोहोचत होते. हुदलीच्या गाड्याहि थोड्याच वेळांत येऊन पोहोंचल्या. सर्वांनीं आपापली न्याहारी व जेवण आपल्याबरोबर बांधून आणलेलेंच होतें. तो सर्व जनसमूह पाहून व तें अफाट दृश्य पाहून मला अति आनंद झालाच; पण त्याच वेळीं मी अत्यंत चिंताग्रस्तहि झालों. बरोबर सकाळीं साडेसात वाजतां कामाला प्रारंभ करविला, कामाचीं छोटीं छोटीं पथकें व त्यांचे नायक बनविले. आमचा 'विश्वकर्मा' गवंडी श्री. बसाप्पा यमकनमर्डी यांच्या नेतृत्वाखालीं कामाला प्रारंभ झाला. तेव्हां आतां या इतक्या लोकांना भरपूर पोटभर शिरा कसा व कोठून द्यावयाचा या चिंतेनें मला घेरलें. इतक्या लोकांना पुरा होणारा माल तरी या खेड्यांत कुठून येणार? या विचारानें मी बेचैन झालों. पण म्हणतात ना, साखर खाणार त्याला देव देणार आणि खरोखरच देव पाठीशीं राहिला!

सुदैवानें त्या दिवशीं गंगाधररावांचा मुक्काम हुदलीमध्येंच होता. सर्व कामें व्यवस्थित सुरू झाल्यावर मी घोड्यावरून हुदलीस गंगाधररावांकडे जाऊन येण्याचें ठरविलें. माझ्याबरोबर काम करणारांना माझ्या चिंतेची कल्पना येण्यास वेळ लागला नाहीं. आहे ही परिस्थिति व आमचे चुकलेले अंदाज लोकांपुढें मांडावेत व आमच्या-कडून होईल तेवढा शिरा प्रसाद म्हणून चमचा चमचा घ्यावा व दिवस गोड करून न्यावा अशी सर्वांना प्रार्थना करावी, असेंहि मनांत आलें. पण हें धैर्य माझ्या हातून होईना. म्हणून मी घोड्यावरून तडक हुदलीस निघून गेलों.

गंगाधरराव आपल्या बैठकीवर आपल्या वाड्यामध्यें बसले होते. त्यांच्यापुढें जाऊन मी उभा राहिलों पण माझ्या तोंडून शब्दच उमटेना. तोंडाऐवजीं माझे डोळेच बोलूं लागले. 'आज उर्मिनट्टीस श्रमदानाचें काम आहे ना! मग तूं येथें कसा?' असें गंगाधररावांनीं मला विचारून अडचणीला वाचा फोडली. सर्व परिस्थिति कशी घडून आली व आतां आमची अडचण काय आहे, याची सर्व स्पष्ट कल्पना मीं त्यांना दिली आणि त्यांच्यापुढें एखाद्या स्थाणूसारखा स्वस्थ उभा राहिलों. त्यांनीं

माझ्याकडे नखशिखान्त पाहिलें व म्हटलें कीं, 'तुझा कारभार सगळा असाच ! भरपूर शिरा देण्याची घोषणा केल्यानंतर लोक अधिक येतील अशी कल्पना करावयाची कीं लोक कमी येतील असें मानून चालावयाचें ? याच घोड्यावरून परत उर्मिनट्टीस जा व लोकांना सांग कीं दोनप्रहरीं आपापली शिदोरी खाऊन पुनः कामाला लागावयाचें आणि सुमारें चार वाजतां काम संपवून, नंतर प्रसाद म्हणून भरपूर शिरा घेऊन, सभा करायची. त्यानंतरच सर्वांनीं निरोप घ्यावयाचा. तूं उर्मिनट्टीस पोहोचल्यावर घोडा परत इकडे पाठवून दे.'

माझ्यादेखतच गंगाधररावांनीं आपल्या कारकुनाला बोलावून घेतलें. घरचीं मोठीं भांडीं काढविलीं. रयतांच्या चारपांच बैलगाड्या जुंपविल्या. गांवांतील दुकानांतून पांच सहाशें लोकांना भरपूर होईल इतका शिरा तयार होण्याइतकें सामान विकत घेण्यास सांगून आपल्या घरांतील गुळाच्या ढेपा दिल्या आणि सर्व शिधा घेऊन, उर्मिनट्टीला जाऊन दोन प्रहरीं दोन वाजण्यापूर्वी शिरा तयार होईल असें करण्यास आपल्या कारकुनास बजावून सांगून त्याला उर्मिनट्टीला पाठवून दिलें.

मी घोड्यावरून परत सुमारें सकाळीं अकरा वाजतां उर्मिनट्टीस पोहोंचलों. लोकांचें लक्ष आमची 'घोषणा' प्रत्यक्षांत येते किंवा नाहीं याकडे होतेंच. आपसांत लोक काय कुजबुजत असतील याची कल्पना करण्याचें काम मी वाचकांवरच सोपवितों. मीहि हुदलीमध्यें काय झालें याचा कोणासहि मागमूस देखील लागूं दिला नव्हता. पण सुमारें साडेबारा वाजतां दोन प्रहरीं हुदलीहून बैलगाड्यांमधून मोठीं भांडीं आणि शिरा करण्याचें सामान व त्यासाठीं लागणारीं लाकडेंहि आलीं असल्याचें लोकांनीं पाहिलें त्या वेळीं त्यांची खात्री पटली कीं आमची घोषणा पोकळ नाहीं व फोल ठरणारी नाहीं. सायंकाळीं पांच वाजतां काम बंद करण्याचें ठरविण्यांत आलें होतें. रस्ता बांधविण्याचें काम उत्तम झालें. रस्त्यामध्यें एका बाईच्या घराचा कांहीं भाग पुढें आलेला होता. आम्ही त्या घराच्या मालकबाईस सर्व कांहीं समजावून सांगितलें. त्या बाईनीं आमचें म्हणणें मोठ्या आनंदानें मान्य केलें आणि आपल्या घराचा तेवढा भाग पाडण्यास तिनें स्वतःच प्रारंभ केला. तें उत्साही दृश्य पाहण्यासारखेंच होतें. त्या बाईनीं आपल्या घराचा तेवढा भाग आनंदानें लोककार्यार्थ वाहिल्यामुळें तो रस्ता अगदीं सरळ होऊं शकला. समाजहितासाठीं लोक सर्व प्रकारच्या त्यागास तयार होतात हें यामुळें सिद्ध झालें.

रस्त्याचें काम बंद करविल्यानंतर एक छोटीशी सभा घेण्यांत आली. उर्मिनट्टी गांवाचे लोकहि या कामाला हातभार लावण्यास पुढें आले होते. सभेमध्यें समयोचित अशीं कांहीं कार्यकर्त्यांचीं भाषणें झालीं. आभार प्रत्याभार होऊन सभेचें काम संपविण्यांत आलें. तोंपर्यंत शिराहि शिजून तयार झालेला होता. सर्वांना पोटभर शिरा मिळाला एवढेंच नव्हे, तर शेवटीं कांहीं लोकांना थोडा थोडा शिरा आपापल्या घरीं बांधूनहि नेतां आला. 'आतां पुढील महिन्यामध्यें कोणत्या गांवीं

असेंच जमावयाचें!' असें कांहीं लोकांनीं तेव्हांच आम्हाला विचारलेंहि होतें. 'पुढें जरूर तर कळवूं' असें सांगून आम्ही ती वेळ निभावून नेली. या घटनेपासून आम्ही घ्यावयाचा तो बोध घेतलाच आणि असल्या प्रकारच्या कार्यक्रमाला यापुढें अंगावर ओढून घेण्याचें विचारपूर्वक टाळलें.

या कार्यक्रमाविषयीं गंगाधररावांनीं अनेकांपाशीं चौकशी केली. पण प्रत्यक्ष आम्हाला त्यांनीं त्याविषयीं कधींच कांहींहि विचारलें नाहीं. त्यांना या प्रकरणांत बराच खर्च सहन करावा लागलेला आहे. तरी सुद्धां त्या गोष्टीचा उच्चार वा उल्लेख त्यांनीं कोठेंहि केलेला नाहीं. 'ज्यांचीं देह मनें तशींच वचनें पुण्यामृतें ओतिलीं' अशा महात्म्यांपैकींच हीं थोर हृदयें नाहींत काय!

३६.

## एका कंदिलाची अद्भुत कथा

गांधी सेवा संघाचें द्वितीय अधिवेशन वर्धा जिल्ह्यांतील 'सावळी' गांवीं व्हावयाचें टरविलें होतें. हें सावळीचें संमेलन सन १९३६ सालीं झालें. या संमेलनास गंगाधरराव उपस्थित राहिले नव्हते. मला व श्री. वडवी यांना त्यांनीं या संमेलनासाठीं आश्रमांतून सावळीस पाठवून दिलें. 'या संमेलनांत जें कांहीं बोलावें लागेल तें पुंडलीकजी बोलतील. तुम्ही त्यांना पाठिंबा द्या' असें त्यांनीं वडवी यांना सांगून ठेवलें होतें. आमच्याबरोबर आणखीहि एकदोन कार्यकर्ते (बहुधा दादा काळे त्यांपैकीं असावेत) सावळीस गेले होते पण त्यांचीं नांवें आज मला आठवत नाहींत. संघाचीं हीं समेलनें आठवडाभर चालत.

त्याकाळीं गांधी सेवा संघाकडून संमेलनाची माहिती व कांहीं अगत्याच्या सूचना देणारें परिपत्र सभासदाकडे पाठविण्याची वहिवाट होती. सावळीच्या संमेलनाच्या परिपत्रांत अशीहि एक सूचना होती कीं संमेलनाच्या छावणीमध्यें वीज घेतली जाणार नाहीं तेव्हां सर्वांनीं आपापल्याबरोबर कंदील आणावा. त्यांत तेलवात पुरवण्याचें काम 'गांधी सेवा संघ' करील. लांबच्या प्रवासामध्यें एखादा बोजा नेणें त्या मानानें कांहींसें सोईचें असतें पण कंदिलासारखा नाजूक जिन्नस बरोबर वागविणें कठीण असतें. म्हणून आम्ही विचार केला होता कीं, 'कित्येक सभासद कंदील आणणारच आहेत. रात्रीं आम्हांला प्रकाशाची आवश्यकता भासलीच तर कोणाच्या तरी कंदिलाच्या प्रकाशांत जाऊन बसलें म्हणजे झालें आणि कंदिलाचा प्रकाश आम्हांला मिळालाच नाहीं तर रात्र होतांच बिछान्यावर बसून चर्चा करूं किंवा आराम झोंपीं जाऊं'. अर्थात् आम्ही आमच्याबरोबर कंदील घेतलाच नाहीं.

सावळी येथील संमेलनाचें ठिकाण स्टेशनपासून बरेंच दूर होतें. त्यासाठीं मोटर बसेस् ठेवलेल्या होत्या. संमेलनाच्या सभासदांना स्टेशनपासून सावळींतील संमेलनाच्या ठिकाणीं पोहोंचवून मोटरबसेस् पुनः परत येत असत, व दुसऱ्या सभासदांना आणून पोचवीत असत. त्यासाठीं मोटारींचे बरेच हेलपाटे होत होते. एका मोटारबसच्या टपावर आमचें

सामान देऊन आम्ही त्या बस्ने संमेलनस्थळीं आलों. बस्वाल्यानें सर्वांचें सामान खालीं उतरवून ठेवून दुसरी खेप करण्यासाठीं बस् निघून गेली. कँपमधील कर्नाटकाची जागा व आमची उतरण्याची खोली पाहण्यास आम्ही निघून गेलों. जागा पाहून परत येईपर्यंत बहुतेकांनीं आपापलें सामान नेलेलें होतें. आमचेंच तेवढें सामान तेथें पडलें होतें. तें सर्व तेथून हलवितांना आम्हाला आढळून आलें कीं त्यांत एक सुंदरसा लहान कंदीलहि होता. तो कंदील आम्ही आमच्याबरोबर घेतला. आमचें सामान सर्व नीट लावलें. नंतर तो कंदील सर्व प्रांतांच्या खोल्यांमधून म्हणजे सर्व छावणीभर हिंडवला. त्या कंदिलाला 'आपला' म्हणण्यास कोणीच तयार होईना. मग एक विचार आला. 'ठीक झालें! तो कंदील एक आठवडाभर आपण वापरूं आणि जातांना संमेलनाच्या स्वागत समितीकडे तो देऊन मोकळे होऊं.' संमेलनाचें अधिवेशन व कामकाज संपलें. आम्ही तो कंदील घेऊन स्वागत कचेरींत गेलों. तेथें श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे होते. ते म्हणाले 'हा कंदील स्वागत मंडळाचा नव्हे. आम्ही तो स्वीकारूं शकत नाहीं. तुम्ही त्याचें वाटेल तें करा.' आम्ही तो कंदील नाइलाजानें आमच्याबरोबर वर्ध्यास आणला. वर्ध्याला जमनालालजी बजाज यांच्याकडे मोठमोठे बरेच कंदील होते. त्या कंदिलाच्या मानानें आमचा कंदील म्हणजे एक अगदीं लहान पिल्लूं होतें. मी तें पिल्लूं त्या मेळाव्यांत नेऊन सोडून दिलें. जणुं कौतुकानें ते सर्व त्याच्याभोंवतीं जमले आहेत असें वाटे. जमनालालजींचा नोकर 'नानू' यानें तें पाहिलें होतें. त्याला वाटलें होतें कीं, या कंदिलांत तेल घालावें म्हणून त्याला येथें ठेवलें असावें. आम्ही साडेचारच्या गाडीनें अमरावतीस जाण्यासाठीं निघालों. टांग्यांतून स्टेशनकडे आम्ही जात असलेलेहि 'नानू'नें पाहिलें होतें. थोडया वेळानंतर तो घरच्या कंदिलांमध्यें तेल घालावयास गेला. साहजिक त्याचें लक्ष आमच्या छोटूकडे गेलें. त्यानें तो साफ केला, तेल वात पाहिली. अद्यापि सायकलवरून गेल्यास रेल्वेगाडी गांठतां येईल या विचारानें नानूनें छोट्याला घेऊन धूम ठोकली. गाडी सुटलीच होती. मी खिडकीपाशीं बसलों होतों. मला पहातांच 'घ्या आपल्या बाळ कंदिलाला' असें म्हणतच त्यानें नेमका तो खिडकींतून आंत फेकला. कंदिलाची काच न फुटतां अगदीं सुरक्षितपणें तो माझ्या हातीं आला. श्री. वडवींना व मला आश्चर्य वाटलें! आणि तो कंदील आमच्याबरोबर प्रवास करीत *अमरावतीस येऊन पोहोंचला.*

अमरावती येथें आम्ही सर्व डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांच्या घरीं उतरलों. येथें हा कंदील त्यांच्याच घरीं ठेऊन एकदाचें मुक्त व्हावें असें मीं ठरविलें. आमच्याबरोबर श्री. रंगराव दिवाकर व श्री. हणमंतराव कौजलगी हेहि होते. अमरावतीहून बडनेऱ्याला जाणारी गाडी लौकर सुटते. त्या गाडीनें एका मनुष्याबरोबर आम्हा सर्वांचें सामान बडनेऱ्याला पाठवावें आणि आम्ही सर्वांनीं जाहीर सभेंत भाषणें केल्यानंतर भोजन करून बडनेऱ्यापर्यंत मोटारकारनें जावें अशी व्यवस्था केली होती. जाहीर सभेला जातांना आमचें सर्वांचें सामान एका बाजूला मी लावून ठेवलें. याखेरीज आमचें दुसरें

कोणतेंहि सामान नाहीं असें घरीं सर्वांना मुद्दाम निक्षून सांगितलें होतें आणि तो कंदील दुसऱ्या कोपऱ्यांत ठेवून दिला. डॉ. पटवर्धनांच्या पत्नीनें व भगिनीनें तो कंदील आमच्याबरोबरच त्यांच्या घरीं आलेला होता हें पाहिलें होतें. आम्ही कंदील विसरून जात आहोंत असें त्यांना वाटून त्यांनीं तो कंदील न विसरतां काळजीपूर्वक, आमच्या सामानांत नेऊन ठेवला आणि बडनेराला जाणाऱ्या सामानांतून त्यानें पुनः आमची पाठ धरली. बडनेरा येथें एक अधिकचा डबा (बोगी) थ्रू गाडीला जोडला जातो. त्या डब्यामध्यें आमचें सर्व सामान लावून ठेवण्यांत आलें होतें. त्या डब्याच्या दारासमोरच्या फळीवरच हा प्रवासी मित्र बसून आमची वाट पाहात होता. अमरावतीची जाहीर सभा संपवून, भोजन करून आम्ही मोटारकारनें बडनेराला पोहोंचलों. आणि आम्ही त्या आमच्या डब्यामध्यें चढत असतांना समोरच तो प्रवासी मित्र मोठ्या डौलानें बसलेला आम्हाला दिसला. आमची चांगलीच जिरली. आम्हीहि मग त्याला मुंबईला आणलें.

मुंबईस आल्यावर आम्ही मिळून प्रवास करणारी मंडळी पांगलों; पण त्या तेजस्वी माळानें आमचा हात सोडला नाहीं. मी व श्री. वडवी ऑपेरा हौसजवळ श्री. एन्. व्ही. भावे यांच्या घरीं श्री. निळकंठराव केळकर यांच्या बिऱ्हाडीं उतरलों होतों. तेथून निघतांना श्री. किशोरलालजी मश्रूवाला यांच्या नांवें एका चिठ्ठीमध्यें या कंदिलाची सर्व हकीगत लिहून तो कंदील ठेवून घेण्यास त्यांना विनंती केली होती. श्री. किशोरलालजी त्यावेळीं टोपीवाला मॅन्शनमध्यें प्रो. धारपुरे यांच्या बिऱ्हाडाजवळ रहात असत. ती चिठ्ठी व तो कंदील श्री. निळकंठराव केळकर यांच्या स्वाधीन करून, आम्ही स्टेशनवर मेलगाडी साधण्यासाठीं निघून गेलों. थोड्या वेळानें ती चिठ्ठी व तो कंदील घेऊन श्री. निळकंठराव केळकर टोपीवाला मॅन्शनमध्यें श्री. किशोरलालजी यांच्या बिऱ्हाडाचा शोध करीत गेले. पण त्यांच्या घराला कुलूप होतें. घरची सर्वच मंडळी कोठें परगांवीं निघून गेली होती. श्री. केळकर यांनीं घड्याळाकडे पाहून, अद्यापि मेलगाडी मिळूं शकेल असें वाटून ते तडक बोरीबंदरवर आले; आणि त्यांनीं ती चिठ्ठी व तो कंदील माझ्याकडे चालत्या गाडीमध्यें सोपविला. 'मुंबईसारख्या शहरांत भर दिवसा हातांत न पेटवलेला कंदील घेऊन फिरतांना पाहून लोक मला वेड्यांत काढतील ना!' असें म्हणत आपल्या भीतीची विनोदी कडा त्यांनीं आपल्या हातावेगळी केली.

मी आणि श्री. वडवी विस्मित होऊन एकमेकांकडे पाहातच राहिलों. कंदील पाठलाग करीत पुनः आमच्याच आश्रयाला आला. मुंबईच्या गाडीनें तो पुण्याला आला. आम्ही जितका जितका त्याला दूर करण्याचा प्रयत्न करीत होतों तितका तितका तो अधिकाधिक आमच्याजवळ येत होता. जणुं त्यालाच आमचा लळा लागलेला होता! आणि आमची तायतूट त्याला सहन होत नव्हती!!

पुण्यास आम्ही दोघेहि श्री. दा. वि. तथा बापूराव गोखले यांच्या घरीं उतरलों होतों. त्यांच्या घरीं हा कंदील कसेंहि करून ठेवावयाचाच असें आम्हीं ठरविलें.

आमच्याबरोबरच हा कंदील त्यांच्या घरीं आला होता. हें अनेकांनीं त्यांच्या घरीं पाहिलेलें होतें. त्यांच्या घरून स्टेशनवर जाण्यास निघतांना मी तो कंदील तेथें एका अडगळीच्या खोलींत अगदीं कोपऱ्यांत ठेवला. आणि आम्ही स्टेशनचा रस्ता धरला. रेल्वे कंपार्टमेंटमध्यें आम्ही बसल्यानंतरहि गाडी सुटण्याच्या वेळीं नेमका तो कंदील पुनः येईल कीं काय अशी शंका व धुगधुग आम्हांला वाटत होती. पण एकदांची गाडी सुटली, फलाटाच्या बाहेर गेली. आम्ही निर्धास्त व निश्चित झालों आणि 'जितं मया' असें मनाशीं म्हणत एक सुटकेचा मोकळा निःश्वास सोडला.

पुढें १०।१२ दिवसांनंतर श्री. बाबुराव गोखले यांच्या घरांतील लोकांचें लक्ष त्या कंदिलाकडे गेलें. 'आम्ही आपला कंदील विसरून गेलों' अशी त्यांची खात्री झाली. कांहीं दिवसांनंतर श्री. बाबुराव गोखले यांचे बंधु श्रीमान् गंगाराम यांना कांहीं कामानिमित्त बेळगांवला जावयाचें होतें. त्यांनीं तो कंदील बेळगांवला आणला. 'हा घ्या तुमचा कंदील, आमच्या घरीं विसरून आलां होतांत.' असें म्हणून तो माझ्या स्वाधीन केला. मीहि निमूटपणें 'आपला हा माल आपणु धनी!' असें मानून तो स्वीकारण्याखेरीज दुसरें मी तरी काय करणार? तो कंदील आमच्याबरोबरच बेळगांवहून हुदलीस गेला. खेड्यामध्यें मागेल त्याला तो कंदील आम्ही देत राहिलो. सर्वांनीं प्रामाणिकपणानें तो परत आणून दिलेला आहे. सन १९३७ सालीं गांधी सेवा संघाचें संमेलन हुदलीस भरलें, त्यावेळीं कितीतरी लहानमोठे जिन्नस गुडार, पालपट देखील चोरीला गेले. पण हा कंदील मात्र कोणीहि चोरला नाहीं. हुदलीहून गांधीजी परत जाण्यास निघाले त्यावेळीं हजारों लोक स्टेशन प्लॅटफॉर्मवर आले होते. त्या गर्दीमध्यें तो कंदील मी फलाटावर नेऊन ठेवला. हेतु हा कीं, कोणीतरी तो उचलून न्यावा. थोड्या वेळानें तो कंदील प्लॅटफॉर्मवर दिसेनासा झाला. आम्हांला समाधान वाटलें व आमच्यावर दया करणाराचे आम्ही आभार मानले. पण दुसऱ्या दिवशी सुळधाळ स्टेशन मास्तरकडून तो कंदील व एक चिठी आली. त्या चिठीमध्यें त्या स्टेशन मास्तरांनीं लिहिलें होतें, 'काल गडबडीमध्यें प्लॅटफॉर्मवर तुम्ही तो कंदील विसरलां. कोणी तरी तो उचलून नेईल म्हणून मी तो माझ्या ऑफिसमध्यें काढून ठेवला होता. या चिठीबरोबर तो पाठविला आहे. पोहोंचल्याचें कळवावेंच." कंदील ठेवून घेतला व स्टेशन मास्तरांना त्याची पोंच पाठवून दिली. पुढें सन १९४१ पर्यंत तो कंदील आम्ही वापरत होतों आणि मागेल त्याला देत होतों. तो कंदील परत मागावयास जाण्याचा प्रसंग कधीं आला नाहीं.

सन १९४१ सालीं वैयक्तिक सत्याग्रहाचें आंदोलन सुरू झालें. आश्रमांतील आम्हां सर्वांचीं नांवें वैयक्तिक सत्याग्रही म्हणून महात्माजींनीं मंजूर केलीं होतींच. म्हणून श्री. वडवी यांच्या पत्नीला करजगीला माहेरीं पाठवून देण्यांत आलें. त्यांच्याबरोबर हा कंदील करजगीला पाठवावा व तेथेंच त्यांच्या घरी तो त्यांनीं ठेवून घ्यावा अशी योजना आम्हीं केली. तो कंदील त्यांच्याबरोबर पाठवून दिला. त्यांच्या पत्नी-

बरोबर अन्य कोणासहि सोबत म्हणून पाठवितां येण्यासारखें नव्हतें म्हणून करजगीच्या स्टेशनमास्तरांना फोन करून वडवींच्या पत्नीस त्यांनी घोड्याचा रिक्षा—त्याला तेथें 'झटका' म्हणतात—भाड्यानें ठरवून करजगीपर्यंत पाठवावें असें कळविलें होतें. श्री. वडवींची पत्नी तो कंदील गाडीमध्येंच विसरली, आणि 'झटका' करून करजगीला निघून गेली. त्याच दुसऱ्या दर्जाच्या डब्यामध्यें दुसरा पॅसेंजर चढावयास जातांच त्यानें तो कंदील पाहिला व स्टेशनमास्तरांच्या हवाली केला. त्या स्टेशनवर गाड्याचें 'क्रॉसिंग' होणार होतें. ही स्त्री कंठून आली हें सकाळच्या फोनवरून स्टेशनमास्तरांना माहीत होतेंच. परत जाणाऱ्या गाडीच्या गार्डाकडे तो कंदील देऊन, सोबत एक चिठी लिहून ती चिठी त्यांनीं सुळधाळ स्टेशन मास्तरकडे पाठविली. 'तुम्ही सकाळीं फोन करून कळविलेल्या बाईना घोड्याची गाडी पाहून दिली व करजगीस रवाना केलें. पण त्या बाई एक लहानसा कंदील गाडीमध्यें विसरून गेल्या आहेत. त्यांचा पत्ता मला माहीत नाहीं, म्हणून तो कंदील आपल्याकडे परत पाठविला आहे.' अशी चिठी सुळधाळ स्टेशन मास्तरांना लिहून ती, कंदिलाबरोबरच त्या गार्डाच्या हवालीं केली. या प्रकारें तो कंदील सुळधाळ स्टेशनमास्तरांकडून पुनः हुदलीस आमच्या पर्यंत आला. आम्ही तो कंदील मागेल त्याला देत होतोंच. एकदां कोणी तरी तो कंदील आमच्याकडून 'उद्यां परत पाठवून देतों' असें सांगून मागून घेतला, तो मात्र आजपर्यंत आमच्याकडे आलेला नाहीं. आम्हांलाहि त्या गृहस्थाचें नांव गांव स्मरत नाहीं.

ही सर्व त्या कंदिलाची हकीकत मी पू. श्री. काकामाहेबांना लिहून कळविली. त्यांनीं त्याचें हिंदी भाषांतर करवून ती कथा 'सब की बोली' या नियतकालिकामध्यें छापविली. आणि पत्रानें मला कळविलें, कीं 'कंदिलाची ही कथा रम्य आहे; पण शेवटच्या वाक्यानें कंदिलाचा तपास लावण्याची ती जाहिरातहि होऊं शकेल' आणि पुढें झालेंहि तसेंच.

'सब की बोली' मधील ही कंदिलाची कथा एका हिंदी शिकणाऱ्या विद्यार्थ्यानें वाचली. मोठ्या आश्चर्यानें ती कथा त्यानें आपल्या वडिलांना दाखवली. त्याच्या वडिलांनींच तो कंदील माझ्याकडून मागून नेला होता. पण आपण तो कोणाकडून आणलेला होता हें ते विसरून गेले होते. मग ते तो कंदील कोणास परत करणार? 'सब की बोली' मधील ही गोष्ट वाचून त्यांच्या ध्यानांत आलें कीं, पुंडलीकर्जीकडून त्यांनीं तो कंदील मागून घेतला होता. माझ्या भेटीची संधी लाभतांच त्यांनीं तो कंदील माझ्याकडे आणून दिला. तेव्हांपासून तो कंदील आमच्याकडेच आहे!

या कंदिलाची ही अद्भुत कथा जेव्हां जेव्हां मी कोणाला सांगतों किंवा आठवतों तेव्हां तेव्हां माझ्या मनांत एक विचार नेहमीं तरळतो कीं "या कंदिलाचें आणि माझें कांहीं तरी जन्मांतर सौहृद तर नसेल ना! त्यांतील दीपकळीचें व माझ्या जीवनज्योतीचें कांहीं जिव्हाळ्याचें नातें तर नाहीं ना!" अथवा जीवनांतील प्रामाणिक प्रवृत्तीचें उदाहरणच त्या अनामिकानें माझ्या दृष्टीपुढें कायमचें ठेवलें असेल.

३७.

## हुदली गांधी सेवा संघाचें संमेलन (स. १९३७)
## निमंत्रण व तयारी

सावळीच्या 'गांधी सेवा संघ' संमेलनास सन १९३६ सालीं मी, वडवी आणि दादा काळे मिळून गेलों होतों, हें मी यापूर्वीच सांगितलेलें आहे. सावळी येथील संमेलनांत अनेक महत्त्वाच्या घटना झालेल्या असल्या, कर्नाटकांतील ल्हानथोर पुढाऱ्यांमधील मतभिन्नता व विरोध यांना वाचा फुटली असल्याचें दृश्य दिसून आलें असलें, पू. जमनालालजी बजाज पितृतुल्य बापूजींच्यावर विलक्षण संतापलेले पहावयास मिळालेले असले, आणि पू. बापूजींच्या धीरोदात्त गंभीर मुद्रेचें दर्शन तेथें सर्वांना झालेलें असलें, संमेलनाच्या व विधायक कार्याच्या दृष्टीनें अनेक महत्त्वपूर्ण निर्णय त्या समेलनांत घेतलेले असले, तरी त्या सर्वांची माहिती मला येथें देतां येणार नाहीं. कारण या पुस्तिकेची मर्यादा केवळ 'हुदली व हुदली आश्रम' एवढ्यापुरतीच मी सीमित केलेली आहे. हें बंधन काटेकोरपणें पाळून करण्यासाठींच, मला वरील सर्व उद्बोधक माहिती, इतिहास व चर्चा देण्याचा मोह आवरावा लागला आहे. शिवाय त्यांतून उत्पन्न होणाऱ्या अनेक वादग्रस्त घटनाहि चर्चिण्याचें टाळण्याचा माझा हेतु त्यांत आहे.

या संमेलनांत यापुढील संमेलन कोठें भरवावें हा प्रश्न चर्चेला आला त्यावेळीं अनेक प्रांतांतून निमंत्रणें आलेलीं होतीं. मी हुदलीच्या वतीनें पुढील संमेलनासाठीं निमंत्रण दिलें; व माझ्या सूचनेला श्री. वडवी यांनीं संमति दिली. सावळी संमेलनानें, पुढील संमेलनासाठीं ज्या नवीन सूचना किंवा अटी घातलेल्या होत्या त्या थोड्याबहुत किंबहुना बऱ्याच कठोर व कठीण होत्या. संमेलन ज्या ठिकाणीं व्हावयाचें असेल त्या गांवामध्यें सबंध वर्षभर प्रत्यक्ष विधायक कार्य आंखून घेऊन केलेलें असलें पाहिजे, संमेलनाच्या आठ दिवसांत सभासद व त्या गांवांतील जनता यांच्या श्रमदानानें पूर्ण होईल असा एक किंवा अनेक विधायक कार्यक्रम योजलेले असले पाहिजेत, सर्व संमेलनांत केवळ गाईचें दूधच वापरलें पाहिजे, या व अशाच प्रकारच्या अनेक अटी

घालण्याचा निर्णय सावलीच्या संमेलनानें घेतला होता. संघाच्या कार्यवाहक समितीनें तिसऱ्या संमेलनासंबंधीं खालील सूचना आपल्या ता. २७-४-३६ च्या बैठकीमध्यें निश्चित केल्या होत्या.

## सूचना

१ स्थल : संमेलनाचें स्थान रेल्वे स्टेशनपासून पांच मैलांपेक्षां अधिक दूर नसावें. स्टेशनपासून संमेलनाच्या स्थळीं जाण्यास मोटारचा उपयोग केला जाऊं नये.

२ व्यवस्था : मंडपरचना आणि भोजनाची व्यवस्था सर्व खेड्यांतील साधनांनींच केली जावी. जरूर तर जवळपासच्या खेड्यांतून सर्व सामान प्राप्त केलें जावें; परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं, स्वास्थ्याच्या दृष्टीनें ज्या प्रकारच्या धान्य आदीची आवश्यकता असेल आणि (गहूं तांदूळ वगैरे) तेथें तें होत नसेल तर तें बाहेरून आणूंच नये.

३ दूध व तूप : भोजनव्यवस्थेमध्यें म्हशीच्या दुधाचा वापर करूं नये. गाईच्या दुधातुपाची शक्य तितकी व्यवस्था केली जावी. आणि मोटारीनें दुरून दूध मागवितां उपयोगी नाहीं. ही मर्यादा संभाळून जवळपासचें दूध मागविण्यास हरकत नाहीं.

भाजीपाला : भाजीपाल्याची व्यवस्था स्थानिक झाली पाहिजे. ज्यांना कांहीं विशिष्ट भाजीपाल्याचीच व्यवस्था पाहिजे असेल त्यानें ती स्वतःच्या जबाबदारीवर करून घेतली पाहिजे.

५ शरीरश्रम : संमेलनाच्या सभासदांच्या शरीरश्रमानें त्या खेड्यांची खास सेवा करण्याचा एक कार्यक्रम ठेवण्यांत आला पाहिजे. यासाठीं सकाळीं म्हणजे भोजनाच्या पूर्वी ३।४ तासांचा कार्यक्रम ठरविण्यांत यावा. सेवेचा कार्यक्रम ठरवितांना खालील दृष्टि राखावी.

(अ) सभासदांच्या शरीरपरिश्रमानें त्या खेड्यांतील जनतेला पुरेसा दीर्घ काळपर्यंत फायदा घेतां आला पाहिजे.

(आ) सेवेचा कार्यक्रम अशा प्रकारचा असूं नये कीं त्याला सेवा म्हणतां येईल पण ग्रामवासियांना ती अपमानकारक वाटेल अथवा त्यांच्या दैनंदिन व्यवस्थेमध्यें तो अनुचित हस्तक्षेप ठरेल.

(इ) हा कार्यक्रम असा असावा कीं लोक तो करूं वा करवूं इच्छित असतील आणि त्यामध्यें स्वतः शरीरपरिश्रमानें व साधनांनीं सहकार देण्यास ते राजी असतील.

(ई) हा कार्यक्रम इतकाच असावा कीं संमेलनाच्या आठवड्यामध्यें तो सामान्यतः पूर्ण केला जावा. जर असा कार्यक्रम आंखतां न आला अथवा आंखल्यानंतरहि संपूर्ण होऊं न शकला तर तो संमेलनानंतर पूर्ण करण्याची जबाबदारी

संमेलनास निमंत्रण देणारानें स्वतःच्या शिरावर घेण्याची तयारी ठेवली पाहिजे या बाबतीत संघाकडून ज्या प्रकारच्या मदतीची अपेक्षा असेल त्याची सूचना निमंत्रक सभासदानें संघास आगाऊ द्यावी.

(उ) अशा कार्यक्रमांत विहीर किंवा तलाव यांतील गाळ काढून तो स्वच्छ करणें, बिहारसारख्या प्रांतांत नवीन विहीर खोदणें, ग्रामपंचायत अथवा जिल्हाबोर्ड यांचा अथवा खेडुतांचा सहकार असल्यास एखादा रस्ता पक्का बनविणें, एखादी सार्वजनिक इमारत बांधविणें, वगैरे कामांचा अंतर्भाव केला जाऊं शकेल.

६ **प्रदर्शन** : संमेलनाच्याबरोबर ग्रामोद्योग वस्तूंचें एक प्रदर्शनहि भरविलें पाहिजे. खेड्यांतील लोकांना त्यापासून कांहीं शिक्षण मिळावें, हा त्यांतील हेतु असावा. त्यापासून कार्यकर्त्या सेवकांनाहि अनायासें शिक्षण मिळतें. पण तो फायदा गौण समजावा. खेड्यांतील जनतेचा व्यवसाय, कलाकौशल्य व त्यांचीं साधनें वगैरेंचें प्रदर्शन व त्यांत सुधारणा करण्याकडे आणि त्यांच्या ज्ञानवृद्धीकडे लक्ष देऊन प्रदर्शन सजविलें व मांडलें जावें. त्या खेड्यामध्ये जो व्यवसाय फायदेशीर होईल किंवा तो पुढें सुरुहि करतां येईल अशाच परप्रांतातील वस्तू प्रदर्शनासाठीं मागविल्या जाव्यात. केवळ लोकांच्या कुतूहलाची पूर्तता करण्यासाठींच परप्रांतीय वस्तू प्रयत्नपूर्वक मागवून प्रदर्शनांत ठेवूं नयेत. परंतु आपली सर्व शक्ति आपल्या प्रांतामध्येंच लावतां येण्यासारखीं लहानमोठीं सर्व साधनें व त्यापासून तयार होणाऱ्या सर्व वस्तूंची प्रक्रिया प्रदर्शनांत दाखविली जावी.

७ **मुदत व वेळ**—फेब्रुवारी १५ पासून मार्च १५ पर्यंत आपल्या अनुकूलते-प्रमाणें एक आठवड्यापर्यंत हे संमेलन होईल.

८ **इतर व्यवस्था**—(अ) संमेलन हा उपक्रम संघाचा मानला असल्यामुळें त्याच्या खर्चाची अंतिम जबाबदारी संघ आपल्यावर घेईल. आमंत्रण देणारा सभासद या जबाबदारीचा जेवढा भाग उचलील तेवढा त्याच्याकडून साभार स्वीकारण्यांत येईल. पण त्यानें ही जबाबदारी उचलावीच अशी कल्पना नाहीं. उत्तम व्यवस्था ठेवणें ही निमंत्रकाची प्रधान जबाबदारी राहील. भोजन व निवास यासाठीं येणारा खर्च निमंत्रक स्वीकारील अशी अपेक्षा सामान्यतः राखलेली आहे. पण तेवढी शक्ति नसेलच तर त्याचा खर्चहि त्यास संघाकडून मागून घेतां येईल. ग्रामसेवेसाठीं जो कार्यक्रम निश्चित करण्यांत येईल, त्यासाठीं साहित्य, साधनें व उपकरणें इ. प्राप्त करण्यास लागणाऱ्या खर्चाची जबाबदारी मात्र त्यालाच घ्यावी लागेल. सभासदांना कोणत्या कामांत कसें गुंतवावें याची योजनाहि त्यालाच करावी लागेल. कमींत कमी शंभर लोकांकडून काम घ्यावयाचें आहे अशी कल्पना करून चालावें. या कामीं संघाचें कार्यालय यथाशक्ति सहकार देईल. परंतु याची खास जबाबदारी निमंत्रकावरच आहे.

(आ) खर्चाची मर्यादा ४००० रुपयेपर्यंत राहील. यांतील २००० रुपये प्रवास वगैरेसाठींच आहेत, असें समजावें. प्रवासाच्या विलाच्या बाबतींत ३/४ प्रवासखर्च सेवक समासद, संघाचे कार्यकर्ते यांना–आवश्यक असेल त्यांनाच–संघाकडून दिला जाईल. परंतु खर्चामध्यें केवळ येण्याजाण्याच्या रेल्वेभाडयाचा व जेथें मोटार वापरणें अपरिहार्य असेल तेथें मोटारभाडयाचा अंतर्भाव केला जाईल. अन्य प्रवासखर्च म्हणजे हमाली, टांगा, फलाहार वगैरेचा खर्च संघाकडून दिला जाणार नाहीं.

या सर्व अटी मीं मान्य केल्या होत्या. पुढील संमेलनाचें निमंत्रण देणारांना या सर्व अटी पुनः एकदां ऐकविण्यांत आल्या. कांहीं प्रांतांनीं आपलें निमंत्रण परत घेऊन हुदलीच्या निमंत्रणास पाठिंबा दिला. अर्थात् आमचें निमंत्रण मंजूर झालें. हें निमंत्रण देण्यापूर्वीं मी व श्री. वडवींनीं गंगाधररावांना विचारून त्यांची संमति घेतलेली नव्हती. निमंत्रण देण्याचा विचार माझ्या मनांत सावळी समेलनांतच आला. श्री. वडवी यांनीं मला पाठिंबा देण्याचें ठरविलें होतें. 'कोणाला विचारून हें निमंत्रण दिलेंत?' असें गंगाधररावांनीं विचारल्यास काय सांगावयाचें? हा प्रश्न आमच्यापुढें होताच. "गांधी सेवा संघ"चें संमेलन भरवणें हें मोठ्या खर्चाचें काम होतें. पण एकदां अंगावर घेतलें तें शिंगावर घेण्याशिवाय, निदान सावळीमध्यें तरी, आम्ही कांहीं करूं शकणार नव्हतों. हिंमत धरून तें पार पाडणें याखेरीज आतां अन्य मार्ग नव्हता.

सावळीचें समेलन संपवून आम्ही दोघे फिरत फिरत हुदलीस येऊन पोहोंचलो. गंगाधररावांना आम्ही दोघे मिळूनच भेटलों. संमेलनाची सर्व हकीगत त्यांनीं आम्हांला विचारून घेतली. आम्ही ती साद्यंत सांगितली. सर्व माहिती झाली तशी त्यांना निवेदन केली, पण पुढील संमेलनाचें निमंत्रण आम्ही दिलें व तें मंजूर झालें ही गोष्ट सांगण्याचें धाडस माझ्या हातून होईना. शेवटीं पुढील संमेलन कोठें व्हावयाचें ठरलें? असें त्यांनींच मला विचारलें. मी झालेली हकीगत भीतभीतच त्यांना सांगितली. 'मग आतां वर्षभर राबूं या व पुढील संमेलन यशस्वी करून दाखवूं या' एवढेंच ते बोलले. गंगाधररावांकडून ही अपेक्षा आम्ही इतक्या सहजासहजीं केलेली नव्हती. ही त्यांची प्रतिक्रिया आम्हांला कळल्यानंतर आमची कळी खुलली, व 'मूकं करोति वाचालम्' अशी आमची स्थिति झाली. आम्ही निमंत्रण कसें दिलें? अटी कोणकोणत्या आहेत? आम्ही तें कसें मंजूर करून घेतलें वगैरे सर्व वृत्तान्त मी व वडवींनीं मिळून त्यांना कथन केला. समेलनाच्या तयारीला म्हणजे गावांतील व बेळगांव जिल्ह्यांतील वातावरण तयार करण्याला गंगाधररावांनीं त्या दिवसापासूनच मनःपूर्वक प्रारंभ केला. सबंध वर्षभर भेटेल त्याच्याशीं वेळीं-अवेळीं या भावी संमेलनाविषयीं कांहींतरी बोलल्याशिवाय त्यांना राहवतच नसे.

पुढें थोड्याच दिवसांत 'गांधी सेवा संघा'च्या कचेरीकडून गंगाधररावांना स्पष्ट विचारणा करण्यांत आली कीं 'पुढील संमेलनासाठीं श्री. पुंडलीकजी यांनीं हुदलीच्या

वतीनें निमंत्रण दिलें व श्री. वडवींनीं पाठिंबा दिला आणि सावळी संमेलनानें त्यांचें निमंत्रण मान्य केलें आहे. पण आपल्याला कांहीं अडचण असल्यास किंवा अन्य कोणत्याहि कारणानें सोईचें नसल्यास, तसें संघ कचेरीला कळवावें, म्हणजे पुढील संमेलन अन्य कोठें भरवावयाचें याचा आम्ही विचार करूं.' या चौकशीला किंवा विचारणेला गंगाधररावांनीं होकारार्थी उत्तर दिलें, व पत्र लिहून वर्ध्याला कळवलें कीं 'निमंत्रण दिलें गेलें हें मला आवडलें, व समेलनानें तें एकमतानें मंजूर केलें हें कळून आनंद झाला. श्री. पुंडलीकजींनीं दिलेले निमंत्रण कायम समजावें व निश्चित करावें, बदलण्याचें कारण नाहीं.' मला व श्री. वडवींना याचा आनंद झाला.

या संमेलनाची तयारी करण्यासाठीं गांवांतील वातावरण त्यांनीं कसें तयार केलें याचें चित्र माझ्या डोळ्यांसमोर एखाद्या चित्रपटाप्रमाणें आजहि उभें आहे. परंतु त्याचें शब्दचित्र हुबेहूब रेखाटण्याची कला माझ्यामध्यें नाहीं. तें चित्र रेखाटण्याचें काम महादेवभाई देसाईसारख्या निष्ठावंत लेखकानेंच करावें. तथापि त्याची सामान्य पुसट कां होईना, कल्पना वाचकांना आणून देण्याचा अल्पसा प्रयत्न मी येथें करीत आहें. वाचकांनींहि आपल्या कल्पनाशक्तीचें साह्य घेत व देत तें वाचावें.

'या पुंडलीकजी—वडवींनीं समेला हुदलीच्या वतीनें निमंत्रण देऊन ठेवलें आहे. त्यांचा हा नसता उपद्व्याप आहे!' असें आपल्याला भेटायला येणाऱ्या रयतापुढें गंगाधरराव वारंवार म्हणत असत.

'असे कां म्हणतां? त्यांनीं त्यांत वाईट काय केलें आहे? आपण सर्वजण मिळून हें संमेलन पार पाडूं या.' असे रयतांच्या तोंडून शब्द आले की गंगाधररावांना वरें वाटत असे.

"'आतां त्यांनीं आगाऊ विचारलें नाहीं! हा मात्र आपण म्हणतां तसा प्रमाद आहे खरा!' अशी एखाद्या रयतानें त्यांना थोडीशी साथ दिली तर दुसरा रयत म्हणे की 'असूं दे रे! तितकी त्यांना सत्ता वाटली म्हणूनच त्यांनीं न विचारतां आमंत्रण दिलें ना? धनी कांहीं त्यांना टाकून देणार नाहींत, या विश्वासानेंच ते वागत आहेत.'"

"हां, तूं म्हणतोस तेंहि तितकेंच खरें आहे. काम करतांना अशी एकमेकांवर सत्ता चालवावीच लागते. आम्ही धन्यावर सत्ता चालवतों, धनी आपल्यावर सत्ता चालवतात. यालाच खरें शेजारधर्माचें जगणें म्हणायचें!"

रयतांमधील असला वादसंवाद गंगाधरराव हुदलीमध्यें येतील तेव्हां व ते वेळगांवला परत जाईपर्यंत सारखा चालत असे. ही चर्चा कधीं न संपणारी असे. त्या बोलण्याचा कधीं कंटाळाहि नसे. रयतांचा हा विचार पक्का झाला आहे अशी त्यांना खात्री झाल्यानंतर एकदां गांवांतील पंच व इतर सर्व प्रमुख लोक यांना आपल्या वाड्यांत मुद्दाम बोलावून गंगाधररावांनीं त्यांना गंभीरपणें विचारलें कीं 'हे पुंडलीकजी-वडवी संमेलनाचें निमंत्रण देऊन डोक्यावर ओझें घेऊन तर आले आहेत. पण

वर्ध्याकडून पत्र आलें आहे, कीं 'ही जबाबदारी व ओझें घेण्याची तुमची इच्छा नसली तर तसें आम्हाला कळवा. आम्ही पुढील संमेलन दुसऱ्या एखाद्या प्रांतामधील खेडयांत भरवूं.' आमच्या हातून हें होणार नाहीं असें स्पष्ट कळवून त्या जबाबदारींतून मुक्त होण्याची संधी आलेली आहे...आपणा सर्वांना विचारूनच उत्तर लिहावें म्हणून मी आज आपल्या सर्वांना येथें बोलावलें आहे. आपण आपसांत विचार करून मला सांगा. मी आतां स्नान करून इतक्यांत आलोंच.' असें सांगून गंगाधरराव स्नानास गेले.

स्नान करून गंगाधरराव पुन्हा बाहेर येईपर्यंत सर्व रयतांमध्यें बाजार भरल्या-प्रमाणें अनेक गटागटांनीं चर्चा चालू झाली. उलटसुलट मतें व अभिप्राय, विश्वास व अविश्वास, श्रद्धा-अश्रद्धा, फायदेतोटे, अडचणी व त्यांचे परिहार,- या सर्वांचा ज्यांच्यात्यांच्या मगदुराप्रमाणें खल सुरू झाला. गंगाधरराव स्नान आटोपून बाहेर आले आणि गलबला एकदम शांत झाला.

गंगाधरराव आपल्या जागेवर बसले. गांवांतील एक प्रतिष्ठित रयत सर्वांतर्फे... मोठ्या हुरूपानें हातवारे करीत म्हणाला 'करा समेंलन कायम. होऊनच जाऊं द्या एकदां! नकार देऊं नका. त्यांत हुदलीगांवाचा अपमान व बेअब्रू होईल, आणि आपलीहि त्यांत इज्जत व नांव रहाणार नाहीं. सबंध गांव उभें राहिल्यानंतर काय होणार नाहीं? मात्र आपली मदत आम्हांला मनापासून पाहिजे. व्यर्थ त्या पुंडलीकजी-वडवींना जगांत खालीं मान घालावयास लावूं नका. वाटल्यास त्यांना आशीर्वाद देऊन आपण बाजूलाच रहा. पुंडलीकजी-वडवी आणि आम्ही म्हणजे सर्व गांव मिळून हें संमेलन यशस्वी करून दाखवितों, तें आपण वडिलकीनें दुरून पहा.' या निर्धाराला सर्वांनीं हौसेनें व उत्साहानें संमति दर्शविली म्हणजे त्या दिवशींचा प्रचार संपविला जाई. 'मग मी वर्ध्याला पत्र लिहून होकार देऊं! सर्वांना मंजूर?' असें विचारून पुनः एकदां अनुमति घेतली जात असे.

'निमंत्रण हुदलीचें आहे. माझें किंवा पुंडलीकजी—वडवींचें नाहीं. हें संमेलन मीच एकटा करणार असलों, त्यांत लोकांची हौस, सहकार, जबाबदारीचा वांटा आणि तनमनधनानें स्थानिक जनता भाग घेणार नसेल तर गांधीजी हे संमेलन येथें भरविणारच नाहींत.' या वस्तुस्थितीची चर्चा कांहीं दिवस चालल्यानंतर लोकांनींच गंगाधररावांना आग्रहानें सांगितलें कीं 'आमच्याकडून आपण सर्व करवून घ्या व स्थानिक सर्व लोकांनींच संमेलनाची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेतलेली आहे असें गांधीजींना निर्धास्त कळवा. आम्ही संमेलन यशस्वी करून दाखवूं.'

अखिल भारतीय ख्यातीचे बहुतेक सर्व पुढारी हुदलीस येणार असल्याचें लोकांना कळवून, त्यांची व्यवस्था कशी व कोठें करावयाची याची चर्चा व निर्णय लोकांच्या-कडूनच करविला व काय काम करावें लागेल याची परपनाहि त्यांना दिली. एवढेंच नव्हे, तर त्यांतील बारीकसारीक सर्व गोष्टी लोकांच्या संमतीनेंच ठरविल्या जै

लोकांनीं आपापल्या मालकीच्या फडया आणून, स्वतःच फडक्याच्या घाटाच्या खोल्या बांधवून दिल्या होत्या. संमेलनापूर्वी ८।१५ दिवस सर्व गांव रात्रंदिवस राबत होता. बाकीचा कोणत्याहि प्रकारचा आर्थिक बोजा गंगाधररावांनीं गांवावर पडूं दिला नाहीं. स्वयंपाक तयार करण्याची व भोजनआदीची सर्व व्यवस्था गांवांतील ब्राह्मण-वर्गानें आपल्यावर घेतलेली होती. संमेलनाच्या अधिवेशनाच्या आठवड्यांत श्रमदानानें करून घ्यावयाचीं म्हणून तीन कामें निश्चित केलीं.

तीं अशीं :—

१. गांवांतील एक मोठा खड्डा बुजवून घेणें.

२. गांवच्या फरशीपैकीं अगदीं थोडा भाग अद्यापि बांधावयाचा शिल्लक होता, तें काम पुरें करून घ्यावयाचें.

३. मारुतीच्या देवालयासमोर एक विहीर खणून घेणें. यांतील जीं कामें किंवा कामाचा भाग अपूर्ण राहील तो गांवच्या लोकांनीं स्वतःच्या श्रमदानानेंच पुरा करून घ्यावयाचा आहे.

गांवच्या लोकांनीं ही सर्व जबाबदारी जाणूनबुजून उघड्या डोळ्यांनीं आपल्या शिरावर घेतली व ती उत्तम रीतीनें पार पाडून दाखविलेली आहे. खेड्यांतील जनतेची प्रत्यक्ष सेवा करण्यामध्यें जे बौद्धिक, मानसिक व शारीरिक श्रम आम्ही कित्येक कार्यकर्ते कांहीं वर्षेपर्यंत करीत आलों होतों त्याचें चीज झालें व त्या श्रमांचा मोबदला जनतेनें उत्तम साहाय्य देऊन आम्हांला दिला याचें आम्हाला अनन्यसाधारण समाधान लाभलें.

३८.

## गांधी सेवा संघाचें संमेलन प्रतिवर्षी भिन्न भिन्न प्रांतामध्यें कां व कशासाठीं भरविलें जात होतें ?

गांधी सेवा संघानें आपलें संमेलन प्रतिवर्षी कोणत्या तरी एका प्रांतांतील एखाद्या खेड्यामध्यें भरविण्याची नीति कां अवलंबिली होती याची थोडीशी माहिती या ठिकाणीं देणें आवश्यक आहे. हीं संमेलनें एक आठवड्यापर्यंत चालत असत. यांतील पहिला फायदा हा होता कीं संघाच्या सर्व सभासदांना एकत्रित आणि तेहि महात्मा गांधींच्या सहवासांत राहून विचारविनिमय करतां येत होता. गांधी सेवा संघाच्या कार्यकारिणींतील बहुतेक सदस्य कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीचेहि सभासद असत. कॉंग्रेसची नीति घडविण्यासहि याचा दूरान्वयानें उपयोग होत असे. खास त्यासाठींच मात्र संमेलनाचा जन्म झालेला नव्हता, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. शिवाय गांधी विचारसरणीचाहि प्रचार त्यायोगें आपोआप होत असे, तसा तो व्हावा असा मात्र संघाचा हेतु होता.

गांधीवादाची स्वतःची एक विशिष्ट विचारसरणी किंवा फिलॉसफी आहे. त्यांतून उद्भवलेल्या कांहीं मूलभूत सिद्धान्तावर तो वाद अधिष्ठित आहे. म्हणूनच सामान्य व्यावहारिक राजनैतिक सिद्धान्ताहून तो वेगळाच दिसतो; कित्येक वेळां त्याचें संपूर्ण आकलन होणेंहि दुरापास्त होऊन बसतें. सामान्य राजकारणपटु, 'व्यवहार्यता व वस्तुस्थिति आणि प्रसंग' यांना प्राधान्य देऊन तदनुसार आपलें वर्तन ठेवीत असतो. राजकारणामध्यें आदर्श व सिद्धान्त यांना स्थान किंवा थाराच नसतो, असें आम्ही म्हणत नाहीं. पण एवढें अवश्य म्हणतों कीं राजनीतिज्ञ हा वास्तविकपणाचें दास्य पत्करून आपलें धोरण व कार्यक्रम यांच्यांत विसंगतता येणारेहि फेरफार करण्यास कचरत नाही, किंवा मागें पुढें पाहात नाहीं. कित्येक वेळां असेहि धोरण ठरविण्यांत त्याला दिक्कत वाटत नाहींकीं जें नैतिक दृष्ट्या गर्हणीय व चुकीचें ठरेल. त्यामुळें राजकारण हें कपटाचें आगार, कावेबाजीचा अड्डा, खोट्यानाट्या गोष्टींचें जन्मस्थान आणि नीतीस सर्वथैव सोडून असणारें होय असा भ्रम झाला आहे.

तरीसुद्धां, साधारणपणें राजनैतिक क्षेत्रामध्यें ध्येयावर दृष्टि ठेविली जात असली तरी त्याच्या प्राप्तीसाठीं ज्या साधनांचा अवलंब केला जातो तीं साधनें नीति व धर्म यांच्या कसोटीवर घासून तपासून न घेतां, व्यावहारिकपणा व वस्तुस्थिति यांस अनुरूप अशी घडविण्यामध्यें कांहीं प्रत्यवाय मानला जात नाहीं. गांधीवाद, या सामान्य राजकारणापेक्षां अगदींच भिन्न आहे. या तत्त्वज्ञानांत ध्येयाइतकाच जोर साधनांवरहि देण्यांत येतो. त्याच्या स्वरूपास धार्मिकतेचें वेष्टण आहे. गांधीवादाची अशी श्रद्धा आहे कीं साधनें देखील विशुद्ध असल्याखेरीज उच्च ध्येयाची प्राप्ति होणें शक्य नाहीं. पर्यायानें साधनें उच्च व सोज्ज्वळ असलीं कीं साध्य देखील उच्च राहणारच. म्हणूनच आपलीं साधनें नैतिक कसोटीवर पारखून नंतरच तो गांधीवादी आपलें पाऊल पुढें टाकतो. निश्चलता, त्याग, तपस्या, चित्तशुद्धि, अहिंसा इत्यादींवर गांधीवादाचा भर असतो याचें तरी रहस्य हेंच आहे. नैतिक बळ हेंच आपलें खरें बळ अशी त्याच्या धोरणाची मीमांसा आहे व असते. गांधीवाद केवळ एकाच बळावर आपली सारी भिस्त ठेवून आहे, तें बळ म्हणजे नैतिक बळ होय. गांधीवादानें जो जो म्हणून कार्यक्रम हातीं घेतला तो या नैतिकतेच्या कसोटीवर कच्चा ठरतांच तेथल्या तेथें त्याचा त्यानें त्याग केलेला आहे, त्या त्यागापायीं कितीहि हानि होत असल्यासारखी दिसली तरी तो आचरतांना त्याची तमा बाळगलेली नाहीं. आपल्या स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासांत व महात्माजींच्या जीवनांत अशा प्रकारचीं उदाहरणें किती तरी सांपडतील. याप्रमाणें नीतिमत्ता हा त्यांचा मोठा आधार असल्यामुळें विरोधी पक्षावर प्रहार करण्याची त्याची पद्धतीहि वेगळी, खास व विलक्षण आहे. प्रतिपक्षाकडून अपराध होत असल्याची खात्री पटल्याशिवाय कोणावरहि गांधीवाद प्रहार करण्यास आपला हात वर उचलणार नाहीं. परिवर्तन स्वतःमध्यें करून घेण्यास सरकारलाहि गांधीजी पूर्ण संधी देत असत. मागणी अत्यंत लहान पण प्रतिकार मात्र जबरदस्त (Minimum demand and maximum effort) असें त्यांचें धोरण असतें. अतिशय नम्रता स्वीकारून आणि क्षुल्लक मागण्या पुढें करून देखील जेव्हां असें दिसून येतें कीं सरकार निरंकुश व स्वेच्छाचारी आहे, तेव्हां मात्र ते प्रचंड आंदोलन उभें करतात, आणि देशांत वणवा पेटवितात. गांधीजी खरोखरच सरकारला शरण जातात असा त्या नम्रपणाचा अर्थ नसतो, तर प्रहार करण्यापूर्वी ते नैतिक आधार शोधत असतात व त्यासाठीं सरकार निःसंशय अपराधी आहे, याची ते अगोदर खात्री करून घेत असतात.

या सर्व सिद्धांतांचा प्रचार करावा व त्यासाठीं प्रत्येक प्रांतांत भक्कम व नैतिक पायावर उभी केलेली संस्था असावी हा, हीं संमेलनें भरविण्याचा खरा हेतु असतो.

संमेलनासाठीं झोपड्या कशा व कोठें बांधावयाच्या याविषयींचा निर्णय घेऊन स्वतांना नेमून दिलेल्या झोपड्या त्यांनीं आपापला कट्या किंवा चिपाडें स्वतः घेऊन येऊन बांधवून देण्याचें काम संमेलनाच्या पूर्वी सुमारें दहा दिवस सुरू झालेलें होतें.

एका मोठ्या आंब्याच्या झाडाखालीं गांधीजींसाठीं झोपडी बांधविण्याची योजना झाली. सर्व रयत या झोपड्या बांधीत असलेलें हें दृश्य पाहून कोणासहि आनंदाचें भरतें आल्याशिवाय राहिलें नाहीं. गांधीजींच्या झोपडीमध्यें गारवा राहावा, त्यांच्या सेक्रेटरी साहाय्यकांना तेथेंच राहातां यावें, ल्हानल्हान सभाहि तेथेंच होऊं शकतील, अशी सर्व सोयींची योजना आंखलेली होती. संमेलनांतील सभासद, पाहुणे, व निमंत्रित यांना तासभर सूतकताई करण्यास बसतां येईल एवढी विस्तृत अशीहि एक झोपडी या गांधीग्रामाच्या मध्यभागीं उभारली होती. गांधीजींना नेहमीं आवश्यक असलेल्या सुखसोयी व प्रबंध पूर्ण करून घेतलेले होते. सर्व व्यवस्था खेडेगांवच्या रहाणीस अनुरूप व अनुकूल अशीच करण्यांत आली होती. राहण्यासाठीं झोपड्या, सभेसाठीं मंडप, शौचकूपासाठीं घर, पोण्यासाठीं विहीर व रहाट, अशी तजवीज करण्यांत आली होती.

हिंदुस्थानांतील सर्व भागांतून सुमारें पाचशें प्रतिनिधी हुदलीस आले होते. त्यांत श्री. बाबू राजेंद्रप्रसाद, सरदार वल्लभभाई, जमनालाल बजाज, अबदुल गफूरखान, आचार्य कालेलकर, विनोबाजी, राजगोपालाचार्य, श्री. किशोरलाल मश्रूवाला हे या संमेलनास आलेले होते. संमेलन ता. १६-४-३७ पासून सुरू झालें. पहिले तीन दिवस (ता. १६, १७ व १८) केवळ संघाच्या कामकाजासाठीं राखून ठेवले होते. त्या तीन दिवसांमध्यें सार्वजनिक कार्यक्रम ठेवलेले नव्हते. संमेलनाला जोडून एक ग्रामोद्योग प्रदर्शनहि ठेवण्यांत आलें होतें. या प्रदर्शनाची व्यवस्था श्री. वामनराव देसाई बिद्री यांच्याकडे देण्यांत आली होती. ता. १९-४-३७ रोजीं महात्मा गांधीजींचें जाहीर भाषण ठरलें होतें. ता. २०-४-३७ रोजीं के. व्ही. अय्यर यांचे शारीरिक प्रयोग व व्याख्यान आणि दिनांक २१-४-३७ रोजीं श्री. गुरुराव देशपांडे यांचें गायन, वचनें व दासपदें यांचा कार्यक्रम राखण्यांत आला होता. त्याशिवाय अनेक पुढाऱ्यांचीं भाषणेंहि होणार होतीं. पण हा सर्व कार्यक्रम पावसामुळें होऊं शकला नाहीं.

हुदलीमध्यें आल्यानंतर आपलें सामान ठरलेल्या जागेमध्यें आल्याचें पाहून महात्माजींनीं 'गांधीग्राम' व तेथील व्यवस्था एकदां प्रत्यक्ष आपल्या नजरेखालीं घातली. त्यांना श्मश्रू करवून घ्यावयाची होती. गंगाधररावांनीं एका हजामास बोलावलें. पण तेथेंच उभा असलेल्या चि. गंगाप्पा यमकनमर्डी यानें म्हटलें 'मल्लाप्पा नावल्गी यांस मी बोलावून आणतों, तो श्मश्रू चांगली करतो, त्याच्या हातांत यश आहे, आपलीं हत्यारेंहि तो स्वच्छ व चांगलीं ठेवतो.' गांधीजींची श्मश्रू करावयास जाणाऱ्या हजामाच्या अंगावर खादीचे कपडे असावेत, असें मला वाटल्यावरून मी माझ्या अंगांतील खादीचा शर्ट काढून त्या हजामाला दिला व त्याला गांधीजींकडे पाठविलें. गांधीजी तृप्त झाले. मल्लापाचा हात त्यांनाहि अगदीं हलका असा वाटला.

सायंकाळीं गांधीजी आपल्या झोंपडींतून पांच वाजतां बाहेर येऊन फिरून यावें म्हणून आपल्या झोपडीबाहेर आले. बाहेर येतांच त्यांनीं मला विचारलें,

"या टेकडीवर कोणत्या देवाचें मंदिर आहे?"

"मला माहीत नाहीं. कोणास तरी विचारून सांगतों."

"तुम्ही येथे किती वर्षे राहून सेवाकार्य करीत आहांत!" त्यांनीं आश्चर्यानें माझ्याकडे पहात पुनः पुढचा प्रश्न केला.

"सुमारें पंधरा वर्षे मी या गांवांत सेवाकार्य करीत आहें." खालीं मान घालूनच मी उत्तर दिलें.

पण थोड्याच वेळांत मी वर पाहतों तों मला दिसून आलें कीं, गांधीजी आपले दोन्ही हात जोडून हास्यवदनानें माझ्याकडेच पहात उभे होते. लागलीच ते त्या टेकडीवर चढून गेले. तेथील देवाचें दर्शन घेतलें व तसेच ते खालीं उतरून आले. जमनालालजी, राजेंद्रबाबू, वल्लभभाई वगैरे, गांधीजी किती झपाट्यानें टेकडी चढून वर जात आहेत तें पाहातच राहिले. गांधीजींइतक्या तडफेनें व वेगानें ती टेकडी त्यांच्याबरोबर चढून जाणें त्यांना कठीण वाटलें.

३९.

## संमेलनाचें शब्दचित्र

संमेलनाकरितां म्हणून खास हुदली गावांत फरसबंदी रस्त्याचें काम, शारीरिक श्रमाचा कार्यक्रम पुरा करण्याकरितां म्हणून गेलें दर्यागर घेण्यांत आलें होतें. आज हा रस्ता संपूर्ण करण्याच्या कामी प्रत्यक्ष महात्मा गांधींचा हात लागावयाचा आणि श्रम खर्ची पडावयाचे होते. साफसफाई व आरोग्य वगैरे ग्रामोद्धाराच्या दृष्टीनें जीं कामें व्हावयाचीं तीं सर्व हुदलीच्या ग्रामस्थांनीं हातीं घेऊन पुरीं केल्याचें दिसत होतें.

ता. १६–४–३७ ला पहांटे पुणें मेलनें तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतून महात्मा गांधींची मूर्ति सुलधाळ स्टेशनवर उतरली. त्यांच्या स्वागतार्थ आसपासच्या खेड्यांतून हजारों स्त्रीपुरुष समाज जमला होता. याच गाडीनें दे. भ. राजेंद्रबाबू, जमनालाल बजाज, वल्लभभाई पटेल, सरहद्द गांधी, कॅ. पेरिनबहन, प्रेमाबाई कंटक, महादेवभाई देसाई, काकासाहेब कालेलकर वगैरे मंडळी प्रामुख्यानें आली होती. आपलें सामान उतरल्याची जातीनें खात्री करून घेऊन महात्माजी प्लॅटफार्मच्या बाहेर पडले. झपाझप पावलें टाकीत द्रुतगतीनें महात्माजी पुढें चालले आहेत आणि त्यांच्या बरोबरीनें चालण्याकरितां मागचे लोक पळत आहेत, हें दृश्य अपूर्व होतें.

हुदली गांवांतूनच मार्ग काढीत पू. बापूजी 'गांधीग्रामाच्या' प्रवेशद्वाराशीं येऊन ठेपले, याचवेळीं श्री. गोपबंधु चौधरी यांच्या हस्तें झेंडावंदनाचा कार्यक्रम चालू होता. प्रथमतः महात्माजींनीं 'गांधीग्रामाची' पाहाणी केली.

हुदली गांवच्या वेशीबाहेरच्या विस्तीर्ण रेताड पटांगणांत आमराईखालीं 'गांधी ग्रामाची' उभारणी करण्यांत आली होती. मध्यभागीं संमेलनमंडप, असून भोंवतालच्या चौरस आयारांत सदस्य निवासाकरितां ओळीनें झोपड्या बांधण्यांत आल्या होत्या. सर्वत्र ग्रामोद्योगाचें साम्राज्य होतें. झोपड्यांकरितां सर्व ठिकाणीं कड्याच वापरण्यांत आला होता. कडब्याच्या खोल्यासुद्धां इतक्या सुंदर आणि पद्धतशीर होऊं शकतात हें पाहून कोणालाहि आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नसे. महात्माजींचें

निवासस्थान विशेष रीतीनें सुशोभित करण्यांत आलें होतें. त्यांच्या खोलीसमोर ७२ फूट उंचीचा ध्वज डौलानें अंतराळांत फडकत होता. मागच्या बाजूची उंचच उंच अशी टेकडी आणि त्यावरील ते निर्वाणेश्वराचें देवालय यांच्या पार्श्वभूमीवर आमचें 'गांधी ग्राम' फारच खुलून दिसत होतें. वरच्या देवाल्याकडे जाण्याकरितां सुमारें २०० हून अधिक पायऱ्या आहेत. सायंकाळच्या विश्रामसमयीं गांधीजी या साऱ्या पायऱ्या सहज लीलेनें वर चढून जात आणि ५।१० मिनिटांनीं तितक्याच झपाट्यानें खालीं उतरून येत. गांधीजींच्या अंगचें हें चापल्य पाहून लोकांना अचंबा वाटला.

तेथील सर्व कार्यक्रम शाळेंतील वेळापत्रकाप्रमाणें आंखीव होता. वेळच्या वेळी सर्व गोष्टी झाल्याच पाहिजेत हा तर तेथला शिरस्ताच. रोज सकाळीं दोन तास रस्त्याच्या बांधकामाकरितां स्त्रियांसकट सर्व 'सेवा संघाची' मंडळी झटत असलेली पाहून खेडयांतील लोक कौतुक व आश्चर्य करीत असत. म. गांधी सुद्धां अर्धातास पर्यंत खोदकाम करीत असत.

पहिले तीन दिवस दोन प्रहरची वेळ संमेलनाच्या खास कार्याकरितां राखून ठेवलेली होती. तत्पूर्वी १२॥ ते १ पर्यंत अर्धा तास सूत्रयज्ञ चालू असे. त्या मंडपांत व्यासपीठावर म. गांधींची मूर्ति चरख्यावर सूत कातीत बसलेली आहे, सेवा संघाची सदस्य मंडळी नभोमंडळांतील तारांगणाप्रमाणें पसरली आहेत. सूतकताईच्या वेळीं संपूर्ण मौन पाळण्याचा शिरस्ता, त्यामुळें वातावरणाला गांभीर्य येई. चरख्याचा नादमधुर लय त्या सूतकताईला अतिशय गोडवा आणी जणुं प्रत्येक जण त्यांत तल्लीन होई, व हा काळ केव्हां उडून जाई, याचा पत्ताहि लागत नसे. तें नादगंभीर दृश्य पाहून पाहणाराहि मुग्ध होई, चित्रवत् अवाक् होऊन जाई.

गांधी सेवा संघाचें हें तिसरें संमेलन होतें. संमेलनाचा मूळ हेतु म्हणजे सर्व सदस्यांनीं वर्षाअखेर एकत्र जमून कार्याचा आढावा घ्यावयाचा व पुढील वर्षाचा कार्यक्रम निश्चित करावयाचा. त्याचप्रमाणें गांधीवादाच्या तात्त्विक मुद्यावर खुली चर्चा करावयाची. अध्यक्ष श्री. मश्रूवाला यांचें २७ पानी भाषण छापून तयार होतें. या भाषणांत त्यांनीं एका मागून एक असे मुद्दे उपस्थित करुन त्यांवर आपले विचार सत्य अहिंसादीच्या कसोटीनें पारखून प्रदर्शित केले होते. त्यांवर एक प्रश्नमालिका तयार केली असून त्यावर संपूर्ण सोपपत्तिक ऊहापोह होत असे. त्याचबरोबर निरनिराळ्या सदस्यांकडून उपस्थित केलेल्या प्रश्नांवरहि चर्चा होत असे. या संमेलनांत प्रामुख्यानें पुढे आलेला प्रश्न म्हणजे सदस्यांनीं धारासभांत (council) भाग घेणें संघाच्या चौकटींत बसेल कीं काय हा होता. मागच्या संमेलनानें या प्रश्नावर प्रतिकूल निकाल दिला होता. पण या वर्षी मात्र अनुकूल निकाल दिला. इतकेंच नव्हे तर ज्यांनीं या कारणास्तव राजीनामे दिले होते त्यांना पुनः संघांत घेण्याचें ठरलें. या विषयावरील चर्चेंत एकंदर २० सभासदांनीं भाग घेतला होता. ती सर्व चर्चा येथें उद्धृत करतां येण्यासारखी नाहीं. राजेंद्रबाबू, सरदार वल्लभभाई

पटेल, जमनालालजी, काकासाहेब कालेलकर, बाबू लक्ष्मी नारायण, श्री. देवशर्मा अभय, कु. प्रेमा कंटक, अप्पासाहेब पटवर्धन, गोप बाबू, अण्णासाहेब दास्ताने, स्वामी आनंद, दिवाकरजी, आचार्य भागवत, गंगाधरराव वगैरेंनीं आपापले विचार मांडल्यानंतर महात्माजींनी सर्वांना उत्तर दिलें. त्यांच्या प्रास्ताविक भाषणाचा आशय असा—

"सर्वांत प्रथम मी एका गोष्टीचा उल्लेख करूं इच्छितों. सकाळीं जेव्हां मी येथें आलों तेव्हां कोणीसें म्हटलें कीं 'फैजपूरची कॉंग्रेस जवाहरलालजींची होती, तर ही हुदली कॉंग्रेस गांधीजींची होईल.' यातील विनोद मी जाणतों पण मला दुःख झालें तें याचें कीं विनोदामध्यें तरी असे उद्गार कां निघावेत? मी व जवाहरलाल यांच्यामध्यें किंवा कॉंग्रेस व 'गांधी सेवा संघ' यांच्यामध्यें स्पर्धेची कल्पना विनोदांतहि करणें हा गुन्हा आहे. 'गांधी सेवा संघ' कॉंग्रेसचा विरोधी नाहीं. संघ हा तर कॉंग्रेसच्या सेवेसाठींच आहे. कॉंग्रेसचें रचनात्मक कार्य वाढविण्यासाठींच संघाचा जन्म आहे. मग तो कॉंग्रेसचा विरोधी कसा असूं शकेल? मी तर असेंहि म्हणेन कीं 'गांधी सेवा-संघा'ची स्पर्धा कोणाशींहि नाहीं. दुसरी एक गोष्ट अशी कीं या संघाचें नांवहि बदललें जावें. आपण सर्वांनींच संघाशीं माझें नांव जोडून दिलें आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं माझें एवढेंच कार्यक्षेत्र आहे. मनुष्याची पूजा करणें आमचें काम नव्हे. आदर्श किंवा सिद्धांताची पूजा होऊं शकेल. १९२० सालीं ज्या गोष्टी मी सांगितल्या त्या पूर्ण करण्याचें आपण मान्य केलें. त्यांपैकीं जितकें आपण आत्मसात् केलें तेवढें आपलें झालें. एखाद्याचे विचार आपण मान्य केलेत पण ते पचवूं शकलां नाहींत, प्रत्यक्षांत आणतां आले नाहींत तर तेंहि एक अपचनच आहे. विचारांचें अपचन अन्नाच्या अपचनापेक्षां अधिक वाईट असतें. अन्नाच्या अपचनाला औषध असतें पण विचाराचें अपचन आत्म्याचाच बिघाड करतें. सत्य व अहिंसेवरील माझी श्रद्धा दिवसेंदिवस वाढतच आहे. 'गांधी सेवा संघ' हें नांव बदलावें अशी माझी सूचना आहे. तत्त्व अमर आहे. गांधी अमर नाहीं. माझ्या कमीअधिक शक्तीप्रमाणें संघांत बदल होऊं नये; किंवा माझ्याबरोबरच संघाचाहि नाश होऊं नये, अशी माझी इच्छा आहे.

४०.

## स्वागताध्यक्ष श्री. गंगाधरराव यांचें भाषण

पहिल्या दिवशीं स्वागताध्यक्ष या नात्यानें श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं केलेल्या भाषणाचा सारांश खालीलप्रमाणें आहे :

गांधी सेवा संघाच्या तृतीय संमेलनासाठीं या छोट्याशा गांवांत दूरदूरच्या प्रांतांतून आपण सर्व थोर लोक आलां आहांत, याचा मला आनंद होत आहे. मी आपलें सर्वांचें स्वागत करतांना मला एका गोष्टीची जाणीव होते. आपला पाहुणचार जितका व ज्या प्रकारें व्हावयास पाहिजे तितका तो होत नाहीं. कित्येक वर्षांपासून अशा प्रकारच्या परिषदा, अशा छोट्याशा गांवांत भरविण्याचें आम्ही योजून बसलों आहोंत. मग आम्हांला तसला अनुभव कोठून येणार! मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं आमची संघटना व योजनाशक्ति अगदींच परिसीमित व तुटपुंजी आहे. मला अशी भीति वाटते कीं आपण येतांना जी कल्पना करुन आली असाल त्यापेक्षां अधिक गैरसोयी येथें आपल्यास सोसाव्या लागतील. त्याबद्दल आपण क्षमा करावी.

गांधी सेवा संघाची स्थापना कर्नाटकांत १९२५ सालीं झाली. आज या संस्थेंत दहा 'सेवक सदस्य' व तीन 'सहयोगी सदस्य' आहेत. यांच्या कार्यक्षेत्रांचा व कार्याचा परिचय मी थोडक्यांत करुन देऊं इच्छितों.

श्री. दिवाकरजी यांना कर्नाटक प्रांतांत सर्व ग्रामांत व सर्व क्षेत्रांत कांहीं भाग घ्यावाच लागतो. अखिल कर्नाटकांत ते फिरत असतात. एक कानडी दैनिक पत्रहि त्यांना चालवावें लागतें. श्री. हणमंतराव कौजलगींनीं चरखा संघाचे चिटणीस म्हणून काम केलें आहे. दिवाकरांना जें काम प्रांतभर करावें लागतें तेंच काम श्री. कौजलगींना विजापूर जिल्ह्यांत आणि श्री. सुब्रह्मण्यमूर्तींना बल्लारी जिल्ह्यांत करावें लागतें. विजापूर व बल्लारी जिल्ह्यामध्यें दुष्काळाच्या वेळीं लोकांना मदत पोहोंचविण्याचें काम यांनाच करावें लागलेलें आहे.

श्री. तिम्माप्पा नायक कारवार जिल्ह्यामध्यें हरिजन सेवेचें काम करीत आहेत. आपल्या सेवेनें व आपल्या तपस्येनें त्यांनीं त्या ठिकाणीं उत्तम वातावरण उत्पन्न केलेलें आहे. श्री. मुरलीधरजी घाटे बेळगांवाजवळच बेळगुंदी गांवांत श्री. काकासाहेब कालेलकर यांच्या 'राधालक्ष्मी हरिजन ट्रस्ट'च्या वतीनें हरिजन सेवेचेंच कार्य करीत आहेत.

श्री. पुंडलीकजी, रामचंद्र वडवी व दादा काळे हे माझे सहकारी असत 'कुमरी खादी मंदिर'मध्यें काम करतात. हुदली गांवांतील फरसबंद रस्ता तर आपण पाहिलेलाच आहे. तो पूर्ण करण्याच्या कामीं आपल्या सेवेचा फायदा आम्ही घेणार आहोंत. हा फरसबंद रस्ता गांवांतील लोकांच्या श्रमदानाचें आणि पुंडलीकजींसारख्या सेवकाच्या आग्रहाचें व चिकाटीचें फळ आहे, ही गोष्ट आपल्याला सांगतांना मला आनंद होतो.

सहयोगी सदस्य हव्ळीकेरीजी व मागडीजी यांनीं पू. बापूजींच्या सिद्धांताप्रमाणें विधायक कार्य करण्याच्या हेतूनें होसरित्ती (जि. धारवाड) येथें एका आश्रमाची स्थापना केलेली आहे.

**आमचें कार्यक्षेत्र :** ज्या पंचक्रोशीमध्यें गेली बारा वर्षें महात्माजींच्या सिद्धांतानुसार आमच्या स्वतःच्या शक्तीप्रमाणें आम्ही सेवाकार्य करीत आहोंत, त्याविषयीं मी आपल्याला थोडें निवेदन करूं इच्छितों.

या क्षेत्राला 'कुंदरनाड' म्हणतात. 'कुंदरनाड'मध्यें लहानमोठीं २५ खेडीं आहेत. या सर्व खेड्यांचा परिचय आम्हांस झालेला आहे. आज ज्या खेड्यांमध्यें आपण सर्व जमलेले आहांत, त्या गांवची जनसंख्या सुमारें बावीसशें आहे. जैन, लिंगायत, बेरड, मुसलमान, मराठा, हरिजन व ब्राह्मण वगैरे जातींचे लोक येथें राहतात. हुदलीमध्यें तीन लोहारकुटुंबें, तीन सोनारकुटुंबें, सहा सुतारकुटुंबें, कुंभार-कुटुंब एक आणि विणकरकुटुंबें पंचवीस आहेत.

१९२४ मध्यें बेळगांवांत कॉंग्रेसचें अधिवेशन महात्माजींच्या अध्यक्षतेखालीं झालें. त्यानंतर महात्माजींनीं कर्नाटकांत खादीप्रचारासाठीं दौरा काढला होता. त्यावेळीं जमलेल्या निधींतूनच थोडा निधि घेऊन एक खादी उत्पत्तिकेंद्र येथें स्थापण्यांत आलें. त्यालाच 'कुमरी खादी मंदिर' असें नांव देण्यांत आलें. १९२५ सालीं हेंच नांव कायम करून तें 'गांधी सेवा संघा'ची शाखा मानण्यांत आलें. आतां ही जमीन व त्यावर असलेला आश्रम 'गांधी सेवा संघाची मिळकत' झालेली आहे. माझी आपल्याला प्रार्थना आहे कीं या संमेलनाच्या अवधीमध्यें आपण केव्हां तरी सवड काढून तो आश्रम व ती जमीन पाहून यावें.

**आश्रमाचें कार्य :** या आश्रमांत स. १९२५ पासूनच कर्नाटकांतील सर्व भागांतून श्रद्धावान तरुण शिक्षणार्थ व संस्कारार्थ येऊं लागले होते. आजपर्यंत तीस कार्यकर्ते येथून शिक्षण व संस्कार घेऊन आपापल्या ठिकाणीं परत जाऊन सेवाकार्य

करीब आहेत. आश्रमानें दुसऱ्या वर्षीच बारा विणकर कुटुंबांना आश्रमांत ठेवून घेण्याची व्यवस्था केली, व त्यांच्या कुटुंबीयांना स्वच्छता व शिक्षण यांचे संस्कार देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. हें काम सारखें अखंडपणें सात वर्षें चालू होतें. जेव्हां देशांत स्वराज्यासाठीं सत्याग्रह आन्दोलन सुरू झालें, तेव्हां हें काम तात्पुरतें बंद केलें. सत्याग्रह चळवळीपूर्वी या आश्रमांत महिना अर्डाच हजारापर्यंत खादीउत्पत्ति होत असे. लढ्याच्या काळांत सरकारनें हा आश्रम जप्त केला होता. त्यावेळीं हिशेबाच्या वह्या वगैरे सर्व कागदपत्रहि नाहीसे झाले. अर्थात् येथें आम्हीं कांहीं खास कार्य उभें करूं शकलों नाहीं. सन १९३० मध्यें या आश्रमांतील २२ सत्याग्रहींनीं तुरुंगवास भोगलेला आहे. सन १९३२ च्या चळवळीमध्यें लहानमोठ्या सर्वच कार्यकर्त्यांना तुरुंगांत पाठविण्याचा सपाटा सरकारनें चालविला होता. त्यावेळीं आश्रमांतील कार्यकर्त्यांनीं आपलें कार्यक्षेत्र बेळगांव जिल्ह्याइतकें व्यापक करून घेतलें. त्यावेळीं या हुदली-गावांतील जनतेपैकीं २२ लोकांनीं हौसेनें सत्याग्रहांत भाग घेतला होता.

१९३२ पर्यंत आश्रमाच्या वतीनें एक हरिजन पाठशाळा चालविली जात होती. थोड्याच दिवसांत त्यात सवर्णांचीं मुलेंहि दाखल होऊं लागलीं. पुढें बेळगांव जिल्हा लोकलबोर्डानें आपल्या शाळांमधून हरिजनांच्या मुलांमुलींना निःसंकोचपणें दाखल करून घेण्याचा ठराव केला. तेव्हां आमचें काम पूर्ण सफल झाल्यामुळें, आम्ही आमची हरिजन शाळा बंद केली, आणि केवळ साक्षरता प्रसारकार्यावरच विशेष जोर देण्यास आम्हीं प्रारंभ केला. खादीप्रचारार्थ सूत कातण्यापासून खादी तयार करण्यापर्यंत सर्व प्रक्रियांचें ज्ञान करून देणारी एक पुस्तिका 'बडवर भाग्य' (गरिबांचा भाग्योदय) आश्रमानें प्रकाशित केली. त्याचप्रमाणें शीघ्र साक्षरता प्रसारासाठीं एक पुस्तिका 'कुरुड्डर कण्णु' (आंधळ्याचे डोळे) प्रकाशित करण्यांत आली. या दोन्ही पुस्तिका श्री. रामचंद्र वडवी यांनीं लिहिलेल्या आहेत. ग्रामोद्योग प्रदर्शनामध्यें आपण त्या पाहूं शकतां.

अस्पृश्यतानिवारण, अहिंसक चर्मालय, खादीकार्य, गणपत्युत्सव, राष्ट्रीय शिक्षण, शीघ्र साक्षरता प्रसार, रुग्णसेवा व औषधीवितरण, पिंजणप्रचार वगैरे अनेक लहानमोठीं कामें व प्रवृत्ती आश्रमाच्या वतीनें चालविल्या जातात. परंतु या सर्वांचा व्याप इतका वाढलेला नाहीं कीं त्याचा इतिहास तयार व्हावा व आपणाला तो मी सांगावा. म्हणून यापैकीं एक दोन गोष्टींचा उल्लेख करून मी संतोष मानतों.

गांवांतील रस्ते फरसबंद केले. हरिजनवस्तीमध्यें एक विहीर लोकांनीं आपल्या श्रमदानानें बांधवून दिली. गांवांतील उकिरडे गांवाबाहेर घालविले. गांवांतील सर्व जातींच्या व सर्व पंथांच्या लोकांनीं मिळून हौसेनें केलेलीं हीं कामें आहेत. शीघ्र साक्षरता प्रसारासाठीं, प्रौढाकरितां गांवांतील आठ गल्ल्यांमधून आठ रात्रशाळा चालविल्या जात आहेत. मजुरांना अधिकाधिक वेतन मिळावें असा आदेश पू. बापूजींनीं दिल्यानंतर त्या दिशेनें वाटचाल करण्यास आम्ही वेळ लावला नाहीं.

चरख्याला गतिचक्र बसवून त्याचा प्रचार सर्व खेड्यांमधून केला आहे. तो चरखा-प्रदर्शनामध्यें आपण पाहूं शकतां. सूत कातण्याचें केंद्र येथून जवळच असलेल्या उर्मिनहट्टीगांवांत आहे, तेथें चि. गंगाप्पा यमकनमर्डी काम करीत असतो. या आमच्या केंद्रामध्यें सुमारें ७५ स्त्रिया सूत कातवात. यांना प्रत्येकीं रोज तीन आणे वेतन मिळूं शकतें. आपल्या हातांनीं कातलेल्या सुताचेंच कापड व साड्या वापरण्याचा त्यांनीं निश्चय केला आहे. त्यासाठीं आपल्या मजुरीपैकीं कांहीं भाग आश्रमांत जमा करण्यास त्यांनीं प्रारंभहि केलेला आहे.

'कुंदरनाड'मधील भिन्न भिन्न खेड्यांमध्यें जाऊन राहण्याची व सेवा करण्याची नीति आम्ही स्वीकारतांच श्री. दादा काळे यांनीं मुळधाळ गांव आपलें क्षेत्र म्हणून निवडलें. अशाच प्रकारचें कांहीं कार्य आश्रमाशीं संबंध आलेल्या कार्यकर्त्यांकडून उर्मिनट्टी, ईरनट्टी, हुमरट्टी, अकतंगराळ वगैरे गांवीं झालें आहे व होत आहे.

**तरुण संघाची स्थापना :** गांवांतील शेतकरी व मजुरांच्या तरुणांचा संघ स्थापन करविला असून आश्रमांतील कार्यकर्ते त्या संघाच्या वतीनेंच काम करणें अधिक पसंत करतात. या तरुण संघांत आज २५ सभासद आहेत. ते सर्व आपणा सर्वांची भेट घेणारच आहेत. त्यांच्यासाठीं एक वाचनालयहि उघडण्यांत आलेलें आहे. त्यांपैकीं बहुतेक सदस्य हिंदीहि शिकूं लागले आहेत. आणि कांहीं जवळच्या प्रांताची भाषाहि अभ्यासूं लागलेले आहेत. त्यांपैकीं कांहींनीं मद्रास हिंदी प्रचारिणी सभेच्या परीक्षेत यश संपादन केलें आहे. कॉंग्रेसच्या दैनंदिन कामामध्यें आश्रमांतील कार्यकर्ते विशेष भाग घेऊं शकत नसले तरी कॉंग्रेस सभासद नोंदविणें, कॉंग्रेसच्या निवडणुकी, इत्यादि कामांमध्यें ते अवश्य भाग घेत असतात.

या सर्व विधायक कार्यांमध्यें 'विधायक कार्य' म्हणूनच आम्हांला फारसें यश लाभलेलें नाहीं, हें कबूल केलें पाहिजे. याचें पहिलें कारण हें आहे कीं, लोकांमध्यें *प्रणालीचें अज्ञान आहे. दुसरें कारण, बहुतेक सर्व कार्यकर्ते राजकारणप्रेमी आहेत, तिसरेंहि एक कारण असें सांगतां येईल कीं राजकारणापासून अलिप्त राहून, विधायक कार्याच्या द्वारां व लोकजागृति करण्यास जी विधायक कार्यनिष्ठा लागते तिचा संपूर्णतः अभाव आहे.*

**संमेलनाविषयीं :** इतक्या लहान गांवांत हें संमेलन भरविलें जात असल्या-मुळें गांवाच्या कंगाल राहणीशीं समरस होण्याची संधी आपल्याला मिळत आहे. हें संघाचें ध्येय ध्यानांत घेऊनच मी संमेलनाचें स्थान व वेळ निश्चित केलीं आहेत. आपल्या नेहमींच्या गढूळ वातावरणांतून अलिप्त होऊन, पू. बापूजींच्या सहवासांत येथें राहून, त्यांच्याशीं व इतर नेत्यांशीं विचारविनिमय करावा, आपल्या जीवनाची भावी रूपरेषा आंखून घ्यावी, व त्यामुळें येथील वातावरण उच्च करावें अशी मनीषा आहे. या कामीं आपण सर्व थोरमंडळी मला साह्य चाल असा विश्वास वाटतो. आपण कोणत्याहि सोयीगैरसोयींचा विचार ही मनांत येऊं देणार नाहीं

हें खरें; तरी सुद्धां आपल्याला भोगाव्या लागणाऱ्या गैरसोईबद्दल मी आपली प्रथमच क्षमा मागतों.

**माझी जबाबदारी :** सन १९२४ साली बेळगांव-कॉंग्रेसच्या वेळीं महात्मा गांधींच्या शिरावर 'गोसेवेचा' अधिकचा जादा भार टाकण्यांत माझाहि हात होता. तथापि मी मात्र स्वतः त्या बाबतींत कांहीं करूं शकलो नाहीं, याचें मला दुःख होतें. तसें पाहिल्यास या बाबतींत मला फार वर्षांपासून हुरहूर आहे; पण या संमेलनानें माझे डोळे चांगलेच उघडले. केवळ खेड्यांतील साधनांनीच हें संमेलन पार पाडावयाचें आहे व आपल्या सर्वांना गाईचेंच दूधतूप पुरवावयाचें आहे, हें मी जाणतों. यांतील पहिल्या अटीचें पालन झालें आहे. ती पालन करतांना आम्ही कांहीं करूं शकलों आहोंत. पण दुसऱ्या अटीविषयींची काय परिस्थिति आहे याची मला नीटशी कल्पना आलेली नव्हती. देशामध्यें गोधनाचा किती नाश झालेला आहे, हें उघड्या डोळ्यांनीं पाहिलें नव्हतें आणि त्याचा विचारहि केला नव्हता. मी असें समजून चाललों होतों कीं आजूबाजूच्या खेड्यांतून हवें तितकें गाईचें दूधतूप मिळूं शकेल आणि या संमेलनाची गरज सहज भागवतां येईल; पण अनुभव मात्र विपरीत आलेला आहे. चोहोंकडे हिंडून पाहिलें, अनेक ठिकाणीं लोकांना पाठविलें, वाटेल तेवढा पैसा खर्चण्यास तयार झालों, परंतु संमेलनाला पाहिजे असलेलें गाईचें दूध आजूबाजूच्या खेडेगांवांतूनहि मिळूं शकलें नाहीं. कृष्णा-तटाकींच्या माझ्या एका मित्रानें मुबलक दूध देणाऱ्या आपल्या गाईच इकडे संमेलनासाठीं पाठवून दिल्या आहेत. गाईचें तूप मात्र आज बरेच दिवस आम्ही गोळा करीत राहिल्यामुळें तें थोडेंबहुत मिळालेलें आहे. मला असा विश्वास वाटतो कीं संमेलनाचा हा आठवडा आपल्या सर्वांना सुखाचा ठरेल. माझी आपल्याला प्रार्थना आहे कीं आमच्याकडून शक्य ती सर्व सेवा आपण निःसंकोचपणें मनमोकळे-पणानें घ्यावी."

संमेलनांतील दुसरा महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे सायंसकाळची प्रार्थना. यावेळीं बाहेरचे बरेच लोक त्यांत भाग घेत. प्रदर्शनाकरितां शेजारींच एक विस्तृत मंडप उभारला होता. ही व्यवस्था श्री. हणमंतराव कौजलगी व श्री. वामनराव देसाई यांच्यावर सोंपविली होती. गांधीग्रामापासून दूर अंतरावर भोजनगृहाचा मंडप होता. भोजनाची व्यवस्था ग्रामोद्योगिक थाटाची होती. बिनसडीक तांदूळ, हातानें दळलेल्या पिठाच्या चपात्या असा साधाच, पण सर्व बेत अस्सल कर्नाटकी थाटाचा व गंगाधर-रावांच्या पाहुणचाराच्या लौकिकास साजेसाच होता. या कार्यावर हणमूकाका देशपांडे, गोकाकचे महाजन, ग्रामोपाध्ये वगैरे खास 'कॉंग्रेसभक्तांची' योजना झाली होती. मात्र त्यांत वामनराव भानुडे यांची उणीव भासून आली!

एकंदरीत त्या रेताडांत उभारलेलें तें 'गांधीग्राम,' त्याची रचना व योजनानैपुण्य व त्याकरितां कित्येक दिवस आगाऊ करावी लागलेली खटपट पाहून कोणासहि कौतुक

वाटल्याशिवाय राहिलें नसतें. हातीं घेतलेल्या कामांत कोठेंहि कसलाहि उणेपणा येऊं नये यासाठीं दे. भ. गंगाधरराव देशपांडे, पुंडलीकजी, अण्णुगुरुजी, वामनराव देसाई, अध्यापक, बाबासाहेब सोमण वगैरेंनीं परिश्रमांची सीमा केली होती. या मंडळींना शेवटचे आठ दिवस झोंप कसली ती माहीत नव्हती, असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. या सर्व धडपडींत विनोदप्रसंग शोधावयास तिन्हाइतास दूर जावें लागत नसे. अनेकांच्या अनेक तऱ्हा, गांधींच्या शेळीच्या दुधापासून तों तहत डॉ. भागवतांच्या पूर्णाशापर्यंत सर्व प्रकार आढळून येत असत. या सर्वांची योग्य तरतूद करण्याकरितां गंगाधररावांचे क्षणोक्षणीं सुटणारे बहुहुकूम, त्यांची अंमलबजावणी करतांना चाललेली पुंडलीकजींची धडपड, त्या वाळकामय प्रदेशांतून इथें तिथें फिरतांना उडालेली अध्यापकांची धांदल, अण्णुगुरुजींचा तितकाच थंड आणि व्यवस्थित कारभार, प्रदर्शन शिकस्तीनें यशस्वी करण्याची वामनराव देसाई यांची अहमहमिका आणि पतीलाहि काम करतांना मागें टाकण्याच्या स्पर्धेनें झटणाऱ्या सौ. पद्मावतीबाई देसाई, सर्वांचीच कार्यतत्परता अभिनंदनीय होती, यांत शंकाच नाहीं.

या उत्साहपूर्ण कारभारावर विरजण पाडण्याच्या हेतूनेंच कीं काय आकाश एका-एकीं मेघांनीं आच्छादलें. पावसाच्या सरींवर सरी कोसळूं लागल्या. पाहुणे भिजून चिंब झाले. डोक्यावर बिछाने घेऊन सर्वांनीं हुदलीगांवाकडे मोर्चा वळविला. मात्र म. गांधी रात्रभर आपल्या झोपडींत होते. दुसऱ्या दिवशीं सर्वांनीं कुमारी आश्रमाकडे तळ हलविला.

## ४१.

# पावसाची रात्र कशी गेली ?

संमेलनाच्या तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं पांचच्या सुमारास पावसाच्या सरी सुरू झाल्या. रात्रभर मुसळधार पाऊस पडत होता. सबंध गांव आगाऊच फरसबंद झाल्यामुळें इतका पाऊस झाला तरी गांवात चिखल किंवा राड झाली नाहीं. पावसाचीं चिन्हें दिसतांच, 'गांधी सेवा संघांच्या सभासदाशिवाय इतरांना परत जाण्यास सांगावयाचें व सभासदांना कुमरी आश्रमांत घेऊन जावयाचें असें गंगाधररावांनीं सर्व कार्यकर्त्यांना रात्रीं बारा वाजतांच कळविलें होतें.

मीं पहिली गोष्ट कोणती केली असेल तर गांधीजींचें सर्व सामान, कपडे, कागदपत्र, लिहिण्याचें सामान, पुस्तकें, सर्व कांहीं एका गुडारांत बांधलें, त्याच्यावर एकदोन गवताच्या चटया गुंडाळल्या, त्यावर एक लठ्ठ जाड गुडार व जमखाना लपेटला आणि त्या सर्वांवर आणखी पुरेशा चटया बांधवून तें सर्व कुमरी आश्रमांत पाठविलें. त्या पावसांतच मी स्वतः कुमरी आश्रमापर्यंत जाऊन गांधीजींचें सर्व सामान पाऊसपाण्यापासून सुरक्षित ठेवून व व्यवस्थित मांडून पुनः गांवांत आलों.

सभासदांपैकीं जेवढ्यांची सोय गांवांत करणें शक्य होतें त्यांची गांवांतील अनेक घरांतून सोय केली. पण पुष्कळसे सभासद 'गांधी ग्रामा'च्या झोपड्यांमधूनच राहिले होते. 'अगदीं जुनीं मातीचीं घरें असतील, त्यांच्या घरीं कोणासहि पाठवूं नकोस' असें गंगाधररावांनीं मला मुद्दाम सांगितलें होतें. 'या सोसाट्याच्या पावसानें कांहीं माळवदी वा जुनीं घरें पडण्याचा संभव आहे' असेंहि मला त्यांनीं बजाविलें होतें. अद्यापि पाऊस जोरांत सुरू होण्यापूर्वींच, थोडेसें दिसत असतां, दिवसाउजेडींच, सर्वांचीं भोजनें होऊन गेलीं होतीं. त्यामुळें ती रुखरुख मागें राहिली नव्हती. सर्व लोकांच्या भोजनाची भानगड उरकलेली होती. पावसानें रात्रीं ज्या लोकांचे कपडे भिजून चिंब झाले होते ते लोक अगदीं निर्भयपणें पावसांतच फिरत होते. 'मेलेल्या शेळीला आगीचें भय काय!' असे विनोद त्यांचे त्या पावसांतहि चालू होते.

कलकत्याच्या एका डॉक्टरांना झोप मुळींच आवरत नव्हती. त्यांना दिलेल्या चाळल्याखालींच त्यांनीं आपला बिछाना घातला आणि जवळचीं सर्व पांघरुणें अंगावर घेतलीं. सर्वांच्या वर एक जाड दुलई घातली. नंतर त्यावर उतरतें बाजलें टाकलें. त्यावर मिळतील तितक्या चटया आच्छादून घेतल्या. 'हें सर्व भिजेल तेव्हांच माझ्या अंगाला पाणी लागूं शकेल आणि इतकें सर्व भिजण्यास निदान तीन तास तरी असाच मुसळधार पाऊस पडला पाहिजे. तोंपर्यंत माझी एक झोंप सहज होईल.' असा विचार—दूरवरचा विचार—डॉक्टरमहोदयांनीं आपल्या मनाशीं केला होता. पण पाऊस कांहीं कमी हिकमती नव्हता, तो डॉक्टरांच्या सवाई होता. त्यानें आपल्या मदतीला तसाच सुंसाट वारा घेतला आणि झोड उठविली. डॉक्टरांच्या चटया भराभर उडून दाही दिशांना फेकल्या गेल्या. झोपड्यांवरील गवत तर केव्हांच पसार झालें होतें. पाऊस रपारप आदळूं लागला. समेलनाची जागा वालुकामय आणि टेकडीच्या पायथ्याशीं उतारावर होती. डोंगरावरील सर्व पाणी वेगानें खालीं धावूं लागलें. पाण्याचा लोंढा घो घो वाहूं लागला. आणि पाण्याचा जो लोट वरून कोसळला तो सरळ डॉक्टरसाहेबांच्या झोपडींत—पांघरुणांतच शिरला. बाजलें तरंगून उलटेंपालटें झालें. त्यांच्या सर्व योजना फोल झाल्या आणि ज्याकरितां ही सारी धडपड होती त्या आपल्या खिशांतील नोटा कोरड्या ठेवण्यापुरतीहि जागा त्याच्याजवळ राहिली नाहीं! शेवटीं त्यांनीं त्या आपल्या खिशांतच भिजूं दिल्या! 'अब हमें डर किस चीज की?' असें गात तेहि इतरांच्या बरोबरच त्या पावसांत आनंदानें रमूं लागले. अभयामधलें सुख असें आहे!!

या संमेलनास निपाणीचे रामभाऊ कागवाडेहि हजर होते. तेहि या पावसाच्या तडाख्यांत सापडले होते. राहुटीमध्यें रहाणारा एक दहा वर्षांचा मुलगा त्या राहुटींत पाणी शिरूं न देण्याची खटपट करीत होता. पाण्याच्या लोंढ्याला दुसरीकडे मार्ग काढून देण्यासाठीं तो वाळूचे बांध घालीत होता. पाण्याचा दुसरा लोंढा येवांच वाळूचा बांध बाजूला सारून तो आपला मार्ग अनिर्बंध करीत होता. पाण्याच्या लोंढ्याशीं त्या मुलाची, बांध घालून तो अडविण्याची झुंज, एक तासभर तरी चालली असावी. मी व श्री. कागवाडे ही लढाईची गंमत पहातच होतों. शेवटीं राहुटींतील आपलें सामान बाजल्यावर उचलून ठेवावें व तेवढें तरी कांहीं काळपर्यंत सुरक्षित ठेवावें असा विचार त्या मुलानें केला आणि तो रणांगणावरून आपल्या सामानाकडे वळला.

समेलनासाठीं ज्या दुकानदारांनीं मिठाई, फळें, केळीं वगैरे जो माल आणून ठेवलेला होता त्यांतील बहुतेक सर्व माल पाणी मिसळून घाण झाला, नासधूस झाला आणि कुजण्याच्या मार्गाला लागला. तो सर्व तावडतोब गोळा करून एका खड्ड्यांत घातला, त्यावर माती टाकवली आणि असला नासका माल स्वस्त भावानें विकून रोगाचा फैलाव होऊं देण्यास सवडच दिली गेली नाहीं. असल्या दूरवरच्या गोष्टी गंगाधररावांच्या लक्षांत चटकन् येत असत. ज्या व्यवस्थेकडे इतरांचें लक्ष सहजासहजीं

जाणार नाहीं त्याकडे गंगाधररावांचें लक्ष प्रथम जात असे. असलीं उदाहरणें यावेळीं मला कितीतरी आठवतात. पण कशावरून म्हणून वर्णन करून सांगूं!

गांधीजींचें सामान कुमरी आश्रमांत सुरक्षित पोहोंचलें होतें ही गोष्ट मी गांधींच्यापुढें बोललों नव्हतों. रात्रीं त्यांना जेव्हां समजलें कीं उद्या सकाळीं सर्वांनाच कुमरी आश्रमामध्यें जावयाचें आहे तेव्हां बापूजींनीं मला विचारलें, 'कुमरी आश्रमांत किती इमारती आहेत ? सुमारें चारशें लोक राहूं शकतील एवढी तेथें जागा आहे काय ?" मीं म्हटलें "तेथें एकंदर पांच इमारती आहेत. त्यांत दोन घरें लहान आहेत, दोन मध्यम आहेत, व एक चारसोपी मोठी इमारत आहे. चारहि सोपे सारख्याच लांबीरुंदीचे आहेत."

"मोठ्या इमारतींतील सोपा किती लांबीरुंदीचा आहे ?"

"सोप्याची लांबीरुंदी किती आहे तें मला सांगतां येणार नाहीं."

'तुम्ही या कुमरी आश्रमांत किती वर्षे रहातां आहांत ?'

'सुमारें बारावर्षे मी तेथें राहात आहें ।'

'नमस्कार आहे तुम्हाला ! दुसरें काय म्हणावें ?'

गांधीजींबरोबर बोलायचें म्हणजे नक्की माहीत असेल तरच बोलावें, व्यर्थ अंदाज-पंचे सांगूं नये. अशा विचारानें, 'कांहींतरी ठेवून द्यायचें' मीं टाळलें होतें. पण त्याचा परिणाम म्हणून गांधीजींकडून मला असा नमस्कार करून घ्यावा लागला होता !

इतक्यांत गंगाधरराव घोड्यावरून त्या बाजूला आले. पावसामुळें कोणाची काय अवस्था झाली आहे हें पहात, त्या मुसळधार पावसांत गंगाधरराव गांधीग्रामामध्यें रात्रभर घोड्यावरून चोहोंकडे हिंडत होते, ते गांधीजींच्या झोंपडीकडे आले. गांधीजींनीं गंगाधररावांना विचारलें, 'कुमरी आश्रमांतील चौसोपी मोठ्या घरांतील एकेक सोपा किती लांबीरुंदीचा आहे ?'

'पाऊणशें फूट लांब व तीस फूट रुंद असा एक एक सोपा आहे.' एवढें बोलून त्यांनीं घोडा फिरवला. त्याच्याबरोबर थोडें चालत जाऊन मी गंगाधररावांना विचारलें, 'अहो, हें काय सांगितलेंत ? एवढे मोठे सोपे तेथें आहेत तरी कोठें ?'

'गांधीजी काय मोजमाप घ्यायला जाणार आहेत काय ? त्यांची लांबीरुंदी मला माहीत नाहीं हें त्यांना माझ्या या उत्तरावरूनच कळलें आहे.' असें मला उत्तर देऊन गंगाधरराव तेथून निघून गेले. मी परत गांधीजींच्या झोंपडींत आलों. मी हसतच परत येत होतों. मला पाहातांच गांधीजी म्हणाले, 'दडपश्चमे, कांहींतरी हुजरजबाबी बोलून, लांबीरुंदी माहीत नसल्याचें व्यक्त करण्याचेंहि तुला त्यांच्यासारखें साधलें नाहीं.'

गांधीजी प्रत्यक्ष पावसांत उभे होते. त्यांना मुळींच झोप नव्हती. गांवांत कोणाच्या घरीं जाण्याचेंहि त्यांना मान्य नव्हतें. पू. काकासाहेब, किशोरलाल भाई, व आणखी ४।५ सदस्य रात्रीं बराच वेळपर्यंत बापूजींच्या झोपडीमध्येंच होते. इतर झोपड्यापेक्षां

ही झोपडी त्यांतल्या त्यांत अधिक निवारा देणारी होती. प्रथम वाटलें कीं या झोपडीवर पावसाच्या गमजा कांहीं विशेष चालणार नाहींत. पण मध्यरात्र उलटल्या-नंतर ती झोपडीहि त्यांना सोडावी लागली. बापूजी एकटेच त्या झोपडींत उभे होते. त्यांना कांहीं लागल्यास त्यांच्या हाताशीं कोणी जाणता स्थानिक मनुष्य असणें आवश्यक होतें. म्हणूनच मीहि एक त्या झोपडीमध्यें उभा होतों. मधूनमधून मलाहि जवळच्या एखाद्या सदस्याच्या मदतीला जावें लागत होतें. बापूजींना प्रत्येकवेळीं कळवून मी वारंवार बाहेर जा-ये करीत होतों. हा वेळ व्यर्थ जात आहे हें पाहून, त्यांनी मला कु. प्रेमाबाई कंटक यांना बोलावून आणण्यास सांगितलें. मी त्यांच्याकडे तसा निरोप पाठवला.

त्या दिवशींच्या दोनप्रहरच्या संघ सभासदांच्या चर्चेमध्यें कु. प्रेमाबाई कंटक यांनीं आपल्या भाषणांत अशा आशयाचें एक विधान केलें होतें कीं, "आज महात्माजी सत्य अहिंसेचा प्रचार करीत आहेत. या जगांत आणखी कित्येक मोठमोठ्या पुण्य पुरुषांनीं अशा सिद्धांतांचा प्रचार पूर्वी केलेला आहे. महात्माजींना त्यामध्यें जेवढें यश मिळूं शकलें तेवढें त्या पुण्यपुरुषांना मिळालेलें नाहीं. याचें कारण, महात्माजींच्या पाठीशीं राजनैतिक बल (Political strength) आहे. सामान्य जनतेला केवळ सत्य अहिंसा शब्द समजत नाहींत. 'स्वराज्य' शब्द अधिक समजतो, असा माझा अनुभव आहे. म्हणून आम्ही राजकारणापासून दूर राहूं शकत नाहीं. आजपर्यंत बापूजींनीं केलेल्या आंदोलनामध्यें जनतेनें सत्य अहिंसेचें पूर्णतया पालन कधींच केलेलें नाहीं. पण भावी आंदोलनामध्यें बापूजी तेवढ्यासाठीं मागें पाय थोडाच घेणार आहेत!" या विषयावर गांधीजींना प्रेमाबाईशीं चर्चा करावयाची होती. पण त्या तेथें आल्या किंवा नाहीं आणि आल्या असल्या तर त्यांच्याबरोबर काय चर्चा झाली हे आतां मला आठवत नाहीं.

सकाळीं लौकरच पू. बापूजींना घेऊन कुमरी आश्रमाकडे जाण्यास मी चालत निघालों. जमिनीवरून पाण्याचा प्रवाह व वरून पावसाची वृष्टि चालून होती. बापूजींच्या पायांतील वाहणांवरून पाण्यामुळें त्याचे पाय वारंवार निसरत होते. एका हातानें मी बापूजींच्यावर छत्री धरलेली होती व त्यांनींहि माझ्या खांद्यावर हात ठेवलेला होता. जणुं जीवश्च कंठश्च अशा थाटांत आम्ही दोघे कुमरी आश्रमाकडे चालत निघालों होतों. आमच्या बाजूनें, पण थोडें पुढें, एक अमेरिकन बातमीदार आपला कॅमेरा घेऊन दौडत होता. पावसानें थोडी उसंत दिली कीं लागलीच तो बातमीदार कॅमेऱ्यानें फोटो घेत असे. 'कोणत्याहि परिस्थितींत त्यांचें काम अव्याहत चालू आहे.' असें बापूजी कौतुकानें म्हणाले. कुमरी आश्रम गांवापासून दोनच मैल दूर असला तरी पावसाच्या संतत धारेखालीं पाण्यांतूनच वाटचाल करावी लागल्यानें बापूजी थकून गेले होते. शिवाय रात्रभर त्यांना झोंपहि मिळालेली नव्हती. वाऱ्याच्या विरुद्ध दिशेनें चढा मार्ग! त्यांनीं विचारलें, 'आश्रम अद्यापि किती दूर आहे?' इतके

ते चालून दमले होते. वास्तविक आश्रम फर्लांग दीड फर्लांगहि तेथून दूर नव्हता. पण गंभीरपणाचा आव आणून मीं म्हटलें, 'आपण आतांपर्यंत जितकें अंतर चालून आलों तितकेंच अंतर अद्यापि आपल्याला कापावयाचें आहे!' ते माझ्याकडे नुसते पाहातच उभे राहिले. मी जमिनीवर डोळे लावून स्वस्थ त्यांच्याजवळच उभा राहिलों. पुनः आम्ही पुढें चालूं लागलों. थोडें पुढें चालून जातांच, आश्रम आला. 'आश्रमांत गेल्याबरोबर मला कढत कढत ऊन पाणी आंघोळीला मिळेल तर रात्रभर पावसांत उभे राहिल्याचा शीण मला जरा देखील भासणार नाहीं. तशी कांहीं व्यवस्था आश्रमांत होईल का?' बापूजींनीं मला विचारलें.

मी सांगायला सुरवात केली. "एप्रिलमध्यें या भागांत पाऊस कधींच पडत नसतो. पंधरा दिवसांपूर्वीच आम्ही सर्वजण संमेलनाच्या तयारीसाठीं गांवांत राहण्यास गेलों. समेलनाचें अधिवेशन संपेपर्यंत पुनः आश्रमांत यावें लागेल ही कल्पनाच कोणाला नव्हती. पावसामुळें इकडे येण्याचें काल पहांटेसच आकस्मिकपणें ठरलें. आम्ही आश्रमाला कुलूपें लावूनच गांवांत राहण्यास गेलों होतों. त्या कुलुपांच्या किल्ल्या या सर्व गोंधळामध्यें कोठें सांडल्या आहेत. त्या हुडकून आणण्यास मनुष्य पाठविला आहे."

"लघुशंकेला जावयाचें झाल्यास येथें कोठें सोय किंवा न्हाणीघर आहे का? कि न्हाणीघरालाहि कुलूप आहे?"

"न्हाणीघर येथेंच आहे व उघडेंहि आहे." असें म्हणत मी तें उघडून दिलें व दूर निघून गेलों!

तेथें न्हाणीघरांत जातांच बापूजींनीं काय पाहिलें?

आंत पाण्याचा बंब पेटला आहे. घंगाळांत कढत पाणी काढून ठेवलेलें आहे. बाजूला एका टेबलावर त्यांचेच कपडे, त्यांचीच साबणपेटी, त्यांचाच टॉवेल वगैरे त्यांना लागणारे सर्व जिन्नस जिथल्या तिथें मांडलेले आहेत. हे सर्व पाहतांच बापूजींनी मला जवळ बोलावून घेतलें व मोठ्या प्रेमानें माझ्या डोक्यावर एक चांगली चापटी मारून ते मला म्हणाले, 'कुलुपांच्या किल्ल्या सांपडल्या कीं नाहीं? त्याच्या चौकशीचें काय झालें?'

स्नान वगैरे आटोपून महात्माजी बाहेर आले तों त्यांना हेंहि दिसून आलें कीं आपल्या आश्रमांत आपली बैठक व सर्व सामान जसें ठेवलेलें असे, अगदीं तसेंच येथें सर्व कांहीं यथास्थान लावून ठेवलेलें आहे. त्यांना आनंद झाला. पुढें तीन दिवस संमेलनाचे सदस्य कुमरी आश्रमांत राहिले होते. त्यांच्यासाठीं स्वयंपाक दोन मैल दूर गांवामध्यें रांधला जात होता, व रोज कुमरी आश्रमांत तो तिथून वाहून आणला जात असे. स्वयंपाक तयार करणारे व त्यांचे मदतगार स्वयंसेवक, ते तीन दिवस फारच राबले यांत शंका नाहीं. ही गोष्ट संमेलन संपल्यानंतर जेव्हां महात्माजींना समजली, त्यावेळीं त्यांना आश्चर्य वाटलें. गंगाधररावांच्या मनुष्यबळाचें त्यांना साक्षात् दर्शन

झालें. त्यावेळीं 'कार्यकर्त्या माणसाला कोणतीहि गोष्ट अशक्य, दुर्लभ व कठीण नाहीं' याचा सर्वांना प्रत्यय आला, आणि कार्यकर्त्यांनाहि त्या वेळीं तोच अनुभव आला.

तिसऱ्या दिवशीं 'कुमरी खादी मंदिर' नांवाच्या आश्रमाच्या भागांत संमेलनाचें अधिवेशन सुरू झालें. प्रारंभीं अध्यक्ष किशोरलालजी यांनीं सांगितलें कीं "आजची सभा घटनेप्रमाणें कायदेशीर ठरत नाहीं. कारण कित्येक सदस्य व मंत्री देखील येथें आज उपस्थित राहूं शकलेले नाहींत. हा त्यांचा दोष नव्हे. भयंकर पाऊस पडला. सर्व व्यवस्थाच ढांसळली. एकदम एका चुटकीसरशी हें सर्व काम सांवरून घेतां येण्यासारखें नाहीं. पुनः जी कांहीं थोडीशी व्यवस्था झाली असें जें आपल्याला दिसतें आहे किंवा प्रत्यक्ष अनुभवतां आहांत, तें सर्व गंगाधररावजी आणि पुंडलीकजी व त्यांचे इतर सहकारी कार्यकर्ते यांच्या कार्यकुशलतेचें व आपलेपणाच्या जिव्हाळ्यानें काम करण्याच्या प्रवृत्तीचें द्योतक आहे. त्यांनीं जोडलेलें हें सामाजिक कार्याचें प्रेम कौतुकास्पद आहे." पुढें ही बैठक कार्यकारिणीची समजून यामध्यें घेतलेले निर्णय पुनः सर्वांच्यापुढें ठेवून सर्वसंमत करून घ्यावे लागलेले आहेत.

हुदलीच्या या 'गांधी सेवा संघाच्या' संमेलनामध्यें चार मंगल कार्यें झालीं. दोन उपनयनें व दोन विवाह. श्री. महादेवभाई देसाई यांचे एक छोटे बंधु आणि त्यांचेच चिरंजीव (नारायण) यांचीं उपनयनें आणि महात्माजींची नात सौ. कां. मनुबहन गांधी आणि महादेवभाईंची भगिनी सौ. कां. निर्मला बहन यांचे विवाह अशीं हीं चार मंगलकार्यें होत. या सर्वांना म्हणजे दोन बटु व दोन वधूवर यांना पू. गांधीजी यांनीं आशीर्वाद दिले. हीं मंगलकार्यें चालविण्यासाठीं वांईचे तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांना महात्माजींच्या आज्ञेवरून श्री. गंगाधरराव देशपांडे यांनी मुद्दाम बोलावून घेतलें होतें.

'गांधी सेवा संघा'च्या नेतृत्वाखालीं जे दोन लग्नसोहाळे झाले, त्यासंबंधानें दिनांक २४ एप्रिल १९३७च्या 'हरिजन'मध्यें श्री. महादेवभाई देसाई यांनीं एक चार स्तंभी लेख लिहिला आहे. तो सर्व जसाचा तसा येथें देण्याची जरुरी नाहीं. परंतु त्याचा आशय व विशेषतः गांधीजींनीं या निमित्तानें प्रगट केलेले विचार मनन करण्यासारखे असल्यामुळें त्याचा सारांश येथें दिला आहे.

या लग्नसमारंभाचा विशेष हा कीं तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं सर्व विवाहमंत्रांचा अर्थ हिंदींतून उभय वधूवरांना विशद करून सांगितला. कोणाचाहि मित्रपरिवार किंवा नातेवाईक यांना या विवाहसमारंभास आमंत्रणें दिलीं नव्हतीं. त्यांच्या आशीर्वादापेक्षां वधूवरांना सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या सदिच्छाच अधिक मोलाच्या वाटत होत्या. आणि केवळ धार्मिक विधीव्यतिरिक्त इतर कसल्याहि प्रकारच्या समारंभाचें स्वरूप या लग्नकार्यामध्यें नव्हतें.

## ४२.

# गांधीजींचा वधूवरांना उपदेश

गांधीजींच्या नेहमीच्या संवयीप्रमाणें त्यांनीं या प्रसंगीं सार्वजनिक-रीत्या वधूवरांना उपदेश न करतां, अगदीं खासगी रीतीनें केला; तो असा :

कर्तव्याची जाणीव जागृत करण्यासारखे समारंभ असतील तरच असल्या समारंभांना मी मानीत असतों, हें तुम्हांला माहीत आहे. संस्कृत मंत्रांना एक विशेष सामर्थ्य आहे असें माझें मत आहे. तुम्ही संस्कृतमधून उच्चारलेल्या मंत्रांतील प्रतिज्ञांचा अर्थ तुम्हाला भाषांतर करून सांगण्यांत आलाच आहे. पत्नी ही सुवृत्त व निरोगी पुत्राची माता होईल अशी इच्छा त्या मंत्रद्वारें पति व्यक्त करतो. यांत बिचकण्यासारखें किंवा धक्का बसण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु जेव्हां वंशसातत्य राखण्याची आवश्यकता भासेल तेव्हां ती धर्मविधियुक्त विवाहसंस्थेनेंच व्हावी एवढाच त्याचा अर्थ आहे. ज्याला पुत्रसंतान नकोच असेल त्यांनीं लग्न करून घेण्याची जरुरी नाहीं. केवळ इंद्रियांची भूक भागवणें याला लग्न न म्हणतां व्यभिचार म्हणावें. म्हणून लग्नाचा हा मंगल विधि प्रार्थनायुक्त असला पाहिजे. त्याला प्रेमयाचना करण्याची आवश्यकता नाहीं. वंशार्थ पुत्रप्राप्ति ही आयुष्यांत एकदांच इच्छिली जाते. नीतिदृष्ट्या जे दुर्बल आहेत आणि जे शरिरानें निरोगी नाहीत, त्यांनीं लग्नाच्या भानगडींत पडूं नये. लग्नाचा हा पवित्र विधि पावनगावकाच्या साक्षीनेच होत असतो. तुमच्या पाशवी वासनांची तोच पुण्यकर अग्नि राखरांगोळी करो.

'इंद्रियदमन आणि संयम हीं गैर आहेत; स्वैरप्रेम आणि वासनातृप्ति हा नैसर्गिक क्रमच आहे' अशी वेडी समजूत आजकाळ पसरत आहे. पण या समजुतीसारखी अन्य अनर्थकारक कल्पना दुसरी नाहीं. तुमचे प्रयत्न विफल झाले किंवा तुम्हीं दुबळे असलां तरी या अधार्मिक भावनेला तुम्ही धर्म मानूं नका. आणि आपले उच्च आदर्श अधम ठरवूं नका. विकारांचें सद्वर्तनांत रूपांतर करणें आणि वासना आवरणें हाच विवाहाचा खरा अर्थ आहे, हें विसरूं नका.

मित्र आणि समशील या नात्यानेंच विवाहाचें निमित्त करून तुम्ही दंपती स्वरूपांत एकरूप झालों आहांत, यासाठींच पतीला 'स्वामी' म्हटलें तर पत्नीला 'स्वामिनी' म्हटलें जातें. जीवनांतील कर्तव्यें आणि धर्म आचरण्याचे कामीं एक दुसऱ्याचा अधिपति आहे, तसा सहकारीहि आहे. मुलांनो, तुम्हाला जी सद्बुद्धि आणि उन्नत भावना लाभल्या असतील त्या तुम्ही या मुलींना समजून सांगा, व संस्कृत करा. त्यांना योग्य मार्गदर्शन करा आणि साह्य द्या. तुमचा आचार, विचार आणि उच्चार यांत संगती असूं द्या. एकमेक कसलाहि खंडावाचा अवलंब न करतां आत्मीयतेनें एकरूप होऊन राहा.

आरोग्याचा नाश म्हणजे खरें इंद्रियदमन नव्हे. संयम करणारे रोज नवी शक्ति संपादतात आणि अधिकाधिक मनःशांति मिळवतात. आपल्या मर्यादा ओळखूनच सपण वागावें. असाध्य गोष्टीच्या सिद्धीसाठीं व्यर्थ धडपड करून आरोग्य दावळूं देऊं नका. आपल्यापुढें मी योग्य असाच दृष्टिकोन ठेवलेला आहे. तेव्हां, श्रेयप्राप्तीसाठीं होईल तितका प्रयत्न करा. त्यांत यश आलें नाहीं तरी दुःख करण्याचें कारण नाहीं. मौजीबंधन हा दुसरा जन्म मानला जातो. त्याप्रमाणें विवाह सुद्धां एक नवा जन्मच आहे मी जें हें तुम्हाला सांगितलें त्यामुळें खचून जाऊं नका, किंवा भीतीनें गांगरूं नका. नेहमीं आपल्या आचरणांत कायावाचामनाचें संगीत घुमत राहील याची दक्षता घ्या.

सारें जीवन एक मधु आहे, हा मधुपर्कविधीचा संदेश दृष्टिआड करूं नका. 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' हें निरंतर दृष्टीपुढें राहूं द्या. परित्यागांतील उपभोग तो हाच होय. आपला विचार उघड करण्यांत लाज असेल तर तो विचार मनांत येऊं देणेंहि अधिक लज्जास्पद आहे, हें ध्यानांत ठेवा. आणि स्वतःच्याबरोबरच जगत्कल्याणासाठींहि सत्याला धरूनच आपलें आचरण ठेवा."

४३.

## श्रमदानानें पूर्ण करावयाच्या कामाचें काय झालें?

संमेलनाच्या पहिल्या दोन दिवसांचा कार्यक्रम उत्तम व वेळेनुसार पार पडला होता. सभासदांच्या व इतरांच्या श्रमदानानें व्हावयाच्या कामाचें मार्गदर्शन श्री. बसाप्पा यमकनमर्डी व श्री. बसवंताप्पा यमकनमर्डी हे दोघे करीत होते. तिन्हीहि कामांना पहिल्या दिवशींच सुरुवात करण्यांत आली. कांहीं लोकांना 'खड्डा भरुन काढण्याच्या कामाला' जोडण्यांत आलें. कांहीं लोक फरशी बांधविण्याच्या कामाला लागले आणि कांहीं थोडे विहीर खणण्याच्या कामीं श्रमदान करूं लागले.

(१) विहीरखोदाई:—विहीर खोदण्यास पू. गांधीजींनीं पहिली कुदळ मारतांच त्यांच्या जवळच उभे असलेले श्री. काकासाहेब कालेलकर चि. गंगाप्पा यमकनमर्डी यांना म्हणाले, 'आता ही विहीर झालीच म्हणून समजा.' गांधीजींनीं सरासरी एक फूटभर खोदणें उकरलें असावें. त्या जागेजवळच श्री. गंगाप्पा यमकनमर्डी याच्या मालकीचें एक भले मोठें चिंचेचें झाड तोडून काढण्यास प्रारंभ केल्याचें महात्माजींनीं पाहिलें. झाडाचीं पानें विहिरींत पडून पाणी खराब होईल व झाडाचीं मुळें बांधकामांत शिरून तें ढासळेल. तर तसें कांहीं होऊं नये हा तें झाड तोडण्यांतील हेतु होता. पण महात्माजींनीं तें काम बंद करवीत हंसत हंसत म्हटलें, 'जरा थांबा ना! विहीर सर्व खोदून होऊं द्या. विहिरीला चांगलें पाणी लागूं द्या! ती विहीर खालपासून वरपर्यंत दगडांनीं बांधवून काढा! आणि इतकें झाल्यावर मग त्यांत पानें पडून पाणी खराब होण्याचा प्रसंग उत्पन्न होईल, त्या वेळीं तें झाड तोडण्याचा विचार करतां येईल! तोंवर तरी ही विहीर खोदणाऱ्या श्रमिकांना या महावृक्षाच्या छायेखालीं आपले श्रम हलके करून विसावा घेऊं द्याल कीं नाहीं?" असे कांहींसे विनोदाचे पण व्यावहारिक विचार त्यांनीं सांगितले व झाड तोडण्याचें रहित करविलें. तीन दिवसांत ४।५ फूट विहिरीची जागा उकरून झाली. संमेलनानंतरहि जें काम अपुरें राहील तें स्थानिक जनतेनें पूर्ण करायचें असा

संमेलनाचा शिरस्ता आहे. त्याप्रमाणें संमेलन झाल्यानंतरहि विहीरखुदाईचें काम आम्ही सुरू ठेवलेंच होतें. प्रत्यक्ष विहिरीसाठीं जी जागा निश्चित झाली होती, तेवढी संपूर्ण जागा मरून एकच एक अखंड काळा पत्थरच तेथें लागला. हा पत्थर फारच मोठा असावा व आतां तेथें पाणी लागण्याचा संभव फारच कमी आहे असें गांवांतील सर्वांचेंच मत पडलें होतें. तो दगड सुरुंग लावून फोडण्याचा प्रयत्नहि करून पाहिला. त्यामुळें आजूबाजूच्या घरांना व आमच्या मोठ्या इमारतीलाहि सुरुंगाचे हादरे बसूं लागले. तो दगड किती खोलवर गेला आहे याचाहि अंदाज बांधतां येईना. म्हणून मी बापूजींना लिहून कळविलें कीं "या ठिकाणीं विहीर खोदण्याचा आग्रह आतां सोडून देणें भाग आहे. संमेलनाच्या वेळचीं अपूर्ण राहिलेलीं कामें स्थानिक जनतेनें पुरीं केलीं पाहिजेत या विचाराप्रमाणेंच आम्हाला वागावयाचें आहे. पण हें विहिरीचें काम तळाशीं दगड लागल्यानें अशक्य होऊन बसलें आहे. तेव्हां आतां काय करावें?" या माझ्या पत्राला साबरमतीहून बापूजींचें उत्तर आलें कीं, 'तो पत्थर फोडून पहावा, तेथें पाणी लागणारच नाहीं असें नाहीं. खोदत खोदत खालीं अमेरिकेपर्यंत जावें लागलें तरी हरकत नाहीं. इतकी चिकाटी व दीर्घोद्योग आपण दाखविलाच पाहिजे.' आम्हीं विहीर खोदण्याचें काम पुन्हा हातीं घेतलें. सुमारें दहा फूट तो दगड खोलवर पसरलेला होता. तेवढा थर फोडून काढतांच त्या दगडाच्या खालीं ओली व दमटमाती लागूं लागली. सतरा फुटांवर भरपूर पाणी लागलें. प्रथम तें पाणी थोडें खारट भासत होतें. पुढें वापरानें तें गोडें झालेलें आहे. ती विहीर बमाप्पा यमकनमर्डी यानें उत्तम बांधून दिली आहे. विहीरीमध्यें कांहीं पडल्यास किंवा विहिरींतील गाळ काढण्यास उतरतां यावें म्हणून बांधकामामध्येंच खालपासून वरपर्यंत लोखंडी आकडे लावलेले आहेत. या विहिरीस लागणारें सर्व लोखंड व गडगडा लोखंडाचे व्यापारी श्री. विठ्ठलराव गावडे, बेळगांव यांनीं पुरविलेला आहे. विहिरीभोंवतीं राड होऊं नये म्हणून बारीक टाकीच्या घडीव दगडांचा चबुतरा व कट्टा बांधलेला आहे. इतकें काम झाल्यानंतर त्याला लागून असलेलें चिंचेचें झाड महात्माजींच्याच परवानगीनें तोडण्यांत आलें. झाडाचें लाकूड झाडमालकाला देण्यांत आलें. ही सर्व हकीगत मी महात्माजींना नंतर पत्र लिहून कळविली होती.

या विहिराला कोणतें नांव द्यावें याचा निर्णय अद्यापि झालेला नाहीं. सोपें, अन्वर्थक, छोटें व खेड्यांतील लोकांना सहज समजेल अशा नांवाच्या शोधांत आम्ही होतोंच. महात्माजींनीं खुदाईसाठीं पहिली कुदळ मारलेली ही विहीर, आणि त्यांच्याच प्रेरणेनें पत्थरांतहि पाणी देणारी ही विहीर, आणि 'तुका म्हणे पाणी दगडभेदी पातळपणीं' असल्या प्रयत्नाच्या यशाचा साक्षात्कार घडविणारी ही विहीर. हुदली गांवांत येणारा प्रत्येक पाहुणा पाहून गेल्याशिवाय राहात नाहीं. कै. बाळासाहेब खेर हुदलीस आल्यावेळीं त्यांनीं या विहिरीचें दर्शन घेतलें आणि भक्तिभावानें जलप्राशन

केलें. विहिरीच्या नांवासाठीं बसविलेला चोरा फरकरीत दगड पाहून त्यांनीं त्याची चौकशी केली. सर्व हकीगत कळल्यावर ते म्हणाले 'या विहिरीचें नांव मी सुचवितों. इतक्यांत नांव कोरण्याची घाई करूं नका.' आम्ही वारंवार त्यांना या गोष्टीचें स्मरण देत होतों. पण 'माझा अद्यापि निश्चय झालेला नाहीं' असेंच उत्तर प्रत्येक वेळीं मला मिळत होतें. मुंबईत समक्ष भेटून मी त्यांना याबाबत पुनः विचारलें पण त्याच शब्दांत तेंच उत्तर मला मिळालें. बाळासाहेब खेर दिवंगत झाले, तरी विहिरीचें नामकरण झालें नाहीं.

**(२) फरशी बांधवून पुरी करण्याचें काम :** संघाच्या सभासदांनीं तीन दिवसांच्या श्रमदानानें फरशीचें बांधकाम बरेंच बांधवून संपविलें होतें. कारण सभासदांना आठ दिवसांत संपवितां येईल इतकेंच फरशीचें काम आम्ही संमेलनासाठीं शिल्लक ठेवलें होतें. पण तेथपर्यंत फरशी बांधवून आणतांना दोन उल्लेखनीय व महत्त्वाच्या गोष्टींना येथें स्थान देणें भाग आहे. त्या रस्त्याच्या बाजूला तीस फूट खोलीची व सुमारें पाव फर्लांग लांबीची भिंत खालपासून दगडांनीं बांधवीत आणल्यावांचून तेथील फरशी टिकणेंच शक्य नव्हतें. ती जागा राधाबाई हुद्दार या बाईच्या मालकीची होती. तिनें त्या जागेंत सार्वजनिक कामासाठीं भिंत बांधविण्यास आनंदानें परवानगी दिली आहे. त्याला लागून असलेली जागा गांवांतील ज्याच्या हाताला जेवढी लागली तेवढी जागा आपल्या घरच्या गायरी व उकिरडे यांसाठीं वापरण्यास लोकांनीं सुरुवात केली; व राधाबाईचा नातू श्री. प्रभाकर देशपांडे यांची आर्थिक स्थिति पुढें खालावल्यामुळें ती आपल्या मालकीची जागा त्यांना व त्यांच्या चिरंजीवांना सोडवून घेतां आलेली नाहीं. ज्या ठिकाणच्या फरशीचें मी वर्णन करीत आहें तो रस्त्याचा भाग इतका कठीण व उतारावर होता कीं, शेतांतील खळ्यांतील माल वाहून घरीं आणण्यास तेवढ्या रस्त्यापुरते गाडीला आठ आठ बैल जोडावे लागत असत. हा रस्ता नीट सरळ करण्यासाठीं भर वगैरे टाकतांना गंगाधरराव स्वतः त्या जागीं हजर राहिले होते. एका वेवारशी घरांत एक परीट राहात असे. तें घर आडवें आलें. त्या परिटाला दुसरें कोठेंतरी रहाण्यास घर देववूं असें जाहीर करून श्री. गंगाधररावांनीं तें घर पाडण्यास सांगितलें व अर्ध्या तासाचे आंत तीं घराची जागा साफ होऊन रस्त्यांत सामील झाली. समेलनाच्या वेळींहि असाच एक प्रश्न उभा झाला होता. त्या रस्त्यावर एका रयताच्या घराचा कांहीं भाग रस्त्यामध्यें येत होता. पण आपल्या घराचा तेवढा भाग रस्त्यांत सामील करण्यात तो रयत तयार नव्हता. तेवढ्या त्या भागाची किंमत देण्यासहि गंगाधरराव तयार झाले व तसें त्याला त्यांनीं सांगूनहि पाहिलें. परंतु कांहींहि उपयोग झाला नाहीं. महात्माजींची तशी इच्छा आहे असें सांगूनहि कांहीं जमलें नाहीं. गंगाधररावांनीं व गांवांतील इतर वडील माणसांनीं त्याची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला पण कोणासहि यश आलें नाहीं. शेवटीं महात्माजींनीं सांगितलें कीं 'जाऊं द्या. त्याला आतां आग्रह करूं नका.

जेवढा रस्ता आज परशी घालून घेतां येईल तेवढा बांधून घ्या.' हा बापूजींचा निर्णय ऐकण्यास तो घरमालक तेथें उभाच होता. तो एकदम म्हणाला "घ्या ! माझी लागेल तेवढी जागा घ्या ! रस्त्यांत सामील करा व बांधणीचें काम चालू ठेवा ! तो रस्ता माझ्याच घरासमोर आहे ना ? रस्त्यांत सामील झाली तरी जागा कांहीं दुसरीकडे कोठें जात नाहीं, ती आहे तिथेंच राहणारी आहे. तर घ्या या कामासाठीं लागणारी जागा !" तो स्वतःच आपल्या हातीं कुदळ घेऊन त्या कामाला उत्साहानें उभा राहिला. त्याच्या या अंतस्फूर्तीचें लोकांना कौतुक वाटलें. आनंद झाला. आणि एकदां तोडून वचन गेलेलें असल्यामुळें गंगाधररावांनीं त्या घराची भिंत मागें हटवून ती पुनः उभी करण्यास लागणारा खर्च, मालकानें जागा खुषीनें दिली होती तरी, मदत म्हणून दिलेला आहे. विहिरीजवळूनच तो रस्ता जात असल्यामुळें विहिरीचें खोदकाम व पुढें बांधकाम होईपर्यंत, तेवढेंच सुमारें २५।३० फूट रस्त्याचें काम त्यावेळीं करतां आलें नव्हतें. तें पुढें कांहीं कालानंतर करवून घेण्यांत आलें. गांवरस्ता फरसबंद करण्यामध्यें जनतेनें जो निर्धार व चिकाटी व्यक्त केली, जनतेकडून हें काम करवून घेतांना कार्यकर्त्यांनीं जनमानसावर जे शुभ संस्कार केलेले आहेत त्याबद्दल गांधीजींना आनंद झाला; व तसे त्यांनीं त्यावेळीं उद्गारहि काढले होते; पण सर्व रस्ते अशा रीतीनें फरसबंद करणें महात्माजींना पसंत नव्हतें. त्यांच्या दृष्टीनें सर्वच रस्ते या प्रकारें फरसबंद करून ठेवणें म्हणजे पुढील निदान ५०।६० वर्षे तरी अशा रीतीची ग्रामसेवा करण्याचा मार्गच बंद करून ठेवण्यासारखें आहे. तेव्हां आपल्या गांवांतील रस्त्याची दुरुस्ती प्रतिवर्षी करीत राहाण्याची संधी प्रत्येक ग्रामवासीयाला मिळत राहिली पाहिजे. म्हणून यापुढें गांवांतील एखादा रस्ता फरसबंद करण्याचें राहिलें असेल तर तो खडी घालून बनवा व प्रतिवर्षी तो दुरुस्त करीत राहण्याची लोकांना संवय लागेल असें करा.

(३) **गांवांतील वडा खड्डा बुजवून घेणें** :—हें तिसरें काम संमेलनाच्या पहिल्या तीन दिवसांच्या श्रमदानानें थोडेंसें झालेलें होतें. सरहद्द गांधी खान अबदुल गफूरखान तथा 'बादशाह' यांच्या शुभहस्तें हा खड्डा भरून काढण्याला प्रारंभ झाला होता. हे खड्डे भरविण्याच्या कामीं लोकांवर जबरदस्ती तर होत नाहीं ना ? या शंकेला अध्यक्ष किशोरलालजी यांनीं उत्तर दिलें व संमेलनाच्या सभेंत वस्तुस्थितीचें निवेदन केलें. याविषयीं संमेलनाच्या सभेंत स्पष्टीकरण करतांना श्री. पुंडलीकजी म्हणाले कीं 'आपण करीत असलेल्या कामामुळें लोक नाखूष झालेले नाहींत, तर अत्यंत आनंदी झालेले आहेत. आपण करीत असलेल्या कामाचा लोकांवर चांगला परिणाम होत आहे; लोकांना वाटतें कीं, या कामाचा भार आपणांवर न टाकतां तें आपण स्वतःच केलें असतें तर अधिक बरें झालें असतें. हा मोठा खड्डा भरण्यासाठीं मातीकरितां, दुसरीकडे आणखी एक खड्डा करण्यापेक्षां त्या जागेवरच विहीर खोदविल्यास त्यांत काय वाईट होईल ? गांवांतील मुसलमान, लिंगायत इत्यादि जातींच्या लोकांची सभा आतांच

गांवांत मरली असून त्या सभेमध्यें याचाच विचार चालू आहे. आपण कोणीहि असा गैरसमज करून घेऊं नये कीं आपल्या कामावर लोक असंतुष्ट आहेत.' हें काम कोणीहि करावें असें आहे. खड्डा भरावयाला कोणा तज्ञाची आवश्यकता नाहीं. शेकडों लोक या कामाला हातभार लावूं शकतात. तीन दिवसांच्या सर्वांच्या श्रमदानानें या खड्ड्यांतील एका कोपऱ्याचा कांहीं भाग भरून काढण्यांत आला होता. हा खड्डा बुजवण्याचें काम सहजासहजीं होण्यासारखें नव्हतें. या कामासाठीं गांवांत उठाव करण्याचा मी भगीरथ प्रयत्न केला. पण मला त्यांत यश आलें नाही. खानदेशांतील एका दानशूर मारवाडी बंधूला आपल्या मातुःश्रीच्या स्मरणार्थ एक प्रसूतिगृह बांधावयाचें होतें. त्यांचा व माझा परिचय आणि घरोबा होता. 'आमच्या खेड्यामध्यें तें प्रसूतिगृह बांधवा, अशी मी त्यांना प्रार्थना केली. ते या कामासाठीं आठ हजार रुपये खर्च करावयास तयार होते. बांधकामासाठीं सहा हजार व जागेसाठीं दोन हजार रुपये खर्चावयाचे त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चित केलें होतें. त्यांनीं माझ्या विनंतीला मान दिला पण एक अट त्यांनीं घातली व ती योग्य अशीच होती. तें प्रसूतिगृह नंतर चालविण्याची जबाबदारी स्थानिक जनतेनें किंवा एखाद्या स्थानिक संस्थेनें अगर सरकारनें घेतली पाहिजे. या संधीचा फायदा घेऊन मीं एक योजना आखली आणि तसा प्रयत्नहि केला.

"त्या खड्ड्याच्या जागेमध्यें १०।१२ मालक होते. त्यांच्याकडून जमल्यास मोफत, नाहींतर विकत, ती जागा घ्यावी व गांवच्या श्रमदानानें तो खड्डा भरून काढावा. कांहीं भाग बांधकामामध्यें तळघर करून तेवढी जागा व्यापावी, इमारत बांधविण्यास कांहीं अधिक रक्कम लागल्यास तेवढी ती त्याच मारवाडी व्यापाऱ्याकडून मिळवावी आणि गावची ग्रामपंचायत किंवा जिल्हा लोकलबोर्ड अगर अन्य एखाद्या संस्थेकडून हें प्रसूतिगृह चालवावें, आणि याच इमारतीमध्यें एक विस्तृत सोपा व त्या पुढील मोकळी जागा 'मंगल कार्यालय' म्हणून भाड्यानें देतां येईल अशी व्यवस्था ठेवून त्यांतूनहि उत्पन्न काढावें, येईल तें उत्पन्न त्या प्रसूतिगृहासाठींच वापरावें, अशी माझी योजना होती. गांवांतील प्रमुख लोकांना, पंचांना आणि संबंधित लोकांना ती योजना मीं समजावून सांगितली. त्यावेळीं माझ्यासमोर सर्वांनीं ती मान्यहि केली. पण गांवच्या पंचांनीं त्याची कधींहि पुनः चौकशी केली नाहीं. जागेच्या मालकांनींहि त्या जागेचा आपापला भाग मोफत देण्याचें तर राहोच, पण रास्त किंमत घेऊनहि नव्हे तर अधिक किंमत देत असतांहि ती जागा मला विकत देण्याचें मान्य केलें नाहीं. या खटपटींत एक वर्ष हां हां म्हणतां निघून गेलें. मारवाडी व्यापाऱ्याचीं मला सारखीं पत्रें येतच होतीं. पण मी कांहीं करूं शकत नाहीं, हें पाहून त्यांनीं अन्यत्र आपल्या मातुःश्रीच्या स्मरणार्थ आपल्या योजनेप्रमाणें एक प्रसूतिगृह बांधून दिलें. त्याची खबर मला कळविण्यांत आली.

पुढें बऱ्याच वर्षांनंतर गांवच्या लोकांच्या व पंचांच्या मनांत आलें कीं, त्या

खड्डयाच्या जागेंत एक विहीर खोदवावी. पानाड्याकडून तेथें विहीराला पाणी लागेल अशी खात्री करून घेतली व विहीर खोदण्यास प्रारंभ केला. विहिरींतील खोदकामानें जी माती व खडक निघत असे त्यानें खड्डा भरून निघाला. विहिरीला चांगलें पाणीहि लागलें. ती विहीर खालपासून वरपर्यंत दगडांनीं चांगली बांधवूनहि काढण्यांत आली. अशा रीतीनें संमेलनाचें हें तिसरें कामहि कांहीं वर्षानंतर का होईना, पण पूर्ण झालें. आणि अशा रीतीनें या बाबतींतील संमेलनाची अटहि पूर्ण करण्यांत आली.

**(४) आणखी कांहीं गोष्टी :** गांधी सेवा संघाच्या हुदली येथील अधिवेशनाचा इतिहास आणखी कांहीं गोष्टींचा उल्लेख केल्यावांचून पूर्ण होणार नाहीं.

या कामीं गंगाधररावांना बराच खर्च करावा लागला आहे. सर्वांना गाईचें दूध पुरवावें लागलें आहे. हें काम बेळगांवांतील श्री. गिरी यांनीं आपल्या अंगावर घेतलें होतें. त्यांनीं तें चांगल्या रीतीनें पार पाडलेलें आहे. पावसानें सर्वांचेच कपडे ओले झालेले असल्यामुळें त्यांचे कपडे वाळेपर्यंत मागेल त्याला खादीचें एकेक धोतर देण्यास गंगाधररावांनीं चि. गंगाप्पा यमकनमर्डी यास एक वट्ट हुकूमच देऊन ठेवला होता. कारण तोच त्यावेळीं हुदलीमध्यें खादीचें काम पहात असे. आश्रमाच्या खादी भांडारांत खादीचीं धोतरेंहि मुबलक होतीं. 'कोणाचेंहि नांवगांव न विचारतां मागतील त्यांना एकेक धोतर द्यावें व 'आपलें काम होतांच धोतर याच खादीभांडारांत परत करावें' एवढें प्रत्येकास सांगावें, धोतर मागणारा संघाचा सभासद आहे किंवा नाहीं याचीहि विचारपूस केली जाऊं नये—असेंहि गंगाधररावांनीं सदर यमकनमर्डी यास बजावून सांगितलेलें होतें. संघाबाहेरच्याहि कित्येकांनीं असें धोतर त्यावेळीं मागून नेलें होतें. बहुतेक सर्व धोतरें परत आलीं. तीं पुनः भट्टीला देऊन भांडारामध्यें विक्रीला ठेवलीं गेलीं. या खादीभांडाराचा यावेळीं संमेलनाला अमोल व अमाप उपयोग झाला आहे. पण गंगाधररावांची ही दक्षता त्यावेळीं लाख मोलाची होती, हें नमूद करणें या इतिहास लेखकाचें कर्तव्यच आहे.

ग्रामोद्योग प्रदर्शनाविषयींहि दोन शब्द लिहिणें आवश्यक आहे. या प्रदर्शनामध्यें ठेवण्यासाठीं कारवारांतील कांहीं जिन्नस निवडण्याचें व ते घेऊन येण्याचें काम गंगाधररावांचे एक परमस्नेही शंकरराव गुळवाडी यांच्याकडे सोंपविलेलें होतें. अन्य ठिकाणचा माल आणविण्याचें काम श्री. हणमंतराव कौजलगी आणि प्रदर्शनासाठीं आलेल्या मालाची पोंच व नोंद ठेवणें, प्रदर्शन व्यवस्थित लावणें व प्रत्येक जिन्नसाची माहिती प्रेक्षकांस देण्यासाठीं तज्ञ स्वयंसेवकास नियुक्त करणें इत्यादि कामें श्री. वामनराव देसाई विद्री हे करीत असत. ग्रामोद्योग प्रदर्शनामध्यें कांहीं पुढाऱ्यांचीं व्याख्यानेंहि ठेवण्यांत आलेलीं होतीं.

श्री. शंकरराव गुळवाडी, गंगाधररावांशीं चर्चा करून प्रदर्शनासाठीं कारवार जिल्ह्यांतील माल निवडण्यासाठीं व घेऊन येण्यासाठीं हुदलीहून निघाले ते कुळघाळ स्टेशनवर पोंचले. पण त्या आधींच गाडी निघून गेली होती. त्याच वेळीं आपल्या

उद्दिष्ट स्थळाच्या विरुद्ध दिशेला म्हणजे पुण्याकडे जाणारी एक गाडी स्टेशनवर उभी होती. श्री. गुळवाडी त्या गाडींत बसले म्हणून ते कारवारला न जातां पुण्याला पोहोचले, व तेथून मुंबईस गेले. मुंबईहून त्यांचें पत्र गंगाधररावांना आलें, 'माझी कारवारची गाडी चुकली. पण दुसऱ्या बाजूला जाणारी गाडी मिळाली. मी येथें आलों आहें. कारवारला पत्रें वगैरे लिहिलीं आहेत. माल हुदलींत वेळेवर येईल. मी हुदलीस संमेलनाच्या आदल्या दिवशीं येईन.' हे पत्र वाचून गंगाधररावांना खदखदून हसूं आलें. श्री. हणमंतराव कौजलगी यांना दाखविण्यासाटीं तें पत्र गंगाधररावांनीं श्री. वामनराव देसाई यांच्या हातीं दिलें. पत्राप्रमाणें कारवारहून वेळेवर माल आला. तो नीट लावूनहि झाला. श्री. शंकररावहि संमेलनास वेळेवर येऊन पोहोंचले. 'ग्रामोद्योग प्रदर्शनाचें औपचारिक उद्घाटन ता. १९-४-३७ रोजीं व्हावयाचें होतें. पण त्यापूर्वीच पावसानें कहर केल्यामुळें त्या प्रदर्शनावर पाणी पडल्यासारखें झालें. प्रदर्शनासाटीं आणलेला माल या पावसानें खराब होऊन गेला. आणि त्या मालाच्या किंमतीचा भूर्दंड गंगाधररावांना भरावा लागलेला आहे. कमवी हुन्नराबद्दल देण्यासाटीं, प्रमाणपत्रें छापवून आणलेलीं होतीं तीं मात्र मुक्त हस्तें वाटण्यात आलीं. पावसानें ग्रामोद्योगाचें कितीहि नुकसान केले असलें तरी पावसाची थोडी उघडीक मिळतांच, श्री. वामनराव बिद्री व त्यांचे सहकारी यांनीं पावसांतून बचावलेले जिन्नस व इतर माल पुनः सजवून मांडला आणि महात्माजी निघून गेल्यानंतरहि पुढें तीन दिवस हें 'ग्रामोद्योग प्रदर्शन' उघडें ठेवलें होतें. तें प्रदर्शन पाहून, त्यापासून ज्ञान संपादन करून घेण्यास महात्माजींनीं आपल्या समेलनातील निरोपाच्या शेवटच्या जाहीर भाषणांत आवर्जून शिफारस केली होती. त्यामुळें कडों लोकांनीं तें पाहून समाधान व्यक्त केलेलें आहे. श्री. वामनरावांची या कामांतील कार्यतत्परता वाखाणण्यासारखीच होती हें निःसंशय.

या अधिवेशनामध्यें कामें करणाऱ्या स्वयंसेवकाचे प्रमुख म्हणून श्री. बाळकृष्ण यमाजी देशपांडे तथा अण्णु गुरुजी काम करीत होते. आपल्या स्वयंसेवकाशीं व अधिवेशनाच्या कामाशीं अण्णुगुरुजी इतके समरस झालेले होते की, स्वयसेवक दलाचे ते प्रमुख आहेत ही गोष्ट कोणाच्या ध्यानांतहि येण्यासारखी नव्हती. त्यामुळें त्यांचे आदेश आनंदानें व हांसेनें कायान्वित केले जात असत. मोठेपणाची हाव व अधिकाराचें भान अण्णुगुरुजींमध्यें औषधालाहि त्यावेळीं कार्यतन्मयतेमुळें, मिळूं शकण्यासारखें नव्हतें.

## ४४.

## संमेलनानंतर झालेलें महात्माजींचें जाहीर भाषण

संमेलनाचें अधिवेशन संपल्यानंतर 'गांधीग्राम'मध्येंच हुदली गांवाला लागून मोकळ्या रानामध्यें सायंकाळीं साडेपांच वाजतां महात्माजींचें सर्व जनतेसाठीं जाहीर व्याख्यान ठेवलेलें होतें. कुमरी आश्रमांतून हुदली गांवापर्यंत दोन मैल महात्माजी चालत आले. त्यांच्या समवेत संघाचे कित्येक सभासद व गंगाधरराव चालत येत होते. अंकलगीचे एक निष्ठावंत कार्यकर्ते श्री. श्रीशैलाप्पा काकती गांवाकडून आश्रमाकडे चालले होते. त्यांना दुरून पाहूनच पू. बापूजींनीं मला सांगितलें, "हे समोरून येत असलेले गृहस्थ माझ्या पायावर डोकें ठेवून मला नमस्कार करण्याचा संभव आहे. तेव्हां त्यांना अगाऊच भेटून तसें न करण्याबद्दल सांगून ये." त्यावर मी एवढेंच उत्तर दिलें, 'ते माझ्या परिचयाचे आहेत, या भागांतील ते एक प्रमुख काँग्रेस कार्यकर्त्यांपैकीं आहेत व त्यांना आपलीं मतें चांगलीं अवगत आहेत. पायावर डोकें ठेवून नमस्कार केलेलें आपल्याला ठीक वाटत नाहीं, ही गोष्ट त्यांना माहीत आहे. तेव्हां ते तसें करणार नाहींत. तसें त्यांना अगाऊ सांगण्याची आवश्यकता नाहीं."

महात्माजींच्या जवळ येतांच किंवा चालत चालत महात्माजी त्यांच्याजवळ येतांच वाटल्यास म्हणा, श्री. श्रीशैलाप्पा काकती झटकन एकदम पुढें झाले व त्यांनीं महात्माजींच्या पायावर डोकें ठेवून नमस्कार केला आणि रस्त्यांतून ते बाजूला झाले. त्यांना आवरण्यापूर्वीच हा सर्व प्रकार होऊनहि गेला. इतका विद्युत्वेग त्या कृतींत होता. महात्माजी माझ्याकडे बघतच उभे राहिले. मी तरी काय करणार ! माझ्या डोक्यांत त्यांना आवरण्याचा विचार येण्यापूर्वीच ते महात्माजींच्या पायावर डोकें ठेवून रस्त्याच्या बाजूलाहि झाले होते. मी त्यांच्याकडे बघतच राहिलों होतों. स्फूर्तीच्या त्या झटक्यांत त्यांच्याकडून नमस्कार घडूनहि गेला होता. आपण काय केलें याचें भान त्यांनासुद्धां त्यानंतरच आलें. अत्यंत आश्चर्यकारक होती त्यांची ती भावतिडीक ! मग सर्वच मंडळी पुढें सभास्थानाकडे चालूं लागली. सभेमध्यें कोणालाहि उठूं न देण्याचें

व लोकांना व्यवस्थित बसवून शांतता राखण्याचें काम दत्तोपंत अध्यापक, अण्णुगुरुजी, वामनराव देसाई व हणमंतराव कौजलगी यांनीं सांभाळलें होतें. महात्माजी व त्यांच्याबरोबर असणारे अन्य पुढारी व महादेवभाई देसाई या सर्वांना व्यवस्थित बसतां येईल असा एक उंच मंच बांधण्यांत आला होता. त्यावर चढून जाण्यास पायऱ्याहि केल्या होत्या. या प्रचंड जाहीर सभेचा वृत्तांत त्यावेळीं बेळगांवच्या 'तरुण भारत' साप्ताहिकाच्या ता. २३-४-३७ च्या खास अंकांत आलेला आहे. तोच मी या ठिकाणीं साद्यन्त उद्धृत करीत आहे.

"ता. २१-४-३७ रोजीं हुदली गांवाला एका मोठ्या जत्रेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. त्या दिवशीं संध्याकाळीं ५॥ वाजतां महात्माजींचें व्याख्यान होणार असल्याचें आगाऊच जाहीर झालें होतें. त्याकरितां दोन वाजल्यापासूनच हुदली गांवांत लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या होत्या. दोन मोटरच्या गाड्यांनें, त्याचप्रमाणें स्पेशल ट्रेननें बेळगांवहून तीनचार हजार लोक हुदलीला गेले होते. 'गांधीग्राम' समोरील शेतवाडी माणसांनीं फुलून गेली होती. एकंदर जनसमुदाय पंचवीस हजारांवर होता.

प्रारंभीं श्री. दे. म. गंगाधरराव यांनीं प्रास्ताविक भाषण करून हुदली गांवांत चाललेल्या ग्रामोद्धार कार्याची माहिती करून दिली. नंतर महात्मा गांधींनीं आपल्या भाषणास सुरवात केली. त्यांच्या भाषणाचें वाक्यशः रूपांतर कानडींत करून गंगाधरराव देशपांडे सांगत होते.

## महात्माजींचें भाषण

गांधीसेवासंघाच्या या संमेलनप्रसंगीं जो कार्यक्रम आंखण्यांत आला होता तो पुरा होऊं शकला नाहीं, याबद्दल खेद वाटतो. हुदली गांवांत चालू असलेला फरसबंद रस्ता पूर्ण करणें, गांवांतील एक घाणीचा खड्डा भरून काढणें, अवर्ण-सवर्ण सर्व जातींच्या लोकांकरितां एक विहीर खोदणें, हीं कामें येथें जमलेल्या मंडळींनीं मिळून पुरीं करावयाचीं, असें ठरलें होतें. त्याकरितां स्त्रीपुरुष सर्व येथें उत्साहानें जमले होते. हुदली गांवांतील तगडे जवान देखील या कामांत साह्य करीत होते, हें मी पाहिलें आहे. परंतु ईश्वराची योजना दुसरीच होती. ईश्वर मानवी यत्नांना निष्फळ करतो असें समजतात, तरी आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं शुभकार्य कधींच निष्फळ होत नाहीं. म्हणून माझी अशी उमेद आहे कीं, ज्या स्त्रीपुरुषांनी या सत्कार्यांत भाग घेतला आहे तें हीं कार्यें निष्फल होतील असें समजणार नाहींत. त्याचप्रमाणें मला आशा आहे कीं, ज्या कार्याला आरंभ होऊन जीं कामें अपूर्ण राहिलीं आहेत तीं हुदलीचे लोक पूर्ण करतील. आणि तेहि अगदीं शीघ्रतेनें. मी पाहिलें आहे कीं जी गाईर भरून काढावयाची होती त्यांत हुदली गांवचे लोक सर्व गलिच्छ जिन्नस टाकीत असत. कार्यकर्त्या समाजसेवकांनीं समजावून दिलें कीं अशा प्रकारें घाण टाकणें हें आरोग्यदृष्ट्या हानिकारक आहे. थोड्या प्रयत्नानें मालकांची समजूत पटली आणि त्यांनीं घाण काढून

टाकली. याबाबत स्वयंसेवकांनीं जें कार्य केलें त्याबद्दल त्यांना मी धन्यवाद देतों. मालकांनाहि माझे धन्यवाद आहेत. मी आशा करतों कीं, या तऱ्हेनें हुदलीचे ग्रामवासी जगाला पटवून देतील कीं, आपण स्वार्थाकरितां जगत नाहीं तर लोककल्याणाकरितां आपला जन्म आहे. आपण सर्वांनीं जाणलें पाहिजे कीं, काँग्रेसचें जें कांहीं कार्य आहे तें सर्व जनतेची सेवा करणें, हेंच आहे.

निवडणुकी होतात त्यावेळीं आपण मतें देऊन प्रतिनिधी पाठवितों. तीन कोटी मतदारांना जो हक्क प्राप्त झाला आहे तो ते दोन, तीन, अगर पांच वर्षांनीं उपयोगांत आणतात. पार्लमेंटमध्यें जे निवडून जातात त्यांचा तेथें जाऊन सेवा करणें हा धर्म आहे. त्याचप्रमाणें काँग्रेसलाच मत देणें हा मतदारांचा धर्म आहे. पण जर ते समजतील कीं मतें देऊनच आपण कृतार्थ झालों तर तें खोटें आहे. मत देऊन स्वातंत्र्य मिळालें हें समजणें व्यर्थ आहे. खऱ्या स्वातंत्र्याकरितां जें विधायक कार्य आहे तें करीतच राहिलें पाहिजे. सर्व लोकांनीं मग ते हिंदु, मुसल्मान, पार्शी, इसायी, अवर्ण सवर्ण, कोणत्याहि जातीचे वा पंथाचे असोत, रचनात्मक कार्यानें जनसेवा करणें हा त्यांपैकीं प्रत्येकाचा धर्म आहे. म्हणून बसाप्पा व बसवंताप्पा यमकन्मर्डी, कंजार लच्चाप्पा, पत्तार गोविंदाप्पा, यामाप्पा वडिगेर व त्यांच्यासारखे दुसरेहि, ज्यांनीं ज्यांनीं सेवा केली आहे त्या सर्वांना मी धन्यवाद देतों.

एवढ्यानेंहि माझें समाधान होत नाही. हुदलीच्या प्रत्येक ग्रामवासीयानें बसाप्पा बनलें पाहिजे. हुदलीचे सर्व लोक जेव्हां असे बनतील तेव्हांच हुदली गांव आदर्श खेडें बनलें असें होईल. गांवांतील सर्व रस्ते साफसूफ पाहिजेत. पायखाने स्वच्छ असले पाहिजेत. स्त्री आणि पुरुष यांच्याकरितां ज्या जागा राखून ठेवलेल्या असतात तेथेंच त्यांनीं मलमूत्र विसर्जन केलें पाहिजे. हुदलीस आदर्श बनवावयाचें असेल तर स्वास्थ्याकरतां गाईच्या दुधाचा भरपूर पुरवठा झाला पाहिजे. आज तरी आम्ही इतके कंगाल झालों आहोंत कीं गाईचें दूध मुळींच मिळत नाहीं. ज्यावेळीं काँग्रेसचा अध्यक्ष म्हणून मी बेळगांवला आलों होतों, तेव्हांपासून गोसेवाधर्माचा संकल्प मी सोडला होता. त्यावेळीं पंडिताप्पा चिकोडी आदींनीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, बेळगांव जिल्ह्यांत गोप्रचार व गोसेवा आपण करूं. पण त्या प्रतिज्ञापालनाचें एकहि चिन्ह मला दिसत नाहीं. ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. तसेंच हुदली गांवाला आदर्श व्हावयाचें असेल तर गांवांतील प्रत्येक मुलगा, स्त्री, पुरुष, बुड्ढा या सर्वांनीं खादीशिवाय दुसरा कपडा घालतां कामा नये. गिरणीच्या कापडाचा धागाहि अंगावर दिसतां नये. आपणांस हें सर्व समजलें पाहिजे. आपण मनावर घ्याल तर पाहिजे तेवढी खादी निर्माण करतां येईल. हुदलीची जनसंख्या दोन हजार आहे. जर प्रत्येकाला कापडाचा खर्च दरवर्षी तीन रुपये येतो असें धरलें तर सहा हजार रुपयांची बचत होईल. या प्रकारें रचनात्मक कार्यांत अस्पृश्यतानिवारण, मद्यपान बंदी यांचाहि समावेश होतो.

या संमेलनाला जोडून एक प्रदर्शन उघडण्यांत आलें आहे. त्याची फी अवघी दोन पैसे आहे. तें तीन दिवस उघडें राहील. मला उमेद आहे कीं, हजारों लोक तें पाहतील, तेथें जाऊन आपण प्रत्यक्ष पाहूं शकाल कीं कोणकोणत्या गोष्टी खेड्यांत होऊं शकतात. कॉंग्रेसची प्रतिज्ञा पाळण्याची जर आपली मनीषा आहे तर आपण रचनात्मक कार्याला हातभार लावला पाहिजे. त्याकरितां प्रदर्शनांतील गोष्टींचें ज्ञान करून घ्या. यापेक्षां आपला अधिक वेळ घेणें अयोग्य आहे. स्त्रिया उठून जाऊं लागल्या आहेत, पुरुष व्याकूळ झालेले दिसत आहेत. माझे चार शब्द सर्वांच्या कानीं पोहोंचले आहेत, अशी आशा आहे. मला उमेद आहे कीं, या तीन दिवसांत प्रदर्शन पाहाण्याकरिता हजारो लोक जातील व ज्ञानसंपादन केल्याचें श्रेय घेतील."

महात्माजींचें हें भाषण होतांच जाहीर सभा विसर्जित झाली. स्टेशनकडे जाण्यास महात्माजी पायींच निघाले. त्यांच्या बरोबरच हजारों लोक स्टेशनच्या रस्त्यानें चालत होते. वाटेंत ओढ्यांतील वाळू महात्माजींच्या पायाला लागूं नये म्हणून लोकांनीं ओढ्यांमध्यें तात्पुरता आवश्यक तेवढा कडबा टाकून रस्ता तावडतोब बनवून दिला होता. महात्माजी व त्यांच्याबरोबरील लोक या सर्वांची व अन्य कित्येक संघसभासदांची व्यवस्था रेल्वेच्या तिसऱ्या दर्जाच्या डब्यामध्यें झाली होती. गाडी प्लॅटफार्मवरून पुढें निघून गेल्यानंतर सर्व लोक आपापल्या ठिकाणीं जाण्यास निघाले. संमेलनाच्या वेळीं जेवढें काम असतें त्यापेक्षां किती तरी अधिक काम सर्व निरवानिरव करतांना पडतें. हें अनुभवी लोकांनाच कळण्यासारखें आहे. त्या कामाला हुदली गांवांतील लोक व कार्यकर्ते यानंतर लागले. तो सर्व इतिहास व अनुभव मी या ठिकाणीं विस्तारानें देत नाहीं. किती तरी माल, ल्हानमोठ्या जिनसा संमेलनाच्या दिवसांत चोरीला जातात आणि नाहींशा होतात. पण त्याहीपेक्षां त्या निरवानिरवीच्या काळांत अधिक वस्तू नापत्ता होण्यासारख्या असतात. म्हणून याच काळीं अधिक जागरूक राहून तें काम होईल तितक्या लौकर उरकून घ्यावें लागतें. म्हणूनच आम्ही देखील त्याच कामाला इतक्या तावडतोब लागलों.

४५.

## चर्मकारसंघ व चर्मालय. स. १९३६-३७.

हुदलीमध्यें हरिजन कुटुंबें २५।३० आहेत. त्या कुटुंबांशीं आम्हां कार्यकर्त्यांचा संबंध अगदीं प्रथमपासूनच आलेला आहे. कारण हुदलींतील विधायक कार्यास हरिजन शाळेपासूनच प्रारंभ झालेला आहे. सर्वसाधारणपणें हरिजन कुटुंबांच्या अस्वच्छपणाची आपली जी कल्पना असते, त्यापेक्षां हुदलींतील हरिजन अधिक स्वच्छतेनें राहातात. त्यांतील एक हरिजन श्री. कन्याप्पा ह्यानें गंगाधररावांच्या सांगण्यावरून मद्यपान अगदीं वर्ज्य केलेलें होतें. तो निश्चय त्यानें आमरण धार्मिक कळकळीच्या बुद्धीनें पालन केला होता. मद्यप्राशनामध्यें त्याची पूर्वी चांगलीच प्रगति झालेली असून ख्याति होती. श्री. कन्याप्पा उत्तम वहाणा बनवीत असे. गंगाधररावांच्यासाठीं हाच कन्याप्पा वहाणा करून देत असे. गांवांतील प्रतिष्ठित लोकांच्या वहाणा बनवून देण्यास तो राजी होत असे किंवा त्याला सवड होत असे. हुदलींतील सामान्य मनुष्य त्याच्याकडून वहाणा बनवून घेण्यास त्याला विचारण्याचें धाडसच करीत नसे. गंगाधरराव भारतभर फिरत असल्यामुळें कन्यापाच्या हातच्या वाहणांचें चांगलें प्रसिद्धीकरण आपोआप होत असे. गंगाधरराव महाराष्ट्रांतील आपल्या कांहीं खास मित्रांसाठीं कन्याप्पाकडून वहाणा बनवून पाठवीत असत. महात्माजींसाठीं अंदाजानें त्यांच्या पायाच्या मापाच्या वहाणा कन्याप्पाकडून बनवून सावली येथील संमेलनास जातांना मी नेल्या होत्या. त्यावेळची एक आठवण येथें नमूद करण्यासारखी आहे.

सावलीमध्यें महात्माजींच्या झोपडीसमोरच श्री. वल्लभभाई व महात्माजी सकाळीं बोलत फिरत होते. सकाळचें फिरणें किंवा सहल नेहमींप्रमाणेंच चालली होती. मी व आणखी एक संघसदस्य मिळून तिथें गेलों व थोड्या अंतरावर–दूर–उभे राहिलों. थोडा वेळ आम्ही उभे राहिलेले पाहून मला उद्देशून श्री. वल्लभभाई म्हणाले, 'यह भूत क्यों आया है ! अरे, वहाँ खडे क्यों ! आवो जो कुछ कहना या पूछना है पूछके चले आवो, आवो ।' मी त्यांच्या जवळ गेलों. थैलींत असलेल्या वहाणा बाहेर

काढल्या. त्या महात्माजींच्या पुढें ठेवून त्यांच्या पायाला ठीक बसतात कीं नाहीं हें मी पाहूं लागलों. तेवढ्यांत 'अरे, मुझे बहुत लोक जूते दिया हि करते हैं। तुमने भी वही लाया है?' महात्माजी हसत हसत मला म्हणाले.

'आमच्या हुदली गांवामध्यें 'कन्याप्पा' या नांवाचा एक हरिजन आहे. तो वहाणा फारच उत्तम बनवितो आणि त्यांची किंमतहि तो लोकांकडून फक्त पांचच रुपये घेतो. आपल्या पायाच्या मापाची अंदाजानें कल्पना करून या वहाणा बनवून आणल्या आहेत,' असें मी त्यांना सांगितलें. त्या वहाणा त्यांच्या पायाला आल्या नाहींत. तथापि त्या दोघांनींहि त्या वहाणांची बनावट पाहिली. ते खूप झाले. वहाणांची बनावट त्यांना पसंत पडली होती. दोघांनींहि स्वतःसाठीं एकेक जोड हुदलीहून बनवून पाठविण्यास मला सांगितलें होतें. त्यासाठीं त्यांच्या पायाचें माप घेण्यास कागद व पेन्सील मी माझ्याबरोबर घेतलीच होती. कागदावर पाय ठेवण्यास महात्माजींना सांगून मी पेन्सीलीनें माप घेऊं लागलों, तें पाहून महात्माजी म्हणाले, 'आखिर तुम जातसे चमार नहीं न हैं! नाप लेने के लिये पेन्सिल खडी रखना चाहिये। पेन्सिल टेढी हो देने से नाप कम नापा जायेगा न!" त्यांनीं मला पायाचें माप कसें घ्यावयाचें तें शिकवलें. त्या दोघांच्या पायाचें माप मीं घेतलें. त्या मापाप्रमाणें हुदलीहून दोन जोड वहाणा करवून घेतल्या आणि त्यांच्याकडे पाठवून दिल्या. आम्ही अपेक्षा केली नसली तरी किंबहुना त्यांच्याकडून त्या वहाणांची किंमत मिळावी अशी आमची इच्छाहि नसतांना, त्यांच्याकडून त्या दोन्ही जोडांची किंमत आलेली आहे.

या कन्याप्पाची ही कला त्यानें इतरांना शिकवावी असें मला वाटे. म्हणून मी एक 'चर्मकार संघ' स्थापन केला. त्या चर्मकार संघाचे अध्यक्ष कन्याप्पा यांनाच बनविलें. तरुण व वयस्क मिळून एकंदर अठरा हरिजनांना त्या संघामध्यें दाखल करून घेतलें. त्या संघाच्या वतीनें एक चर्मालयहि उघडलें. त्यानंतर मी कोणालाहि भेटलों तर माझें लक्ष त्याच्या चेहऱ्याकडे न जातां त्याच्या पायाकडे जाऊं लागलें. हेतु एवढाच कीं त्याचें पादत्राण फाटकें दिसल्यास आमच्या चर्मालयांतून त्यांनीं वहाणा विकत घ्याव्यात, हें त्याला सांगावें! गांधीजींच्या विचाराप्रमाणें अहिंसक चर्मच हुदलीच्या चर्मालयामध्यें वापरण्यास प्रारंभ केला. अहिंसक चर्म म्हणजे खाटकानें मारलेल्या जनावराचें कातडें नव्हे किंवा स्वतःच्या मांसाशनासाठीं अगर शिकार करून मारलेल्या प्राण्याचें कातडें नव्हे. आपल्या स्वाभाविक मरणानें मेलेल्या ढोराच्या कातड्यासच 'अहिंसक चर्म' म्हणतात. हें अहिंसक चर्म तितकें टिकाऊ नसतें हें खरें आहे. कारण त्या मृतचर्मांतील सत्त्व हळूहळू कमी होत गेलेलें असतें. त्यांत प्राण आणि त्राण राहिलेलें नसतें. पण त्याकाळीं कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांमध्यें आणि गांधीवादी लोकांमध्यें या प्रकारच्या 'अहिंसक चर्मा'ला मान होता, प्रतिष्ठा होती. त्यामुळें आमच्या हुदलीच्या चर्मालयांत नैसर्गिक मृतचर्मच वापरलें जातें, त्याचीच 'अहिंसक पादत्राणें' होतात असें आम्हीं जाहीर केलेलें होतें.

श्री. कन्याम्याच्या मार्गदर्शनाखालीं अठराहि हरिजन रोज आठ तास काम करून जो माल तयार करीत होते त्याला पुरेसें गिऱ्हाईक बाहेर मिळत नव्हतें. बेळगांवमध्येंहि मी या चर्मालयाच्या कामासाठीं व मालाच्या विक्रीसाठीं बराच प्रचार करीत होतों. तरी आवश्यक तेवढें गिऱ्हाईक मिळत नव्हतें. मुंबईमध्येंहि मीं त्याचा थोडा प्रचार केला. मुंबईमध्यें कांहीं स्त्रियांनीं ग्रामोद्योग भांडार स्थापन केलें होतें. त्यांना भेटून मी चारशें जोड वहाणांची मागणी नोंदविली. या कामासाठीं अधिक आर्थिक सामर्थ्याची किंवा मायेचीहि आवश्यकता पुढें उत्पन्न झाली. ही आमची आर्थिक अडचण स्वामी आनंद यांनीं मुंबईमधील एका धनिक स्नेह्याकडून मदत मिळवून देऊन भागविली होती. मुंबईहून नं. १ पासून नं. ७ पर्यंतच्या भिन्न भिन्न मापांचीं पादत्राणें नमुन्यासाठीं म्हणून हुददीस आलेली होतीं. एक महिन्या दीड महिन्याच्या आंत ही मागणी पुरवावयाची होती. मुंबईच्या श्रीमंतांना लागणाऱ्या पादत्राणाचा तळवा अत्यंत पातळ असतो. त्या प्रकारच्या वहाणांची विक्री खेड्यामध्यें कधींच होणें शक्य नाहीं. नमुन्याप्रमाणें आमच्या चर्मालयाकडून पादत्राणें बनवून पाठविण्यास आम्हांला एक महिना विलंब लागला. आम्ही तो माल पाठविण्याच्या तयारीत होतों, इतक्यांत मुंबईहून पत्र आलें, कीं 'आपला माल अद्यापिहि आलेला नाहीं. आपल्याला दिलेली मुदत संपून पुरा एक महिना झालेला आहे. तेव्हां आम्ही केलेली मागणी म्हणजे दिलेली ऑर्डर आतां रद्द समजावी. आतां आपला माल मुंबईस पाठवूं नये'. आतां या भिन्न भिन्न मापांच्या चारशें जोड नाजूक वहाणांचें काय करावयाचें? असल्या नाजूक वहाणांना खेड्यांत गिऱ्हाईक मिळून त्या खपणें व त्यांची तेथें विक्री होणें जवळजवळ अशक्य होतें. त्याबरोबर हा माल खपून त्याचा पैसा हातीं आल्याशिवाय नवीन माल तयार होणें संभवनीय नव्हतें हेंहि तितकेंच क्रमप्राप्त होतें. अर्थात् नवीन माल तयार करणें बंदच झालें. मी ते चारशे जोड बेळगांवास घेऊन आलों. सायकलला एक पिशवी लावली. त्यांत निरनिराळ्या आकारमानाचे ते जोड घातले आणि त्या नाजूक वहाणा घरोघर फिरून विक्री करण्याचें ठरविलें. प्रथम श्री. अण्णासाहेब लठ्ठे यांच्या घरीं गेलों व त्यांना म्हटलें, 'अण्णासाहेब, घरच्या सर्वांना पांच मिनिटें येथें बोलवा. मी एक फारच सुंदर वस्तु आपल्या सर्वांना दाखवण्यासाठीं आणलेली आहे. माझ्या सायकलला अडकविलेल्या पिशवींत ती वस्तू आहे.' त्यांच्या घरची सर्व मंडळी ती वस्तू पहाण्यास जमल्यानंतर सायकलवरील पिशवी मी आंत आणली, त्यांतील माल सर्वांच्या पुढें ओतला. आमच्या चर्मालयाची करुण कहाणी त्यांना निवेदन केली. अण्णासाहेबांनीं सर्व कांहीं ऐकून घेतलें व घरांतील सर्वांना त्यांच्या त्यांच्या पायाला येणारा एकेक जोड विकत घेतला. आम्ही किंमतहि थोडी कमीच आकारण्याचें ठरविलें होतें. पंधरावीस दिवस घरोघर हिंडून हा सर्व माल कमी किंमतीला विकून मी काढून टाकला. त्यांत चर्मालयाला रु. १७५ तोटा सोसावा

लागला. पण त्यावेळीं अण्णासाहेबांनीं दाखवलेली आपुलकी माझ्या अजून स्मरणांत आहे. ते म्हणाले 'विधायक कार्य करायचें खरें पण वहाणाचारला माल बरोबरीं हिंडून खपवीत राहावयाचें ! कमाल आहे तुमच्या खटपटीची ! तुमच्या देशभक्तीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे !!' असा नुसता गौरव करूनच ते थांबले नाहींत तर ज्यांच्या घरीं गेलें असतां या वहाणा खपूं शकतील अशांचीं कांहीं नांवें मला सुचवून माझ्या विक्रीला त्यांनीं हातभारहि लावला होता.

हें चर्मालय चालविण्यासाठीं एक लहानसें छप्परहि बांधविण्यांत आलें होतें. चर्मालयाचे ठरलेले पैसे प्रत्येक हरिजनाच्या-जबाबदारीवर पादत्राणें बनविण्यासाठीं यथाधिकार राखण्यांत आले. त्यांनीं मूळ पुंजी कायम ठेवून आपलें पोट भरावें आणि मूळ रकम आस्ते आस्ते आम्हांला परत करावी. चर्मालयासाठीं बांधलेल्या छप्परांत बसूनच सर्वांनीं काम करावें अशी योजना होती. त्याप्रमाणें हें नवीन चर्मालय व्यवस्थित चालतें आहे किंवा नाहीं याची पाहाणी आम्ही करीतच होतों. एकदां सर्व हरिजन कुटुंबें कांहीं रोगांच्या सांथीमुळें रानांत कडबा व गवताच्या झोपड्या बांधून रहावयास गेलीं होतीं. कोणाच्या तरी चुकीनें म्हणा किंवा ईश्वरी कोपा-मुळें म्हणा, एके रात्रीं एका झोपडीला आग लागली. सोसाट्याचा वारा असल्यामुळें, हरिजनांच्या सर्व झोपड्या व आंतील चीजवस्तु सर्व कांहीं अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडलें. त्यावेळीं गांवांतील सर्व जातींनीं कपडा व शिजवलेलें अन्न हरिजनांना एक आठवडापर्यंत पोहोंचविलेलें आहे. या कामीं इतर सर्वांबरोबर कै. श्री. बंडोपंत देशपांडे यांनीं अमाप श्रम घेतलेले आहेत. त्यावेळीं स्पृश्यास्पृश्यतेचा विचारहि कोणीच मनांत आणूं दिलेला नव्हता. या आपत्तीनंतर हरिजनांकडून त्यांच्या त्यांच्याकडे असलेली चर्मालयाची रकम परत मागणें किंवा त्याचा जाब विचारणें माणुसकीला सोडून झालें असतें. ज्या हरिजनांनीं आपल्या घरीं आंतल्या बाजूला आपापली गाय, म्हैस, शेळी, कुत्रें इत्यादि जनावरें बांधून ठेवलेलीं होतीं, तीं सर्व अग्नीच्या आहारीं पडलीं. एकदोन अर्भकेंहि त्यांत जळून गेलीं होतीं, असें मला आठवतें. तेथून दोन मैल दूर असलेल्या आमच्या कुमरी आश्रमांतून हा आगीचा लोळ आम्हीं पाहिला व सर्व आश्रमवासी रात्रींच गांवांत पळत आलो होतों. आम्ही गांवांत येऊन पोहोंचेपर्यंत सर्व कारभार आटोपलेला होता. या आपत्तीमधून हरिजनांना वाचविण्याकरितां हुदली गांवानें हरतऱ्हेनें मदत पोहोंचवली आहे. या आगीमध्यें जळून वा भाजून मेलेलीं जनावरें खाण्यासाठीं चार पांच तासांच्या आंत इतकीं गिधाडें जमा झालेलीं होतीं कीं यांना ही बातमी कशी व कोठून लागली असेल याचें आश्चर्य सर्वांनाच वाटत होतें. पुढें दोनचार दिवसांनंतर तीं सर्व गिधाडें तेथून नाहींशीं झालीं.

## ४६

## सेवादलाची स्थापना व मतभेद (स. १९३६ ते ३८)

या कुंदरनाडमधील प्रत्येक जागृत गांवामध्यें सेवादलाची स्थापना करावी असा विचार करून आम्ही त्या कामाला लागलों. आमच्या आश्रमाशीं संबद्ध असलेलेच कार्यकर्ते अनेक खेड्यांतून काम करीत असल्यानें ही संघटना दृढमूल करण्यास आम्हांस कठीण नव्हतें. कांहीं खेड्यांतून यापूर्वीच स्वयंसेवक दलें उभारण्यांत आलीं होतीं. पण या स्वयंसेवक दलांना 'गांधीदल' म्हणावें का 'कॅाँग्रेसदल' म्हणावें याविषयींच कार्यकर्त्यांमध्यें मतभेद झाला, त्यामुळें हीं खेड्यांतील दलें सर्व एकत्र होऊं शकलीं नाहींत. अर्थात् त्याचें लोण सर्व जिल्हाभर पोंचवणेंच आम्हाला शक्य झालें नाहीं. जें कांहीं होईल तें कॅाँग्रेसचें बल व प्रतिष्ठा वाढविण्याचे दृष्टीनेंच व्हावें, असें कांहींना वाटत होतें. तर 'गांधींचे विचार मनावर ठसविण्याच्या दृष्टीनें 'गांधी दल' असें म्हणावें, आज कॅाँग्रेस ही गांधींच्या हातींच असल्यामुळें त्यांच्या विचारानेंच कॅाँग्रेसची शक्ति वाढत जाणारी आहे. म्हणजेच पर्यायानें 'गांधी दल' हें 'कॅाँग्रेस दल'च राहणार आहे. तेव्हां 'गांधीदल' हें नांव योग्य आहे' असें अन्य कांहीं कार्यकर्त्यांचें मत होतें. कार्यकर्त्यांमधील मतभिन्नतेचा परिणाम म्हणून सेवादल रोडावत जात जात शेवटीं नामशेष झालें. स्थानिक खेड्यापुरतीहि ती संघटना टिकूं शकली नाहीं. वेळप्रसंगीं एखाद्या कार्यक्रमासाठीं चार मुलें एकत्रित करावींत आणि आपली सेवादल संघटना जिवंत आहे, असा आभास उत्पन्न करावा व आपलीच फसवणूक करून घ्यावी, अशा थराला गोष्टी गेल्या. भांडणें वाढवीत बसण्यापेक्षां तें सेवादलाचें कामच सोडलेलें बरें, असें ठरवून मी त्यापासून दूर झालों, तें क्षेत्र सोडलें. तेव्हां माझ्या कांहीं मित्रांनीं 'गांधीसेवादल' असें नांव आपल्या सेवादलाला दिलें. 'तुम्हांला पाहिजे होतें तेंच नांव आम्हीं मान्य केलें आहे. पहा ना!' असें मला बोलूनहि दाखविलें. सांगण्याचा मतलब असा कीं आमच्यांतील मतभिन्नता विकोपाला गेली व व्हावें तसें कार्य न होतां, कामाची पीछेहाट होऊं लागली.

४७.

## गांवांतील उकिरडे बाहेर घालविण्याचा प्रयत्न.

संमेलनाची तयारी म्हणून गांवांतील उकिरडे गांवाबाहेर घालविण्याचा प्रयत्न झाला होता. स. १९३६ सालींच आमचें या गोष्टीकडे लक्ष गेलें होतें. घरच्या गुराढोरांच्या गोठ्यांमधील शेण व मूत्र आपल्या घराच्या आजूबाजूलाच कोठेंतरी एखाद्या खड्ड्यांत टाकण्याची वहिवाट गांवांतील सर्वांच्याच अंगवळणीं पडलेली होती. त्यांत अपवाद असे कोणी असलेच तर ज्यांना आपल्या घराजवळच कोठेंहि जागा न मिळाल्यामुळेंच आपल्या गोठ्यांतील जनावरांचें शेणमूत घरापासून दूर नेऊन टाकावें लागत होतें, असे कांहीं तुरळक खेडूतच होते. खुद्द कै. गु. गंगाधरराव यांच्या घरांतील गुरांचें शेणखत टाकण्याची जागा त्यांच्या घराजवळ आणि त्यांनींच बांधविलेल्या मंदिराला लागूनच होती. आम्ही तो उकिरडा प्रथम बंद करविला. ही गोष्ट त्यांच्या घरांतील नोकरांना पसंत नव्हती. कारण उघडच होतें. सन १९३६ सालीं गांवसेवा संघाच्या संमेलनाची तयारी म्हणून या कामाच्या प्रचाराला प्रारंभ झाला होता. सन १९३७ व ३८ या दोन सालांमध्यें गांवांतील बहुतेक उकिरडे व गायरी गांवाबाहेर घालविण्यांत, डोल्यांत भरण्यासारखें यश आम्हांला मिळालें होतें. गांवांतील मुख्य रस्ता फरसबंद करवून घेतांना, त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंला असलेले उकिरडे उठवून गांवाबाहेर नेवविण्याचा प्रयत्न बराच सफलपणें उरकण्यांत आला होता. जेथें उकिरडा व खड्डा होता तेथें भर घालून घरें बांधविण्यांत आलेलीं आहेत. एका खड्ड्यामध्येंच विहीर खोदण्याचा निर्णय त्या गल्लींतील लोकांनीं घेतल्यामुळें गांवांची उपयुक्तता वाढली, गांवाला शोभा आली व गांवांतील हवा स्वच्छ राखण्यास पुष्कळच मदत झाली. या कामीं आम्हांला इतक्या लौकर इतकें यश मिळूं शकेल, असें आम्हांपैकीं कोणासहि वाटलें नव्हतें. या कार्याची बरीच प्रशंसा गांधीजींच्या विधायक कार्याच्या संस्थांकडून भारतभर झालेली आहे. तथापि हट्टानें, आळसाला बळी पडून, किंवा अन्यत्र जवळ किंवा दूर जागा न मिळाल्यामुळें ज्यांच्या गायरी किंवा उकिरडे गांवाबाहेर नेण्यांत आले नाहींत

तेवढीच घाण भरवस्तीमध्यें राहून गेलेली आहे. बाकीचे सर्व उकिरडे गांवाबाहेर नेण्यांत आले आहेत. कांहीं तुरळक लोकांनीं आपले उकिरडे किंवा गायरी परत आपल्या घराजवळ आणण्यास कमी केलेलें नाहीं. परंतु बहुतेकांनीं ही सुधारणा आपल्या अंगवळणीं पाडून घेतलेली आहे.

## ४८.

## प्राथमिक शिक्षण समिति स. १९३८

हुदलीच्या आजूबाजूच्या डोंगरांतील बेरड समाजाच्या मुलांसाठीं प्राथमिक शाळा चालविण्याच्या हेतूनें एक प्राथमिक शिक्षण समिती आम्हीं स्थापन केली होती. या समितीचा अध्यक्ष मी होतों, आणि चिटणीस म्हणून श्री. वडवी काम करीत होते. या समितीमध्यें हुदली गांवांतील पाटील थोरले बसनगौडा हेहि सभासद होते. गांवांतील आणखीहि दोघातिघांना या समितीमध्यें घेतलेले होते. डोंगरांतील चार खेड्यांमध्यें चार प्राथमिक शाळा सुरू करण्यांत आलेल्या होत्या. त्या प्रत्येक शाळेसाठीं एकेक पगारी शिक्षक नियुक्त करण्यांत आला होता. डोंगरांतील खेड्यांमध्यें प्राथमिक शाळा सायंकाळीं चार वाजल्या-नंतर चालविणें अगदीं अशक्य होतें. कारण सर्व गांव त्यावेळीं पिऊन झिंगलेल्या स्थितींत असावयाचा. शाळेमध्यें येऊन एखाद्या मुलाला पुस्तक वाचावयास सांगून मुलाला वाचावयाला येत नाहीं या सबबीवर त्या मुलाच्या थोबाडींत देण्यासहि झिंगलेला मनुष्य चुकत नसे, मग तो मुलगा त्याचा असो कीं दुसऱ्या कोणाचा असो. म्हणून आमची प्राथमिक शाळा सकाळीं आठ वाजल्यापासून दुपारीं दोन पर्यंतच ठेवण्यांत आली होती. मी स्वतः एकदां या पिऊन झिंगलेल्या डोंगरी लोकांच्या तडाख्यांत सांपडलों होतों. तीनचार लोक पिऊन झिंगून एका रानांत बसले होते. त्यांपैकीं एक मनुष्य हातांत एक मोठा दगड घेऊन तो माझ्यावर फेकण्याच्या आविर्भावानें उभा झाला. त्यानें मला बोलावलें. मी गेलों नसतों तर त्यानें मला दगड फेकून मारलें असतें. माझें डोकेंच फोडलें असतें. एरवी बिनझिंगलेल्या स्थितींत ते असते तर त्यांनीं मला मोठ्या अदबीनें नमस्कारच केला असता. मी त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिलों. 'तुला काय येत असेल तें म्हण' असें त्यांनीं मला त्या झिंगलेल्या आवाजांतच फर्माविलें. मी गीतेंतील श्लोक म्हणण्यास प्रारंभ केला. चारपांच श्लोक मी म्हणून दाखविले न दाखविले तोंच त्यानीं माझ्या मानेवर हात ठेवून मला अर्धचंद्र गचांडी दिली, आणि म्हटलें 'बस. जा आतां आपल्या वाटेनें!'

शिक्षकानें पहांटे उठून आपलें जेवण बांधून घेऊन आपल्या खेड्यांत शाळा सुरू करण्यास जाण्यापूर्वी मला भेटावें आणि दोन प्रहरीं दोन नंतर त्या शाळेंतून परत यावें असा शिरस्ता ठेवला होता. हुदलीपासून हीं डोंगराळ खेडीं दोन ते चार मैल अंतरावरचीं होतीं. हे शिक्षक आपआपल्या शाळांमध्यें काय व कसे शिकवीत असतील तो प्रश्न बाजूला ठेवला तरी, निदान शाळेमध्यें शाळेच्या वेळीं हजर तरी असणें त्यांचें कर्तव्य आहे, असें मला वाटत असे. कपडे घालून, हातांत आपल्या भोजनाचा डबा घेऊन, माझ्याकडे पहांटे आलेला शिक्षक, मला वेळगांवांत केव्हां केव्हां भेटत असे. 'आज शाळेला सुटी आहे काय ! शाळेला कां गेला नाहींस !' या माझ्या प्रश्नाला केवळ हसूनच उत्तर मिळे. कधीं कधीं 'माझ्या बदली आज मी अमक्याला शाळेंत पाठवून दिलेलें आहे' असे जबाब मिळत. हजेरीपटावर विद्यार्थ्यांची उपस्थिति मात्र व्यवस्थित भरलेली असे. एका शाळेंतील शिक्षकाचें पत्र तर सांगलीहून त्याच्या घरीं आलेलें होतें. आंब्याचा मोसम होता. हुदलीचे आंबे प्रसिद्ध आहेत. त्या आंब्याचा व्यापार करण्यासाठीं हे शिक्षक कोणालाहि न कळवतां, अर्थात् कोणाचीहि परवानगी न घेतां, आपला सौदा पटविण्यासाठीं सांगलीस गेले होते. या शिक्षकाच्या मनांतील विचारसरणी त्यांनीं आम्हाला उघड सांगितली नसली तरी अशी होती---

'शिक्षक या नात्यानें आम्हांला कांहीं विशेष वेतन दिलें जातें असें नाहीं. ही खेड्यांतील वेरडांचीं मुलें शिकून तरी असे किती से शिकणार आहेत ! ते बी. ए., एम् ए., बॅरिस्टर होणार आहेत थोडेच ! ! चार दिवस त्यांची शाळा बंद राहिली म्हणून कोणाचें फार मोठेंसें नुकसान होणार आहे ? वर्षांतून महिनाभर हा आंब्याचा धंदा करून आम्ही आमच्या घरासाठीं चार पैसे अधिक मिळवले तर त्यांत काय बिघडलें ? शाळा चालवावयाची हे काम आहेच कीं कायमचें चिकटलेलें ! परवानगी विचारावयास आम्ही यांच्याकडे गेलों असतों तर यांनीं आम्हांला ती शाळा कांहीं दिवस बंद ठेवण्याला परवानगी किंवा होकार दिला असता काय ? असेंच 'हो, हो' म्हणायचें व रेटीत रेटीत न्यावयाचें ! कांहीं उत्तर त्यांना दिलें नाहीं म्हणजे झालें ! ! एकाच तोंडानें ते किती बोलतील ! दुसरे तोंड वाजलें नाहीं की आपणच गप्प राहतील ! !'

ही विचारसरणी सर्वच शिक्षकांची असे. प्रत्येकाच्या स्वभावभिन्नत्वाप्रमाणे मापेंत कमीअधिक फरक पडत असेल इतकेंच. वर्ष दीड वर्ष या शाळा अशाच चालवीत आम्ही रेटीत नेत होतों. या शाळा चांगल्या चालवून त्या नांवारूपाला आल्या म्हणजे लोकलबोर्डाला त्या आपल्या ताब्यांत घ्यावयास लावाव्यात, हा आमचा विचार होता. लोकलबोर्डामध्यें त्यावेळीं काँग्रेसचें मताधिक्य होतें. आणि शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांशीं श्री. बडवींनीं चांगल्या प्रकारें गाढ मित्रत्वाचे संबंध राखले होते. योग्य शिक्षकांच्या अभावीं आम्हाला त्या चारहि प्राथमिक शाळा बंद कराव्या लागल्या. शिक्षकांची, व प्राथमिक शिक्षण समितीच्या सदस्यांचीं कर्तव्यें काय आहेत याबद्दलचे मंजूर झालेले ठराव केवळ कागदावरच राहिले. त्या शाळांसाठीं

## ४९.

## प्रौढ शिक्षणार्थ रात्रीच्या शाळा (सन १९३८).

प्रत्यक्ष रात्रीच्या शाळा चालवून प्रौढजनांना साक्षरतेचें व अन्य सामान्य ज्ञानाचें शिक्षण देण्याचा प्रत्यक्ष प्रयोग करून पाहण्याची व त्यावरून प्रौढांच्या शाळांतील प्रौढांना प्रतिवर्षी विद्यार्थ्यांगणिक किती रकम मंजूर करावी याचा अंदाज मुंबई प्रांताचे त्यावेळचे मुख्य प्रधान श्री. बाळासाहेब खेर यांना घ्यावयाचा होता; त्यासाठीं धारवाडला श्री. जी. पी. नाईक व हुदलीस आमच्या आश्रमास त्यांनीं हा प्रयोग करून आमचा अनुभव व हिशेब सरकारांत सादर करण्यास आम्हांला सांगण्यांत आलें होतें. हुदली गांवामध्यें प्रौढांच्या शाळासाठीं आठ गल्ल्यांमधून आठ शाळा सुरू केल्या होत्या, त्या शाळांची संघटना श्री. दादासाहेब देशपांडे हे पहात असत. त्यांचा अल्पपरिचय येथें देत आहे.

### श्री. दादासाहेब देशपांडे, हुदली

हुदली गांवांतील एका प्रतिष्ठित घराण्यांपैकीं देवजी कल्लो देशपांडे हे एक सुवृत्त नागरिक. यांचे वडील श्री. कल्लोपंत यांचें गांवांत वजन होतें. गंगाधररावांचे ते जवळचे नातलगहि होते. यांचेच चिरंजीव श्री. देवजी. लोक त्यांना दादासाहेब या नांवानें संबोधतात. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालेलें आहे. सार्वजनिक कामाची यांना लहानपणापासून आवड आहे. त्यांचें जमिनीचें उत्पन्न घरप्रपंचाला पुरेसें आहे. अशा राष्ट्रसेवेची हौस असणाऱ्या, तरुणावर आमची सर्वांची नजर होतीच. यांना इंग्रजी, मराठी, कानडी या भाषांतील तात्त्विक पुस्तकें वाचण्याचा नाद आहे. पुष्कळशीं सुभाषितें व बोधवचनें त्यांना मुखोद्गत आहेत, व तीं वेळेवर त्यांना सुचतातहि. आपल्या समोर बसलेल्या श्रोतृसमाजाचा दर्जा किंवा आकलनशक्ति किती आहे याचा कांहींहि विचार न करतां, ते आपल्या व्याख्यानांत त्या वचनांचा उपयोग करून आपला विषय मांडण्याचें कौशल्य दाखवीत असतात. स्वतंत्रपणें विचार करण्याचा प्रयत्नहि ते करीत असतात. गेलीं २०।२५ वर्षे ते हुदलीमधील सार्वजनिक

कामांत यथाशक्ति भाग घेत आले आहेत. आर्थिक झीज सोसण्याची व दान देण्याची वृत्ति त्यांच्यामध्यें उपजतच आहे. कोणत्याहि कामाला अधिकांत अधिक साहाय्य किंवा वर्गणी, लोक हुदली गांवांत ज्या चारपांच लोकांकडून मिळण्याची अपेक्षा बाळगतात त्यांच्यापैकीं दादासाहेब देशगांडे हे एक आहेत. इंग्रजी भाषेचें त्यांचें थोडें ज्ञान वाढवावयास लावून, त्यांना मजूरपुढारी बनवावें व देशांतील अव्वल दर्जाच्या मजूर पुढाऱ्यांमध्यें त्यांना स्थान मिळेल इतकें पुढें ढकलावें अशी माझी इच्छा होती; म्हणून मी त्यांना गोकाक फॉल्समधील गिरणीमजुरांमध्यें काम करण्यास माझ्याबरोबर घेऊन गेलों होतों. पण तें काम त्यांना जुळलें नाहीं. त्यांना कोणतेंहि व्यसन नाहीं. गांवांतील सर्व सार्वजनिक कामामध्यें आम्हाला आजपर्यंत त्यांचा उपयोग झालेला आहे. इतकें असूनहि पुढें पुढें करण्याचा किंवा लोकैषणेचा हव्यास त्यांना नाहीं.

प्रौढ शिक्षणाच्या शाळा हुदलीमध्यें चालविण्याची योजना त्यांच्या नेतृत्वाखालीं प्रत्यक्षांत आणावी असें आम्हीं ठरवलें. आम्ही सुरू केलेल्या आठ शाळामधून रात्रीच्या वेळीं हुदलीमधील सुमारें १६५ प्रौढ विद्यार्थी (लोक) शिक्षण घेण्यास येत असत. या लोकशाळा तीन वर्षे चालविण्यात आल्या. या आठ शाळांचा शिक्षणखर्च, आमचा अनुभव, फलाच्या दृष्टीनें किती अपेक्षा राखाव्यात यांचा अहवाल, आमच्या आश्रमातर्फे तयार करून मुंबई सरकारकडे पाठविण्यांत आला होता. श्री. जी. पी. नाईक यांच्या धारवाडांतील कामाच्या अनुभवाचाहि अहवाल मुंबई सरकारकडे गेलेला आहे. मुलकी परीक्षेपर्यंत ज्याचें शिक्षण लोकल बोर्डाच्या शाळांतून झालेलें आहे, ते लोकहि पुढें शेतीच्या कामांत पडल्यानंतर लिहिणें वाचणें विसरून जातात आणि सही करण्यापेक्षां अंगठा उठविणेंच अधिक पसंत करतात. सन १९३८ सालीं गांवांत मुलकी परीक्षेपर्यंत शिकलेले किंवा ती परीक्षा पास झालेले सुमारें ५०।६० तरी विद्यार्थी असावेत. त्यांना शेतीच्या कामाचा कंटाळा वाटत असे आणि शिकलेलें विसरून जाण्यांत अहमहमिका असे. आज परिस्थिति अगदींच पालटलेली आहे. अर्धवट इंग्रजी शिकलेलेहि गांवांत बरेच लोक आहेत. त्यांचा उपयोग करून घेणारा 'योजकः तत्र दुर्लभः' अशी स्थिति आहे. प्रौढशिक्षण दिलें गेलें पाहिजे, तें शक्य तितकें सोपें करून शिकवितां आलें पाहिजे आणि तें कायम टिकविण्याच्या दृष्टीनें स्वतंत्र वेगळीं पुस्तकें लिहिली पाहिजेत, मोठ्या ठळक अक्षरांमध्येंच तीं छापविलीं गेलीं पाहिजेत; हें सर्व खरें असलें तरी सरकारकडून प्रौढ शिक्षणाची जी तजवीज व खर्च केला जात आहे, त्यापासून किती फल पदरात पडूं शकेल, याचा अंदाज बांधतां येत नाहीं. 'मा फलेषु कदा च न' असाच अनुभव येईल.

५०.

## खादीकार्य चरखा संघाकडे गेलें. स. १९३७.

१९३७ च्या डिसेंबर महिन्यांत हुदलीच्या खादीकार्यात एक महत्त्वाचा बदल घडून आला. आम्ही हुदलीमध्यें कुमरी आश्रमाच्या वतीनें जें काम करीत होतों तें चरखासंघाच्या हातीं देण्यांत आलें. आम्हांलाहि त्यांत आनंदच होता. कारण 'चरखा संघ' हीदेखील आमची म्हणजे गांधीजींची अखिल भारतीय संस्था आहे. चरखा संघानें आमच्या खादी कार्यकर्त्यांसहित खादी कार्य आपल्यामध्यें सामावून घेतलें. त्यावेळीं हुदलीमध्यें चि. गंगाप्पा यमकनमर्डी हाच कार्यकर्ता खादीकार्य चालवीत होता. तोच आतां 'चरखासंघाच्या' हुदलीमधील कार्याचा व्यवस्थापक झाला. तो आतां आमचा कार्यकर्ता म्हणून राहिलेला नाहीं. चरखा संघानें आणखी दोन कार्यकर्ते श्री. तिप्पण्णा वेटगेरी हुदली व श्री. अण्णा बसाप्पा अकतंगेरहाळ, या दोघांना त्यांच्या मदतीला दिलें. हे तिघे मिळून खादीकार्य, चरखा संघाचे कार्यकर्ते या नात्यानें पाहू लागले.

५१.

## प्रौढ शिक्षण व साक्षरता प्रसार यांसाठीं कथारूपानें शिक्षण

प्रौढ शिक्षणाच्या दृष्टीनें कोणत्या प्रांतांत काय काय प्रयत्न झाले किंवा चालले आहेत यांची माहिती मी एकत्रित करीत होतोंच. त्या कामीं आपलें आयुष्य खर्चीं घालणाऱ्या लोकांना हुदलीस बोलावून घेऊन त्यांचीं व्याख्यानें करवावींत असेंहि आमच्या मनांत येऊन गेलें. म्हणून पुणें नगरपालिकेंतील इंजीनीयर श्री. शंकरराव भागवत यांना मुद्दाम निमंत्रण देऊन हुदली गांवांतील पेठेंतील चौकांत त्यांचें जाहीर व्याख्यान करविलें. ते कथेच्या रूपानें मराठी अक्षरें शिकवीत असत. हुदलीमधील जनता कानडी असून त्यांना श्री. भागवत यांनीं एक तासाच्या व्याख्यानांत देवनागरी लिपीचें सामान्य ज्ञान करून दिलें. श्री. भागवतांच्या व्याख्यानाचें कानडी भाषांतर वाक्यशः श्री. वडवी करीत होते. त्यांचें व्याख्यान संपलें व ते गंगाधररावांना कुमरी आश्रमांत भेटून परत पुण्यास निघून गेले. त्यांनीं दिलेला विचार मात्र हुदलीमध्यें कायम राहिला आहे.

यानंतर मी व वडवी दोघे मिळून विचार करूं लागलों. श्री. भागवतांनीं देवनागरी लिपीवर कथा बसविली त्याप्रमाणेंच नसली तरी अशी एखादी कथा कन्नड लिपीवर आपल्याला कां बसवितां येऊं नये ? श्री. वडवी यांनीं त्या विचाराच्या मागें लागून तशी एक कथा रचण्यांत यश मिळविलें. त्या कथेचे अनेक प्रयोग होतां होतां ती कथा व तिला अनुसरून अक्षरफलकें तयार झालीं. त्याच सुमारास श्रीमंत अप्पासाहेब पंत औंधकर हुदलीस आलेले होते. त्यांनीं ते फलक औंधमध्यें छापवून देण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली व ती उत्तम रीतीनें पार पाडूनहि दाखविली. या फलकांना पुढें मुंबई सरकारनेंहि मान्यता दिली. ती कथा 'कुरुडर कण्णु' या नांवाखालीं पुस्तकरूपानें छापविण्याचे व त्याबरहुकूम फलकहि बनवून ते सर्व लिथोप्रेसवर छापवून घेण्याची जोखीम व काम मी माझ्यावर घेतलें. या फलकाचा उपयोग प्रौढ शिक्षणशाळांतून कर्नाटकभर होऊं लागला. लोकलबोर्डांच्या

## ५२.

## अंकलगी मठांतील गांधी तत्त्वज्ञान वर्ग.
(सन १९३८ ते १९४०).

महात्मा गांधींच्या विचारांत इतका जोर आहे कीं एखाद्याच्या अंतःकरणापर्यंत अगर बुद्धीपर्यंत एकदां ते विचार जाऊन पोहोंचले म्हणजे त्याचा परिणाम वाचकावर झाल्यावांचून राहातच नाहीं. जे कार्यकर्ते नेहमीं सार्वजनिक कार्यांत आणि कॉंग्रेसच्या अनेक आंदोलनामध्यें हौसेनें भाग घेत असतात आणि आपआपल्या गांवीं यथाशक्ति आणि यथाबुद्धि सार्वजनिक स्वरूपाचें कांहीं तरी काम स्वतःच्या हिंमतीवर करीत असतात, त्यांना एकत्रित करून गांधी-विचाराच्या पार्श्वभूमीवर असलेली तत्त्वज्ञानाची बैठक त्यांना समजून सांगावी असा एक विचार माझ्या मनांत आला. त्याप्रमाणें कुंदरनाडमधील कांहीं खेड्यांतील कार्यकर्त्यांशीं मीं प्रथम विचारविनिमय केला. सामान्यतः ही कल्पना सर्वांना पसंत पडली असावी, असें मला वाटलें. म्हणून मी सर्वांना जाहिर केलें कीं, 'आठवड्यांतील दोन दिवस दोन प्रहरी दोन तास आपण एकत्र बसून गांधी विचारांची चर्चा करूं. कुंदरनाडमधील खेड्यांना 'अंकलगी मठ' हें स्थानच मध्यवर्ती होईल. हुदली गांव थोडें बाजूस पडतें. म्हणून हा 'गांधी तत्त्वज्ञान वर्ग' अंकलगी मठामध्येंच चालविण्याचें आम्हीं सर्वांनीं मिळून ठरविलें. या वर्गासाठीं येतांना सर्वांनीं आपआपला चरखाहि आणावा व वर्ग सुरू होण्यापूर्वीं अर्धा तास मौनपूर्वक सूतकताई करावी अशी योजना आंखली. त्याच-प्रमाणें सर्वांनीं कांहींतरी पाथेय आपल्याबरोबर आणावें, वर्गांतील शिक्षण संपल्या-नंतर सर्वांनीं मिळून तें खावें व आपापल्या चरख्यासह आपापल्या गांवीं परत जावें अशी व्यवस्था ठरली.' या वर्गासाठीं हुदलीमधील कार्यकर्ते अंकलगी मठामध्यें येत असत. अंकलगीमठ हें पवित्र स्थान अनेक दृष्टींनीं व अनेक कारणांनीं योग्य असेंच होतें. अंकलगी मठाधीश स्वामी लिंगायत धर्मशास्त्रज्ञ व आचरणानें अत्यंत सात्विक असे आहेत. तेंहि एक आकर्षण मला होतेंच. शिवाय तेहि गांधी तत्त्वज्ञानाचे अभ्यासक होते.

गांधी विचारांची बैठक समजून सांगण्यासाठीं आधार म्हणून श्री. किशोरलालजी मश्रूवाला यांनीं लिहिलेलें 'सत्यमय जीवन' हें गुजराती पुस्तक आणि त्याच्या जोडीला पू. काकासाहेब कालेलकर यांचे लेख निवडण्यांत आले होते. काकासाहेबांच्या लेखांची खुबी ही आहे कीं ते आपला एखादा नवा विचार अगदीं थोडक्यांत अभिनव शैलीमध्यें मांडतात. विषयमांडणीची एक विशेष अनुपम शैली हें त्यांच्या लिखाणाचें एक वैशिष्ट्य आहे. त्यांनीं विवेचिलेला एखादा विषय मला पटला नाहीं तरी तो सहजासहजीं डोक्यांतून काढून टाकतां येत नाहीं. त्यामुळें विचारांची एक दिशा कळण्यास मदत होते म्हणूनहि ते लेख या गांधीतत्त्वज्ञान वर्गांत आधाराला घेतले होते. या वर्गासाठीं भिन्न भिन्न खेड्यांतून सुमारें वीसबावीस कार्यकर्ते येत असत. नियमित येणाऱ्या कार्यकर्त्यांचे बरोबर कांहीं नवीन नवीन जिज्ञासूहि मधून मधून येत, आणि वर्गाला हजर राहात. अंकलगी मठाधीश स्वामीहि केव्हां केव्हां माझें बौद्धिक सुरू झालें म्हणजे ऐकावयास येऊन बसत असत. अंकलगी मठाविषयीं त्या भागांत नितांत श्रद्धा व भक्ति आहे. त्यामुळें त्यांची उपस्थिति ही आमच्या वर्गाला अधिक पावित्र्य, अधिक गांभीर्य, व अधिक शोभा आणीत असे. हा वर्ग तीन वर्षे सतत चालला होता. या अवधीमध्यें काकासाहेबांची 'आदर्श जीवना'चीं दोन पुस्तकें, किशोरलालजींचें 'सत्यमय जीवन' आणि गांधीजींनी भारतांत केलेलीं लहानमोठीं सत्याग्रहाचीं आंदोलनें वर्गामध्यें विशद करून सांगितलेलीं आहेत. या 'गांधी विचार वर्गा'ची रोजनिशीहि मी लिहून ठेवीत असें. वर्गामध्यें कोणाला कांहीं शंका आल्यास त्यानें ती लेखी माझ्याकडे द्यावयाची आणि वर्गाच्या पुढील दिवशीं मी प्रथम त्या शंकांना उत्तर देत असें. मग पुढील वाचन व त्यावरील प्रवचन सुरू होत असे. या वर्गाचे बाबतींत माझ्यापुरतें माझ्या मनाला समाधान होतें. सन १९४१ च्या वैयक्तिक सत्याग्रहाचे नगारे वाजूं लागले व सर्व कार्यकर्त्यांचें लक्ष त्याकडे वेधलें गेलें. या वर्गांत येणाऱ्या बहुतेकांनीं वैयक्तिक सत्याग्रहांत भाग घेतलेला आहे. गांधीजींचा कोणताहि कार्यक्रम डोळे व कान बंद करून देखील कोणींहि आचरला तरी त्याचे सामान्य फायदे त्याला मिळणार आहेतच. पण तोच कार्यक्रम त्यांच्या विचारांची बैठक आकलन करून घेण्याचा प्रयत्न करीत करीत आचरणें यांत कांहीं विशेष महत्त्व आहे, विशेष गोडी आहे. गांधीजींनीं एकदां स्पष्टपणें सांगितलें होतें 'कातो, समझबूझ कर कातो! खद्दर पेहेनो लेकिन समझबूझ कर पेहेनो!' हीं वाक्यें त्यांनीं एका मौनवारीं म्हणजे सोमवारीं कोणाच्या तरी प्रश्नाला उत्तर देतांना लिहूनच दाखविलीं होतीं. त्यांचे ठसे मनवून खादी भांडारामधून फलकरूपानें लावण्याची प्रथाहि कांहीं वर्षे होती. आतां ते फलक फारसे दिसत नाहींत. गांधीजींच्या जीवनसिद्धांताप्रमाणें समाजपरिवर्तनाची सोपानपरंपरा, 'मानसपरिवर्तन–जीवनपरिवर्तन–व समाजपरिवर्तन' अशी आहे असें माझें मत झालेलें आहे. ग्रामसेवा कशी करावी, याचें विवेचन करतांना महात्माजी प्रथम ग्रामसेवक

कसा असावा याचाच ऊहापोह करीत असतात. कांहीं कार्यकर्त्यांच्या दोषाचा परिहार करण्यासाठीं आपल्या सांनिध्यांत त्यांना ठेवून घेतांना त्यांनीं प्रथम कोणती दक्षता घेतली असेल तर त्या कार्यकर्त्याला त्यांनीं सार्वजनिक सेवेपासून बाजूला राखलेलें आहे. या संबंधांत त्यांनींच एका ठिकाणीं म्हटलेलें आहे,—

"संपूर्ण भारत के उद्धार का भार बिना कारण सिरपर मत लो। अपना निज का भी उद्धार करो। इतना भार काफी है। सब कुछ अपने व्यक्तित्व परहि लागू करना चाहिए। हम स्वयंहि भारत वर्ष हैं। बस, यही मानने में आत्मा का बड़प्पन है। तुम्हारा उद्धारहि भारतवर्ष का उद्धार है। शेष सब व्यर्थ है, ढोंग है। तुममें सच्चे आत्मप्रेमका रस उत्पन्न हो, इसी में तुम डूबे रहो।"

—महात्मा गांधी

५२.

## व्यायामशाळेची माझी कल्पना व प्रयत्न

व्यायामशाळेची इमारत बांधवून कांहीं काळ इमारत तशीच पडून राहिली होती. इमारतीचें शरीकशारीक सर्व काम सन १९३९ सालीं पूर्ण झालें. मिरज येथें एक व्यायामशाळा लहानाची मोठी करण्याच्या कामीं माझाहि हात असल्यामुळें, आणि भारतांतील अनेक प्रांतांमधील व्यायामशाळा मी पाहिल्या असल्यामुळें, तशाच धर्तीवर हुदलीमध्यें मला एक व्यायामशाळा बांधावयाची होती. व्यायामशाळा बांधवण्याचें काम आमच्या हातीं होतें. तें काम कांहींहि करून मीं पूर्ण केलें होतें. पण नवीन पद्धतीवर व्यायामशाळा चालविण्यास स्थानिक तरुणांची राहणी आमूलाग्र बदलणें आवश्यक होतें. त्यासाठीं त्यांचें मतपरिवर्तन होणें क्रमप्राप्त होतें. पण तें करणें तितकें सोपें नव्हतें. फूल ज्या स्वाभाविकपणें फुलतें किंवा उमलतें त्याच स्वाभाविकपणें विचारांचाहि विकास व्हावा लागतो. त्यांत घाई करून चालत नाहीं. बहुतेक खेड्यांतून अशिक्षित तरुणांकडून व्यायामगृह—ज्याला कानडींत 'गरडीमनी' असें म्हणतात—बांधवून मागण्याचा आग्रह असतो असें खेड्यांची सेवा करावयास गेलेल्या ग्रामसेवकाच्या अनुभवास येईल. सुलधाळ खेड्यामध्यें अशी 'गरडीमनी' गंगाधररावांनीं बांधवून दिलेली आहे. एक कुस्ती खेळण्याचा हौदा, त्यावर एक छप्पर आणि भोंवतालच्या चार बंद भिंतींपैकींच एका भिंतीला एकाच माणसाला वांकून अगर पसून जातां येईल एवढें खिडकीवजा दार, हें त्या 'गरडीमनी'चें स्वरूप असावयाचें. त्यांत ना उजेड ना वारा. आंत पाय ठेवतांच घामट वाऱ्याचा कुबट भपकारा अंगावर यावयाचा. अशा कोंदट हवेंत कुस्ती खेळणारे तरुण जोरबैठका काढतात. कुस्ती खेळतात, वेळीं अवेळीं तिथेंच झोपतात आणि 'अन्यहि कांहीं उद्योग' करीत असतात. त्याचा खोल विचार करण्यास जाऊं नये हेंच उत्तम. मी ज्या प्रकारची व्यायामशाळा चालवूं इच्छीत होतों ती यापेक्षां अगदीं वेगळ्या प्रकारची होती. व्यायाम घेण्यापुरतेंच त्या शाळेंत जावें, जोर बैठका काढण्यास कुस्तीच्या

आखाड्याशिवाय वेगळी कोरडी जागा असावी, तिथें मुबलक हवा व उजेड असावा, त्या व्यायामशाळेच्या इमारतीला मोठमोठे दरवाजे व खिडक्या ठेवाव्यात, कोणीहि स्नान केल्याशिवाय आखाड्यांत कुस्ती खेळण्यास उतरूं नये, व्यायामशाळेमध्यें कोणीहि झोपावयास जाऊं नये, इतकेंच नव्हे तर व्यायाम घेतल्यानंतर कोणीहि तेथेंच गप्पा मारीत बसूं नये आणि विविध प्रकारची देशी विदेशी व्यायामाचीं साधनें तेथें उपलब्ध व्हावींत, अशा सुसज्ज नवरद्धतीनें व्यायामशाळा चालवण्याची माझी सारी घडपड असे. त्यासाठीं मला कित्येकांशीं झगडावें लागलें आहे. मी गांवांत नसलें म्हणजे लोक आराम झोपावयास व्यायामशाळेमध्यें येत असत. मी एखाद्या वेळीं रात्रीच्या गाडीनें हुदलीस आल्यास, व्यायामशाळेंत झोपलेल्या लोकांना प्रत्यक्ष त्यांचा हात धरून मला बाहेर घालवावें लागलेले आहे. मी गांवांत असलों म्हणजे मात्र तेथें कोणीहि झोपावयास येत नसत. आठवड्यांतून एखाद्या दिवशींच स्नान करणारे सर्व लोक रोज किंवा मी विचारीन त्या वेळीं ' स्नान केलेलें आहे ' असें मला खुशाल सांगू लागले. महिना महिना व्यायामशाळेंतील केरहि न काढतां मुलें त्यांतच वावरत व खेळत असत. गल्लींतील अनेक रयत आपल्या घरांतील वाकळांसारखे कपडे धुवून ते व्यायामशाळेच्या भिंतीवर किंवा पायऱ्यावर उन्हांत वाळवण्यासाठीं पसरीत असत. ते त्यांचे कपडे मी काढून टाकण्यास सांगितल्यास लोकांना आवडत नसे. 'ही कसली लोकसेवा ?' असें ते आपसांत बोलत, मला ऐकूं येईल इतक्या मोठ्यानें बोलत. पण तसल्या त्यांच्या बोलण्याकडे मीं कधीं लक्ष दिलें नाहीं आणि बहुतेक वेळां ते कपडे मला स्वतःलाच तेथून उचलून बाजूला काढावे लागलेले आहेत. कांहींनीं तर व्यायामशाळेंतील अंगणांत धान्य उन्हाळा घालण्यासहि प्रारंभ केला होता, पण इतसे मी वादा हें कीं कांहीं रयत तास दोन तास आपल्या गाडीचे बैल तेथें आणून बांधूं लागले. मारक्या बैलांच्या शिंगांच्या भीतीनें ते बैल तेथून काढविण्यास त्यांचा मालक येईपर्यंत मला वाट पहावी लागे. आणि म्हणूनच मालक एकदां तेथें बैल बांधून गेल्यानंतर शक्य तितक्या उशीरानेंच तो तेथें परत येत असे. 'जागा मोकळी ठेवण्यापेक्षां आम्ही ती थोडी वापरली व त्यांत आमची सोय झाली तर यांचें काय नुकसान होत असेल !' असा खेडुतांचा त्यामागें विचार असे. आम्ही दिलेली रास्त कारणें त्यांना आकलनच होत नसत. व्यायामशाळा चालविण्यापेक्षां हीं भांडणें भांडण्यांत माझी शक्ति अधिक खर्ची पडूं लागली. माझ्या बरोबरीनें काम करणाऱ्यांपैकीं बहुतेक लोक ज्यांना माझें धोरण व विचार पटत होते ते कार्यकर्तेहि असलीं भांडणें करण्यास मलाच पुढें करीत, किंवा मी येईपर्यंत वाट पहात बसत. या कटकटीमुळें 'कशाला ही व्यायामशाळा बांधविण्याच्या फंदांत मी पडलों— ' असें मला वाटत असे. माझ्या मालकीचीच ती इमारत असल्यामुळेंच मी माझे विचार रेटीत नेऊं धरलों होतों. व्यायामाचीं साधनें आणविण्याचा माझा बेत मी बदलला. खेड्यांतील लोकांना व्यायाम म्हणजे कुस्ती किंवा ओढें उचलणें एवढेंच माहीत असतें. हुदलींतील

एक वेरड रयत वाळूनें भरलेलें पोतें जमिनीवरून उचलून आपल्या खांद्यावर घेत असे. आतां तो अगदीं वृद्ध झालेला आहे. दुसऱ्यांतील कोणा पैलवानानें कोठें कुस्ती जिंकली तर त्याची हलगी वाजवीत मिरवणूक काढणें व त्याला गांवभर फिरवणें एवढाच उद्योग शिल्लक राहिलेला होता. मला त्यांतहि कधीं कधीं सामील व्हावें लागत होतें. बाहेरच्या मोठमोठ्या व्यायामशाळा या लोकांना दाखवून आणल्या तरी 'असलें काम आमच्या गांवांत होणार होय!' असे उद्गार त्यांच्या तोंडून निघत असत. एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा! एवढाच त्याचा तें आखाडे पाहून झालेला परिणाम!!

व्यायामशाळेला लागून असलेली कांहीं पडजागा व पडकीं घरें विकत घेऊन ती जागा मोकळी करवून व्यायामशाळेला लागून एक बंदिस्त पटांगण मीं बनविलें त्यांत अनेकांशीं मला अनुनय करावा लागला, कित्येकांशीं भांडावें लागलें. गांवच्या सामान्य लोकांची मानसिक ठेवणच वेगळी असल्यामुळें, त्यांना माझा दृष्टिकोनच पटत नसे. माझ्या तोंडापुरतें ते माझें कांहीं म्हणणें मान्य करीत, पण खासगी रीतीनें माझ्या विचारांच्या विरुद्धच आपलें मत देत असत व माझें खंडन करीत असत. शेवटीं बहुतेक बाबींमध्यें मीच हार खाल्ली आणि व्यायामशाळेंत झोपण्यास न येणें, विद्यार्थ्यांचें बौद्धिक मी माडीवर घेत असतांना किंवा सायंप्रार्थना चालू असतांना व्यायामशाळेंत मौन पाळणें या दोनच गोष्टींचा मी आग्रह धरून राहिलों. माझे बाकीचे आग्रह गुंडाळून ठेवण्याखेरीज मला गत्यंतरच नव्हतें. माझ्या आरडाओरडी-मुळें मुलांनीं मौन घेतलें तरी दंड थोपटणें म्हणजे कांहीं बोलणें किंवा गलका करणें नव्हे हें देखील पुढें येत असे. बौद्धिकाच्या वेळीं असलें एखादें भांडण झालें म्हणजे त्या बौद्धिकाचीहि रसोई बिघडून जात असे. ही समस्या कशी सोडवावी याविषयीं मी पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांच्याशीं अनेक वेळां चर्चा केली. तेव्हां त्यांनीं एक उपाय सुचवला. मला तो पटला असला तरी मी तो अमलांत आणूं शकलों नाहीं! 'व्यायामशाळेचीं सर्व मंगलोरी कौलें, छप्पर, लाकूड, घडीव धोंडे, आपल्या खर्चानें उतरवून ते लोकांना वाटून टाकावेत व हा त्यांच्या गैरवर्तणुकीचा परिणाम होईल असें एकदांच जाहीर करावें; तरच त्याचा कांहीं उपयोग झाला तर होईल. किंबहुना तसा प्रसंगच आला तर प्रत्यक्ष तसें करून मोकळें व्हावें' हा तो उपाय होता. असें करणें म्हणजे आपणच लावलेलें झाड आपणच आपल्या हातानें तोडून टाकण्यासारखें होतें. अर्थात् हा प्रयोग मी करूं शकलों नाहीं.

गांवाबाहेर एक जुन्या पद्धतीची 'गरडीमनी' म्हणजे व्यायामशाळा नवीनच बांधवावी व तेथें या नवीन पद्धतीच्या व्यायामशाळेचें स्थलांतर करावें असाहि एक विचार माझ्या डोक्यांत येऊन गेला. पण तसें स्थित्यंतर आणि स्थलांतर व्यायाम-शाळेंत येणाऱ्यांना व गांवांतील कोणासहि पसंत नव्हतें. ज्याला गांवामधील प्रौढ, विचारी जन आणि सामान्य लोक यांचा वैचारिक पाठिंबा नसेल तें तसेंच रेटून अंमलांत आणणें खेडेगांवामध्यें अनेक दृष्टींनीं लाभदायक किंवा शक्य होत नाहीं;

म्हणून तो विचारहि मला सोडून द्यावा लागला. दुसरें असे कीं या स्थित्यंतरास होणारा विरोध आमच्या इतर दैनंदिन कामाच्या आड येऊं लागला होता.

सुशिक्षित तरुणांची संख्या व्यायामशाळेंत वाढवून या सर्वच गोष्टींना आळा घालतां येईल किंवा काय याचाहि एकदां प्रयत्न करून पाहिला. गांवामध्यें मुलकी सातवी पास झालेलीं बेकार मुलें आणि प्राथमिक शाळेंतील वरच्या वर्गांतील मुलें एकत्रित करून त्यालाच सेवादल मानून एक फळी तयार करण्याच्या प्रयत्नाला मी लागलों. अशा विद्यार्थ्यांना कवायत व इतर वैयक्तिक व सांघिक खेळ शिकवण्यासाठीं मिरजेच्या 'श्री अंबाबाई तालीम संस्थे'मध्यें पाठवावें, तेथें दोन महिने त्यांना व्यायामशिक्षण देऊन तयार करावें या हेतूनें सुमारें पंचवीस तरुण मिरजेस पाठवून दिले. ते सर्व हुदली गांवांतील नव्हते. जिल्ह्यांतील अन्य तालुक्यांतून कांहीं कार्यकर्ते त्यांत समाविष्ट केलेले होते. त्यांचा गणवेश व मिरजेंतील जेवणाखाणाचा खर्च आम्हीं केलेला आहे. 'मिरज अंबाबाई तालीम संस्थेनें' या लोकांना मोफत शिक्षण दिलेलें आहे. या वर्गांत गेलेल्या कांहीं विद्यार्थ्यांनीं बँड व फ्ल्यूट वादन तिथेंच शिकून घेतलें. ते हुदलीस परत आल्यानंतर त्यांना बँडचा एक संच व फ्ल्यूटही मी आणून दिलेला आहे. या मुलांपैकीं केवळ चारपांच मुलें सोडलीं तर इतर कोणी रोज व्यायामशाळेंत जाऊन व्यायाम घेतलेला दिसून आलें नाहीं. हीं सर्व शिक्षित मुलें दिखाऊ होतीं. यांत थोडा भाग शिक्षणपद्धतीच्या दुष्परिणामाचाहि असावा किंवा होता असें मला वाटतें.

गांवामध्यें विवाहसमारंभप्रसंगीं हा बँडचा संच लोकांचीं निमंत्रणें स्वीकारूं लागला. जिल्ह्यामध्यें कोणी कोठें पुढारी येणार असतील तर गणवेश घालून हा बँड-वादकांचा संच जाऊं लागला. ना. बाळासाहेब खेर मुंबई प्रांताचे मुख्य प्रधान झाल्या-नंतर जेव्हां प्रथम बेळगांवास आले त्यावेळीं हुदली येथील या बँडवाल्या स्वयंसेवक पथकाचें प्रथम प्रदर्शन मी करविलें होतें. राष्ट्रीय कार्यक्रम, राष्ट्रीय दिन, राष्ट्रीय उत्सव, काँग्रेसच्या परिषदा आणि धार्मिक जत्रा अशा प्रसंगीं हुदली स्वयंसेवक पथकाचा उपयोग आम्ही करून घेत असूं. त्यांतील मूळ उद्देश कापरासारखा केव्हां उडून गेला हें आम्हांला समजलेंच नाहीं.

हुदलीचें आमचें काम आम्हांला बंद करावें लागल्यानंतर या सर्व इमारतींचे, त्यासाठीं केलेल्या खर्चाचे आणि इतर अनेक योजनांसाठीं झालेल्या कर्जाचें काय करावें, हा प्रश्न आमच्यापुढें दत्त म्हणून उभा राहिलेला होता. या बाबतींत मदतीसाठीं गंगाधररावांच्याकडे जाण्याचा आमचा मार्ग यापूर्वीच आम्ही होऊनच बंद करून घेतलेला होता. ही गोष्ट खरी असली तरी या कामीं गंगाधररावांनीं आम्हांला आर्थिक मदत करावी असेंच पू. श्री. काकासाहेबांचें मत होतें. माझ्यापुरता तरी मी तो मार्गच सोडून बसलों होतों.

या सर्व इमारती विकून कर्ज भागवून टाकावें असा विचार करून तो अंमलांतहि आणला. हीं घरें विकलीं जातांना देखील आमच्याबरोबर काम करणाऱ्या एकदोघांनीं

गांवांत कोणतींहि घरें कोणी विकतच घेऊं नयेत असाहि प्रचार व प्रयत्न केला होता. पण त्या काळच्या मामुली दरापेक्षांहि कमी दरानें तीं घरें विकण्यास मी तयार झाल्यामुळें बहुतेक घरें विकलीं गेलीं. एक घर मोकळें करवितांना मला आमच्या-बरोबर काम करणाऱ्यांशीं जातीनें भांडावें लागलें होतें. उरलेली मुख्य इमारत तेवढी विकतां येण्यासारखी नव्हती. त्या इमारतीचें काय करावें हा आमच्यापुढें प्रश्न होता. ती इमारत सार्वजनिक करून एक ट्रस्ट निर्माण करावा असा मीं निर्णय घेतला होता. गांवांतील कोणाकोणास विश्वस्त म्हणून घ्यावें याची निवड होईना. शेवटीं असें ठरविण्यांत आलें किंवा घडून आलें म्हणा कीं, या इमारतीची एक माडी माझ्याकडे ठेवून बाकीची सर्व जागा व इमारत ग्रामपंचायतीला नव्याण्णव वर्षांच्या करारानें नाम-मात्र भाडें आकारून भाड्यानें दिली जावी. तसा रजिस्टर कागदहि मीं करून दिलेला आहे. हल्लीं त्याच इमारतीमध्यें जुन्या पद्धतीची 'गरडीमनी' ऊर्फ व्यायामशाळा चालत आहे. आणि माझ्या ताब्यांत ठेवलेल्या माडीवर 'वैदिक वर्ग' हल्ली चालत नसल्या-मुळें आम्हालाहि गोंगाट होतो अशी तक्रार करण्याचें कारण उरलेलें नाहीं. हुदली येथील सार्वजनिक कामाची वेल या प्रकारें वाळून गेली! हें लिहीत असतां होणारी अंतःकरणांतील कालवाकालव आवरतां आवरत नाहीं! आणि मनांतील दुःख आपोआप नेत्रावाटें वाहूं लागतें!

असं कीं 'शिक्षण व ज्ञान हे माणसाचे खरे डोळे आहेत. त्या ज्ञानचक्षुंवांचून मानव हा अंध असल्यासारखा आहे. म्हणून आपल्या लहान मुलांच्यासाठीं आम्ही एक नवीन    बांधलेलें आहे. तुमच्या लहान मुलांना आम्ही आमच्याकडे ठेवून घेऊं, त्यांना रोज पोटाला सकस अन्न देऊं, कपडेलत्ते देऊं, रोज स्नान घालूं आणि शिक्षणहि देऊं, मुलांना भेटण्यासाठीं त्यांचे कोणी नातलग आल्यास त्यांनाहि एक जेवण देऊं व मुलाच्या-जवळच एखादी रात्र राहण्याची त्यांची इच्छा असली तर त्यालाहि आमची हरकत नाहीं.' अशा प्रकारें इतकी आमची काळजी घेऊन व इतका खर्च करून हा खटाटोप हे लोक तरी कां करतात याचें त्यांना कोडें पडे. ते त्याना उलगडत नसे आणि आमच्या विषयींचीत्यांची मूळचीच संशयवृत्ति आणखी एवढी वाढे. एकदां तर एका वेरड खेड्यांतील एका वृद्ध आजीबाईनें आम्हांला जाहीर सभेंत सरळच ऐकविलें, कीं 'आम्ही थोड्या धान्याची भिक्षा मागितलेली पाहिली आहे, शिजवलेल्या अन्नाची भीक मागितली जाते व वाढली जाते हेंहि आम्हांला माहीत आहे, पण मुलांची भीक मागितलेली मी तरी कधीं ऐकिलें किंवा पाहिलेले नाहीं. भीक मागून मुलें अशीं कधीं मिळत नसतात! तुम्ही चारपांच जण या आमच्या गांवाला आलेले आहांत, तुमच्यापैकीं कोणी म्हातारेहि दिसत नाहींत, चांगले धडधाकट जवान दिसतां. तुम्ही दोनदोन तीनतीन स्त्रियांशीं लग्नें करून घ्या. तुम्हांला मुलें होतील. मग त्या मुलांना घेऊन तुम्ही पाहिजे तसल्या शाळा चालवा. असें मुलासाठीं भीक मागत वणवण हिंडूं नका. आमचीं मुलें तुम्हाला कधीं मिळतील?" त्या वृद्धेचें असलें भाषण ऐकून हंसावें कीं तिच्या अज्ञानाची कींव करावी तेंच आम्हांला तेव्हां कळलें नाहीं. आम्ही त्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला आणि नेहमींप्रमाणें आमच्या पुढील उद्योगाला लागलों. वर्धाशिक्षणाच्या प्रयोगासाठीं या वेरड खेड्यांतून आम्हांला प्रथम चौदा मुलें मिळालीं होतीं. परंतु तेथें शौचाला जातांना पाणी घेऊन जावें लागतें, रोज दात घासावे लागतात, साबण लावून आपले कपडे धुवावे लागतात, आणि रोज स्नान करावें लागतें, असल्या नित्याच्या नियमांना कंटाळून, त्यांपैकीं सहा मुलें संगनमत करून एका रात्रीं पळून गेलीं होतीं. आमच्या या प्रयोगांत मुलांची संख्या पंचविसावर कधींच वाढूं शकली नाहीं.

वेरडांचीं हीं खेड्यांतील मुलें जनावरांप्रमाणेंच पावसांत सांपडल्याखेरीज अंगावर कधीं पाणी घेत नाहींत. प्रातर्विधी झाल्यानंतर स्वच्छतेसाठीं पाण्याऐवजीं एखादा दगड किंवा खापरखुंटी हातीं मिळाली तर त्यावर त्यांचें काम भागूं शकतें. दांत घासण्याची तर त्यांना कधीं आठवणच होत नाहीं. संसार चालविण्यास किंवा निरोगी मुलेंबाळें होण्यास शिक्षणाची किंवा लिहिण्यावाचण्याची आवश्यकता आहे ही कल्पनाच त्यांना हास्यास्पद वाटते. मग या गोष्टीचा विचार करणें दूरच राहिलें. अशा विषम परिस्थितींत 'वेरड विद्यार्थी वसतीगृहा'साठीं आम्हाला २०।२५ मुलें मिळूं शकलीं. त्यांना आमच्याजवळ वसतीगृहांत आणून ठेवलें. सकाळीं पांचीतरी नास्ता

व दोन वेळ भरपूर जेवण त्यांना मिळत असे. पाणी पिण्यासाठीं तांब्या मांडें, बहिर्दिशेला जाण्याच्या वेळीं उपयोग करण्यासाठीं एक टिनपॉट, चड्डी, शर्ट, टोपी व हातरुमाल असे खादीच्या पोषाखाचे दोन संच, प्रत्येकाचें स्वतंत्र ठराविक अंथरुण-पांघरूण, इतकी त्यांची व्यवस्था करून दिली व या सर्व वस्तूंचा उपयोग केव्हां करावयाचा तेंहि त्यांना समजून सांगितलें. 'प्रातःकालीं प्रातर्विधीला जातांना हातांत पाण्याचें भांडें घेतल्याशिवाय या गांवातील लोकांना शौचालाच होत नाहींसें दिसतें. आमचें तसें नाहीं, आमच्या गांवीं आम्ही कुठेंहि बसून पोट मोकळें करून येतों,' असें तीं मुलें सकाळच्या वेळीं आपापसांत चेष्टेनें बोलत असत. या मुलांना आम्ही टकळीवर सूत कातण्यास शिकविलें. त्याच्याद्वारां वर्धा शिक्षण योजने-प्रमाणें आम्ही त्यांना शिक्षण देण्यास प्रारंभ केला. सहा महिन्यांच्या अवधींत हीं मुलें नवीन जीवन आपलेंसें करून घेऊं शकलीं होतीं. त्यांना शिक्षण देण्यासाठीं ज्या कार्यकर्त्याला आम्ही नियुक्त केलें होतें त्याला मात्र 'वर्धा शिक्षण योजने'ची पुसट यत्किंचित् देखील कल्पना नव्हती. आम्ही सांगूं त्याप्रमाणें तो त्या मुलांना शिकवीत असे. वर्धा शिक्षण योजना प्रत्यक्षांत आणणारा शिक्षक अद्यापि जन्माला यावयाचा आहे, असेंच मला वाटत होतें, आणि या प्रयोगांत खरी उणीव तीच होती असें माझ्या अनुभवास आलें होतें. सरकारी प्राथमिक शाळा कशा असतात व कशा चालविल्या जातात हेंहि या बेरड मुलांनीं पाहिलेलें असावें व अनुभविलेलें असावें म्हणून रोज एक तासभर लोकलबोर्डाच्या प्राथमिक शाळेमध्यें या मुलांना केवळ बसून येण्यास आम्ही पाठवीत असूं. एके दिवशीं त्या शाळेंतील शिक्षक आपल्या खुर्चीपुढील टेबलावर पाय सोडून झोपी गेलेले होते, तें त्या मुलांनीं पाहिलें व तीं सर्व मुलें आपल्या वसतिगृहामध्यें शाळेंतून परत आलीं. इतक्या लौकर शाळेंतून परत येण्याचें कारण विचारतांच मुलांनीं एक मासलेवाईक पण सत्यदर्शन घडविणारें उत्तर दिलें. "शाळेंतील गुरुजींना कांहींतरी झालेलें आहे. ते आपल्या खुर्चीमध्यें मान टाकून पडलेले आहेत, त्यांचे पाय पुढील टेबलावर पसरलेले आहेत, नाकाऐवजी तोंडांतून वारा बाहेर पडत असल्यामुळें त्यांच्या मिशा नाचत आहेत, नाकांतून एक प्रकारचा आवाज निघत आहे. शाळेंत कोणी आले किंवा शाळेंतून कोणी बाहेर गेले तरी त्यांना त्याची खबर असत नाहीं. अशा स्थितींत आम्ही शाळेंत कशाला बसून राहावयाचें? म्हणून आम्ही शाळेंतून लौकर निघून आलों."

एकदां, एका मुलाला आपल्या आईची आठवण झाली. त्यानें मला विचारलें 'मी घरीं जाऊन आईला भेटून येऊं का?'

'उद्यां सोमवार आहे. बाजारासाठीं व तुला भेटण्यासाठीं तुझे आईबाप इकडे येणारच आहेत. आज तूं घरीं कशाला जातोस? व आत्तांच गेलें पाहिजे असेंहि कांहीं नाहीं. उगीच कशाला खेप!'

आईकडे जाण्याचा त्याचा हट्ट कायम होता व माझा मोडताहि कायमच

होता. शेवटीं त्या लहान मुलानें आमचा सर्व गणवेश काढून माझ्यापुढें ठेवला व 'आतां मी माझ्या आईकडे जाऊन येतों !' असें सांगून तो निघाला. मला त्या मुलाचें कौतुक वाटलें. त्यानें कपडे काढून देण्यांत दाखविलेला प्रामाणिकपणा व शिस्त पाहून मला आनंद झाला. आईला भेटण्याच्या उत्सुकतेतहि तो आपल्या कर्तव्याला विसरला नाहीं, या जाणिवेनें मी गहिंवरून गेलो. त्याला जवळ घेतलें, त्याच्या पाठीवरून हात फिरविला आणि त्याला पुनः अंगावर कपडे घालण्यास सांगून त्याला घरीं जाऊन येण्यास परवानगी दिली. 'दुसऱ्याचे कपडे घेऊन घरीं निघून जाऊं नये' एवढें ज्ञान त्या वेरड मुलाला आलें, हा आमच्या शिक्षणाचा प्रभाव होता. याचाहि मला आनंद झाला होता. मुलगा आपल्या इच्छेप्रमाणें आईला भेटून परत आला, तेव्हां विशेषच आनंद झाला.

आम्ही प्रत्येकाला आपले कपडे—ते विशेष मळलेले नसले तरी—साबण लावून रोज धुवावयास लावीत होतों. आपली ताटवाटी भोजनानंतर घासून पुसून स्वच्छ करून, ठराविक जागींच ठेवण्याची संवय त्यांना लागावी. कपड्याच्या सर्व गुंड्या घालण्यास कोणी विसरूं नये, याचीहि खबरदारी शिक्षकाला घ्यावी लागत असे. रोज दात घासण्याचा कार्यक्रम शिक्षकाच्या समोरच उरकला जात असे.

हुबळीचें विधायक कार्य पाहण्यास मुंबई प्रांताचे उपमंत्री श्री. वांद्रेकर एकदां आले होते. त्यावेळीं मला त्यांनीं विचारलें कीं 'या वेरडवसतिगृहामधील मुलांची परीक्षा कशी घेतां?'

'आपल्यासारखे कोणी प्रतिष्ठित पाहुणे आले म्हणजे त्यांच्या शिक्षणाची परीक्षा आपोआप होत असते. आतां प्रात्यक्षिकच करून दाखवितों. एका लहान मुलाला मी बोलावून सांगितलें, 'हें पहा, हे पाहुणे आतांच आले आहेत. त्यांच्यासाठीं पिण्याचें पाणी थोडें घेऊन ये पाहूं !' मुलगा गेला. आणि येतांना एक सतरंजीची वडी, पाय धुण्यास वेगळ्या तांब्यांत पाणी, एक टॉवेल, पिण्याच्या पाण्याचा एक गडवा व छोटें भांडें हे जिन्नस तो घेऊन आला. त्यापूर्वी स्वतःचे हातपायहि स्वच्छ धुण्यास तो विसरला नव्हता. हा मुलगा सहा महिन्यांपूर्वी आपल्या घरीं कधीं स्नान करीत नसे कीं शौचाला जातांना पाणी घेऊन जात नसे, हे सांगूनहि कोणास खरें वाटणार नाहीं. इतका फरक त्याच्या रहाणीमध्यें या वसतिगृहातील शिक्षणामुळें झालेला होता. या फरकावरून व स्थित्यंतरावरून त्याला मिळालेल्या शिक्षणाची कल्पना आपण करूं शकतां !!

या वेरड वसतिगृहांतील विद्यार्थ्यांनीं सकाळ-सायंकाळची प्रार्थना फारच लौकर शिकून घेतलेली होती. खेड्यांतील इतर विद्यार्थ्यांपेक्षां त्यांचे उच्चारहि विशेष अशुद्ध होते असें नाहीं. वसतीगृहांतील शिस्तहि त्यांनीं अंगवळणीं पाडून घेतलेली होती. या वेरड वसतीगृहामध्यें काम करणाऱ्या दोन कार्यकर्त्यांमधील भांडणामुळें हें वेरड वसतिगृह ओस पडण्याच्या मार्गाला लागलें. वसतिगृहांतील मुलें पळवून लावून तें बंद

पाडण्याच्या उद्योगाला शिक्षकच मनापासून लागल्यामुळें, त्या कामाचा शेवट होण्यास वेळ लागला नाहीं. त्याच वेळीं दारूबंदीचा प्रयोग जोरात होता. अर्थात् खेड्यापाड्यांमध्यें गांवठी दारूउत्पादनाला ऊत आला होता. त्या कामीं वेरडांच्या लहान मुलांचा उपयोग पुष्कळच होण्यासारखा होता. लहान सहान ओझें घेऊन २०।२५ मैलपर्यंत रात्रीं देखील डोंगराळ प्रदेशातून एकटे प्रवास करण्यास हीं मुलें भीत नसत, आणि या लहान मुलांचा कोणाला संशयहि येण्यासारखा नव्हता. दारूची एक बाटली ठराविक ठिकाणीं शहरापर्यंत पोहोंचविण्यास दोन रुपयेपर्यंत मजुरीचे दर वाढलेले होते. दारूबंदीच्या प्रारंभीच्या काळांत असें होणारच, असें सरकारला वाटत होतें. वेरड मुलांच्या आईवडलांना देखील या व अन्य अनेक कारणांसाठीं आपलीं मुलें आपल्याजवळ घरीं यावीत, असेंच वाटत होतें. ही त्यांची मागणी आमच्याकडे कायमचीच होती. वसतिगृहामध्यें मुलांना भोजन चांगलें मिळतें याशिवाय कोणतेंहि प्रलोभन पहिल्यापासूनच नव्हतें. वसतिगृहामधील मुलें आतां मोठीं झालेलीं आहेत. कधीं कोठें तीं भेटलीच तर कपड्यांची स्वच्छता तेवढी त्यांच्यामध्यें उरलेली दिसते याखेरीज वसतीगृहाचा कोणताहि संस्कार त्यांच्यामध्यें आतां नाहीं.

५६.

## कोरडें छात्रालय व त्याचा अनुभव

स्वयंसेवक मंडळांतील विद्यार्थ्यांची संख्या वाढावी म्हणून, अमच्या व्यायामशाळेमध्येंहि विद्यार्थ्यांची उपस्थिति वाढविण्यासाठीं, खेड्यांतील दैनंदिन कामासाठीं हाताशीं मनुष्यबळ असावें म्हणून शाळेंतील विद्यार्थ्यांशीं संबंध वाढविण्याकरतां, आम्ही गांवामध्यें एक 'कोरडें छात्रालय' सुरू केलें होतें. शाळांमधील विद्यार्थ्यांनीं केवळ भोजन व खाणेंपिणें यासाठीं घरीं जावें व बाकीचा सर्व फावला वेळ छात्रालयांत घालवावा. हा 'कोरडें छात्रालय' याचा अर्थ आहे. या विद्यार्थ्यांच्या शाळेंतील त्यांचा अभ्यास करण्यास त्यांना तेथें सवड मिळावी व मदत व्हावी हें त्यांतील धोरण होतें. त्यासाठीं एका पगारी शिक्षकाची योजना केली होती. या छात्रालयांतील विद्यार्थ्यांचा दिनक्रम व वेळापत्रकहि तयार केलें होतें. त्याप्रमाणें काम चालू आहे किंवा नाहीं, याकडे आमचेंहि लक्ष होतें. परंतु स्वातंत्र्याच्या लढ्यांतील चळवळीसाठीं आम्ही वारंवार परगांवीं जात असल्यामुळें आमची तपासणी व लक्ष असावें तितकें बारीक व दक्षतेनें राहात नसे. आम्ही कोणी तरी जेव्हां गांवांत उपस्थित असूं तेवढ्या काळापुरतें छात्रालयाचें काम वेळापत्रकाप्रमाणें चालत असे. हे छात्रालयाचें तोंडदेखलें काम कित्येक महिने आमच्या नजरेसच आलें नाहीं. आम्ही गांवीं आलों कीं आमच्याबरोबर कोणीतरी पाहुणा हा असावयाचाच. आमच्यामार्फत चाललेल्या गांवातील सर्व प्रवृत्ती त्यांना दाखविण्याची प्रथाच पडून गेलेली होती. तो दिवस व तो कार्यक्रम साजरा झाल्यानंतर त्या दिवशींचें शिक्षण संपत असे.

त्या छात्रालयांतील शिक्षकानें रात्रीं कांहीं वेळ आणि पहाटे, विद्यार्थ्यांकडून त्यांच्या शाळेंतील अभ्यास आपल्या देखरेखीखालीं करवून घ्यावा आणि छात्रालयांत रहाणाऱ्या विद्यार्थ्यांचा अभ्यास शाळेंतील इतर विद्यार्थ्यांपेक्षां अधिक चांगला व अद्ययावत् असतो असें दिसून आल्यास छात्रालयाचा फायदा घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढेल, असें गृहीत धरून हा प्रयोग करण्यांत आला होता. यायोगें

छात्रालयांतील विद्यार्थ्यांशीं आमचा तितका अधिक संपर्कहि वाढत जाईल असें आमचें गणित होतें. छात्रालयांतील शिक्षक कित्येक दिवस झोपावयास आपल्या स्वतःच्या घरीं जात असे. तो छात्रालयामध्यें झोपतच नसे. हा शिक्षक संसारी आहे, त्याचा संसार वाढता आहे. या गोष्टीकडे माझें कधींच लक्ष गेलें नाहीं. अशा अनेक लहानमोठ्या कारणांनीं विद्यार्थ्यांना मोकळें रान मिळालें. त्याचा त्यांनीं भरपूर फायदा घेतला. तसा त्यांनीं घेतला नसता तरच आश्चर्य! विद्यार्थ्यांच्या घरीं त्यांच्या त्यांच्या आईवडिलांचा तरी दाब व धाक असे, तोहि छात्रालयांत नव्हता. अशा स्थितींत विद्यार्थी आपसांत दंगामस्ती करीत, मोठमोठ्यानें हसत खिदळत, आरडाओरड करीत आणि दंगल माजवून वेळ घालवीत असत. आजूबाजूच्या घरांतील लोक हा सर्व दंगा सहन करीत असत. मुलगा 'छात्रालयांत अभ्यासाला जावयाचें आहे' असें सांगून घरीं जेवणाची घाई करी. याचा अर्थ मुलाला अभ्यासाची ओढ लागली आहे असें समजून विचारे आईवडील घरचीं इतर कामें टाकून त्याला अगोदर जेऊं घालीत आणि मुलगा रिकेला लागला याचा आनंद मानीत असत. पण वस्तुस्थिति तशी होती काय! याचा त्यांनींहि कधीं विचारच केला नाहीं. या छात्रालयांत केवळ विद्यार्थ्यांनाच प्रवेश मिळत असे हें येथें सांगून ठेवणें आवश्यक आहे. या सर्व अव्यवस्थेवरील पडदा एकदां अचानकपणें दूर झाला.

छात्रालयांतील विद्यार्थ्यांनीं एका मध्यरात्रीं एक अजब खेळ आरंभला. एका विद्यार्थ्याला प्रेताचें सोंग दिलें आणि इतर विद्यार्थी प्रेताभोंवतीं मोठमोठ्या कर्कश स्वरांत हेल काढून रडूं लागले. अशा प्रकारच्या रडण्यांतील निरनिराळ्या व्यक्तींची व बोलण्याची ते नक्कल करीत; त्या १५–२० विद्यार्थ्यांच्या ओरडण्याचा आवाज सबंध गल्लीभर दणाणून गेला. कोण मेला आहे? कोणाला काय घडलें याची पूसतपास सुरु झाली. गल्लींतील लोक जमा झाले. तरी या विद्यार्थ्यांचें रडणें जोरजोरांत चाललेंच होतें. त्या गोंगाटावरून शिक्षक त्या रात्रीं छात्रालयांत झोपलेला नव्हता हें स्पष्टच झालें. गांवांतील प्रमुख लोकांनीं आमची चौकशी सुरू केली. आणि सर्व लोक शेवटीं त्या छात्रालयांतच शिरले. तिथें विद्यार्थी त्या सोंगाड्या प्रेताभोंवतीं बसून मोठमोठ्यानें रडत होते. चौकशी करतां तो केवळ खेळ आहे हें उघड झालें. पगारी शिक्षक हल्लीं कित्येक दिवस छात्रालयांत झोंपावयास नसतोच हें तेव्हां निदर्शनास आलें. हें 'कोरडें छात्रालय' बंद करून त्या शिक्षकास रामराम केल्यावांचून आम्हांस गत्यतरच उरलें नव्हतें. "रोजच रात्रीं छात्रालयात झोपण्यास सांगण्याला या ब्रह्मचाऱ्याचें काय जातें?" असें त्या संसारी शिक्षकास वाटे!

हें छात्रालय चालविण्यासाठीं कै. श्री. बंडोपंत देशपांडे यांचें घर आम्ही वापरीत होतों. तेवढ्या कामासाठींच त्या घराची दुरुस्ती आम्हीं करविली होती. छात्रालय बंद केलें हें पाहतांच मालकानें आपलें घर परत स्वतःच वापरण्यासाठीं मागून घेतलें. ते घर मालकाच्या स्वाधीन करून आम्ही मोकळे झालों. गांवांतील

एक घर नीट दुरुस्त करवून पुनः मालकास परत दिलें एवढेंच पुण्य आमच्या पदरीं पडलें!!

स्वातंत्र्याच्या चळवळींत किंवा अन्य कोणत्याहि फंदांत न पडणारा शिक्षक आम्हास निवडतां न आल्यामुळें किंवा आम्हांपैकींच कोणीतरी याच कामाला वाहून न घेतल्यामुळें हा उत्तम उपक्रम दोन वर्षांनंतर आम्हांला बंद करावा लागला. या कार्यामागील विचारसरणी व योजना संपूर्णतः योग्य होती, यांत बिल्कूल संदेह नाहीं. विधायक कार्यामध्यें गुंतलेल्या कार्यकर्त्यांना स्वातंत्र्याच्या चळवळीमध्यें जाऊं न देतां गांधीजींनीं त्यांना आपलें 'खास राखीव सैन्य' म्हणून मागें ठेवलें. शेवटच्या 'चलेजाव' चळवळीमध्यें मात्र या 'राखीव सैन्यास' हि गांधीजींनीं आघाडीवर पाठविण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. तशी आमची स्थिति नव्हती. चळवळीमध्यें तुरुंग भरण्यासाठीं मनुष्यबळ मिळवण्याकरतांच आमचा सर्व विधायक कार्यक्रम होता. तुरुंगांत किती कार्यकर्ते गेले! हेंच आमचें तरमापक होतें. आणि तेवढ्याच दृष्टीनें पाहिलें तर आम्हाला जेवढें यश लाभलें तेवढें इतर कोणत्याहि पुढाऱ्यानें चालविलेल्या आश्रमास लाभलें नसेल. 'कोरड्या छात्रालयांत' आपलीं मुलें पाठविण्यापूर्वीं लोकांनीं दहा वेळां विचार केला असता. 'तुम्ही स्वतः छात्रालयाचें काम हातीं घेण्यास तुम्हाला सवड मिळेल तेव्हांच त्या मानगडींत पडणें उत्तम' असें लोकहि आतां आम्हाला सांगूं लागले. आम्हालाहि त्यांचें तें म्हणणें वाजवी वाटे. त्या शिक्षकानें आपल्या स्वतःचें, आमचें व आमच्या कार्याचें किती नुकसान केलें याची जाणीव किंवा भान त्या पगारी शिक्षकाला नव्हतें, आणि कामांत अलिप्तपणा असल्याखेरीज तें येणेंहि शक्य नव्हतें. त्याची नुसती कानउघाडणी करण्यानें आम्ही एक शत्रु उत्पन्न करून ठेवला असता. यापेक्षां त्याचा दुसरा कोणताहि परिणाम होण्याची शक्यता, शिक्षकाची बौद्धिक पातळी लक्षांत घेतां, आम्हांस दिसली नाहीं. म्हणून तो मार्गहि आम्ही स्वीकारला नाहीं. छात्रालय बंद करणें एवढेंच आमच्या हातीं उरलें!

५७.

## बेरडांचा गुरें चोरण्याचा बेरड धंदा व त्यावरील उपाय

बेरड समाजांतील आमच्या अशा प्रकारच्या अनेकविध कार्यामुळें आमचें व बेरडांचें नांव कायमचेंच लोकांनीं जोडून टाकलेलें होतें. बेरडांनीं कांहींहि केलें तरी 'तुमच्या बेरडांनीं हें काय केलें तें पहा! घ्या, आणखी थोडें त्यांना डोक्यावर घेऊन बसा. त्यांच्या पापकर्माकडे पाहूं नका! चांगलें कल्याण होईल!!' असें लोक उघड बोलत. लहान गुराखी पोरांच्या हातून गुरें हिसकावून किंवा शेतांत बांधलेलीं जनावरें सोडून पळवून न्यावयाचीं आणि प्रत्यक्ष खर्चाला म्हणून किंवा बक्षीस म्हणून कांहीं रक्कम मालकाकडून घ्यावयाची व ती सांडलेलीं (!) जनावरें शोधून द्यावयाचीं हा एक बेरडांचा शिष्ट धंदा आहे. याचा उपद्रव हुदलीगांवाला किंवा गंगाधररावांच्या रयतांना क्वचितच होत असे. या धंद्यांत नवीनच पदार्पण करणाऱ्या बेरड तरुणांनीं एकदां गंगाधररावांच्या मळ्यांतील विहिरीवरील मोटच चोरून नेली होती. गंगाधररावांनीं त्याची चौकशी बरेच दिवस केली नाहीं. शेवटीं बेरडांच्या एकदोन पुढाऱ्यांना बोलावून घेऊन 'आमच्या मळ्यातील मोट पळवून नेण्यापर्यंत बेरडांची धिटाई गेली आहे काय!' असें त्यांना विचारलें व 'हें बरें नव्हे!' एवढाच त्यांना इशारा दिला. लागलीच दोनतीन दिवसांतच ती मोट गंगाधररावांच्या विहिरीवर येऊन पडली होती. पण आतां हुदलीमधील रयतांचीं गुरेंहि हुडकून देण्याच्या नांवाखालीं पैसे उकळण्यास हलुहळू प्रारंभ झाला होता. गुरें फाडून तीं खाऊन चट्टामट्टा करण्याची कला बेरडाइतकी कोणालाच साधणार नाहीं. गुरांचीं हाडें, कातडीं, नखें, रक्त, मांस कशाचाहि मागमूस न लागूं देतां चोरलेलीं जनावरें खतम करणें हा बेरडांच्या हातचा मळ होता. या तक्रारी दिवसेंदिवस वाढूं लागल्या. 'आणखी चार दिवसानंतर पैसे देऊनहि गुरें मिळणार नाहींत' याचा अर्थच असा कीं तेवढ्या अवधींत तीं गुरें कापून फस्त केलीं जातील असें बजावण्यासारखें होतें. एकदां हुदलीमधील एक चांगलें जनावर याप्रकारें चोरीला गेलें. 'पुंडलीकजी-वडवींच्या बेरडबंधूंचेंच हें काम

एक छदामहि वेचीत नाहीं. तो त्याचा नित्याचा परिपाठच आहे! आणि मालक जर खरोखरीच मनाचा उदार असला तर त्याला कोरभर भाकरी किंवा जेवण तरी देऊन आपला मोठेपणा व्यक्त करीत असतो!

याच शिष्टपरंपरेचा फायदा घेऊन ती 'वाता पद्धती'च लोककल्याणाभिमुख करून वापरण्याचें आम्हीं ठरवलें. गांवांतील रयतांच्या सर्व खळ्यांवर जाऊन धान्य गोळा करावें, तें गरजू वेरडांना सवाईनें परत करण्याच्या अटीवर द्यावें, आणि अशा रीतीनें परत आलेलें धान्य 'ग्रेन बॅंक'मधें जमा करावें, धान्याची गंगाजळी ठेवावी, बेरड समाजाला जरुरीप्रमाणें तें धान्य वाटावें असा विचार आम्हीं केला. फुकट राबवायला कोणी कोणाच्या घरीं जाऊंच नये हें आमच्या श्रमदानाच्या धोरणांत बसण्यासारखें नव्हतें. तरी कोणी वेठबिगार करावी हेंहि आम्हाला पसंत नव्हतें. याच्या उलट सर्वांनीं सहकार्यानें आपापसांत जरूर तें श्रमदान खुषीनें मोफत करावें असेंच आमचें कामाचें धोरण असे. धान्याचा सांठा होईल तो खेड्यांतील पेवा-मधूनच ठेवला जात असे. ही योजना चांगल्या प्रकारें दोन तीन वर्षें चालू होती. प्रतिवर्षी धान्यामध्यें भरच पडत जात असे. या योजनेमुळें बेरड समाजाला व आम्हा सर्व कार्यकर्त्यांना मानसिक समाधान झालें. धान्यमापाच्या देवघेवींत आमच्याकडून प्रतारणा होणें कधींच शक्य नव्हतें. सर्व हिशेब आम्ही बेरड समाजांतील प्रमुखांना दाखवीत होतों व सर्व काम समजून सांगत होतों. तेवढ्यासाठीं आमच्या कोणत्याहि कामाच्या निमित्तानें कोणाहि बेरडाला श्रमदान देण्याचें कारण पडत नसे. अर्थातच आमच्या सार्वजनिक उपक्रमामध्यें आपल्या हातून होईल ती मदत पोहोंचविण्याची संधी बेरड समाज कधींच व्यर्थ जाऊं देत नसे.

अशा रीतीनें धान्य देऊन ते 'वातापद्धतीनें' सवाई घेण्याचा धंदा करणाऱ्या लोकांच्या हातचा एक धंदा—किफायतशीर धंदा—नाहींसाच झाला. त्यामुळें त्यांना असमाधान वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. याचा परिणाम म्हणून कांहीं लोकांची सहानुभूति आम्ही कांहीं काळ तरी गमावून बसलों. पण बेरडसमाज मात्र आमच्या अधिक जवळ आला आणि मोकळ्या मनानें वागूं लागला. एका बेरडानें तर मला विचारलें कीं 'अमूक तारखेदिवशीं सायंकाळीं व पहाटे मी आश्रमांत प्रार्थनेला उपस्थित होतों असें आपण कोर्टात सांगूं शकाल काय?' अर्थात् मी त्याला नकार दिला. अशा रीतीनें तुम्ही आमचा उपयोग कुकर्मी कधींच करून घेऊं शकणार नाहीं असें मी त्याला स्पष्ट बजावून सांगितलें. आमच्या वागणुकींतील ध्येय धोरण आतां बेरड लोकांनाहि कळून चुकलें होतें.

ही धान्य गंगाजळीची कल्पना व प्रथा स. १९४२ पर्यंत उत्तम रीतीनें अव्याहत चालली होती. कांही बेरडांना आपल्या धान्याचा सर्व हिशेब अगदीं मुखोद्गत होता. त्यांत त्यांनीं कधीं खोटेपणा केल्याचें उदाहरण घडलेलें नाहीं. दरोडा कसा घालतात, त्याला किती अवधानें संभाळावीं लागतात, त्याचीहि एक स्वतंत्र विचारसरणी असून

५८.

## वेरड समाजासाठीं धान्य गंगाजळी उर्फ ग्रेन बँक

चोरीला गेलेलीं जनावरें हुडकून काढण्याच्या निमित्तानें वेरड समाजाच्या राहणीचें व आर्थिक स्थितीचें दर्शन आम्हास झालें, त्यायोगें आमच्या विचारांना वरीच चालना मिळाली. त्यांच्यासाठीं कांहीं वेगळेंच कार्य करावयास हवें याची तीव्र जाणीव झाली. त्यांच्या अडचणी समजून घेण्याच्या उद्योगाला आम्ही मनोभावें लागलों. वेरड समाज पोटाची खळगी भरण्यासाठीं काय काय करतो व आपली दैनिक अडचण कशी निभाऊन नेत असेल त्याचा छडा लावण्याचा आम्हीं निर्धार केला. तेव्हां आम्हांला असें आढळून आलें कीं गांवांतील धनिक लोक या वेरड लोकांना उसनवार धान्य देऊन सुगीच्या दिवसांत त्याच्या सव्वापट धान्य त्यांच्याकडून परत घेतात. या पद्धतीस 'वाता' म्हणतात. वेरड समाजांतील लोक हे उसनवार दिलेलें धान्य कधींहि बुडवीत नाहींत. उसनवार घेतलेल्या धान्याच्या परतफेडीमध्यें प्रतारणा केल्यास आपल्यावर ईश्वराचा कोप होईल अशी त्यांची दृढभावना आहे. धान्य देणारे लोक धान्य मोजून देतांना व घेतांना आपल्या बुद्धीचा व ज्ञानाचा दुरुपयोग केल्याशिवाय राहात नाहीत. उसनवार धान्य नेताना जें माप असतें तेंच तें धान्य परत घेतांना पुढें केलें जात नाहीं. धान्य मापतांनाहि कलाकुसर होते. ही गोष्ट वेरड समाजला कळत नसते असें मात्र नाहीं. तेवढा हिशेब ते समजूं शकतात. त्याच्या अडचणीच्या वेळीं पाय धरायला हाच गाढव उपयोगी पडतो आणि या गरजवंताला तरी कुठें अक्कल असते? ज्यांच्याकडून हें उसनवार धान्य मिळतें त्यांच्या घरीं कांहीं शुभकार्य निघाल्यास हे वेठ बिगारी म्हणून राबावयाला हजर आहेतच! एरवीसुद्धां आपल्या मालकांकडे हे कधीं गेले तर जातांना रिक्त हातानें जाणार नाहींत. एखादी लाकडाची मोळी, निदान दोन पेंड्या पालेभाजी तरी नेतीलच. घरीं गेल्यावर आपल्या शारीरिक श्रमाचा होईल तेवढा फायदा त्या 'वातावाल्या' धन्याला देतील. मालकहि जणुं तो आपला हक्कच आहे असा वागतो, त्याच्याकडून काम करवून घेतो व त्यानें आणलेल्या मालाबद्दल किंवा त्याच्या श्रमाबद्दल

एक छदामहि वेचीत नाहीं. तो त्याचा नित्याचा परिपाठच आहे! आणि मालक जर खरोखरीच मनाचा उदार असला तर त्याला कोरभर भाकरी किंवा जेवण तरी देऊन आपला मोठेपणा व्यक्त करीत असतो!

याच शिष्टपरंपरेचा फायदा घेऊन ती 'वाता पद्धती'च लोककल्याणाभिमुख करून वापरण्याचें आम्हीं ठरवलें. गांवांतील रयतांच्या सर्व खळ्यांवर जाऊन धान्य गोळा करावें, तें गरजू वेरडांना सवाईनें परत करण्याच्या अटीवर द्यावें, आणि अशा रीतीनें परत आलेलें धान्य 'ग्रेन बँक'मधें जमा करावें, धान्याची गंगाजळी ठेवावी, बेरड समाजाला जरुरीप्रमाणें तें धान्य वाटावें असा विचार आम्हीं केला. फुकट राबवायला कोणी कोणाच्या घरीं जाऊंच नये हें आमच्या श्रमदानाच्या धोरणांत बसण्यासारखें नव्हतें. तरी कोणी वेठबिगार करावी हेंहि आम्हाला पसंत नव्हतें. याच्या उलट सर्वांनीं सहकार्यानें आपापसांत जरूर तें श्रमदान खुषीनें मोफत करावें असेंच आमचें कामाचें धोरण असे. धान्याचा सांठा होईल तो खेड्यांतील पेवा-मधूनच ठेवला जात असे. ही योजना चांगल्या प्रकारें दोन तीन वर्षें चालू होती. प्रतिवर्षी धान्यामध्यें भरच पडत जात असे. या योजनेमुळें बेरड समाजाला व आम्हा सर्व कार्यकर्त्यांना मानसिक समाधान झालें. धान्यमापाच्या देवघेवींत आमच्याकडून प्रतारणा होणें कधींच शक्य नव्हतें. सर्व हिशेब आम्ही बेरड समाजांतील प्रमुखांना दाखवींत होतों व सर्व काम समजून सांगत होतों. तेवढ्यासाठीं आमच्या कोणत्याहि कामाच्या निमित्तानें कोणाहि बेरडाला श्रमदान देण्याचें कारण पडत नसे. अर्थातच आमच्या सार्वजनिक उपक्रमामध्यें आपल्या हातून होईल ती मदत पोहोंचविण्याची संधी बेरड समाज कधींच व्यर्थ जाऊं देत नसे.

अशा रीतीनें धान्य देऊन ते 'वातापद्धतीनें' सवाई घेण्याचा धंदा करणाऱ्या लोकांच्या हातचा एक धंदा—किफायतशीर धंदा—नाहींसाच झाला. त्यामुळें त्यांना असमाधान वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. याचा परिणाम म्हणून कांहीं लोकांची सहानुभूति आम्ही कांहीं काळ तरी गमावून बसलों. पण बेरडसमाज मात्र आमच्या अधिक जवळ आला आणि मोकळ्या मनानें वागूं लागला. एका बेरडानें तर मला विचारलें कीं 'अमूक तारखेदिवशीं सायंकाळीं व पहांटे मी आश्रमांत प्रार्थनेला उपस्थित होतों असें आपण कोर्टांत सांगूं शकाल काय?' अर्थात् मी त्याला नकार दिला. अशा रीतीनें तुम्ही आमचा उपयोग कुकर्मी कधींच करून घेऊं शकणार नाहीं असें मी त्याला स्पष्ट बजावून सांगितलें. आमच्या वागणुकींतील ध्येय धोरण आतां बेरड लोकांनाहि कळून चुकलें होतें.

ही धान्य गंगाजळीची कल्पना व प्रथा स. १९४२ पर्यंत उत्तम रीतीनें अव्याहत चाललेली होती. कांहीं बेरडांना आपल्या धान्याचा सर्व हिशेब अगदीं मुखोद्गत होता. त्यांत त्यांनीं कधीं खोटेपणा केल्याचें उदाहरण घडलेलें नाहीं. दरोडा कसा घालावा, त्याला किती अवधानें संभाळावीं लागतात, त्याचीहि एक स्वतंत्र विचारसरणी असून

ती कशी कार्यान्वित करतात वगैरे सर्व गोष्टी ते आम्हांला सांगत असत. वेरडांनी आपल्या तोंडून काहीं गोष्टी सांगितल्या नाहीत तर त्या कोणालाच कळणार नाहींत. तर्कानें त्या गोष्टीचा अंदाजहि करतां येण्यासारखा नसतो. खरी वस्तुस्थिति डोळ्यापुढें ठेवूनच त्यांनीं आपलें नीतिशास्त्र बनवलेलें असते. त्यांत शंभर टक्के व्यवहार्यता भरलेली असते. मार, मेहनत आणि मरण यांची तमा वेरड कधींच बाळगत नाहीं. उपवासाला तो डरणार नाहीं. मिळेल तेव्हा भगदीं पोटभर खातांना तो कधीं कसूर करणार नाहीं. दिलेलें वचन तो कधींच मोडणार नाहीं. ज्याला त्यानें एकदां आपला म्हटलें त्याला अंतर देणार नाहीं. त्यासाठीं स्वतःचा जीव धोक्यांत घालण्याचा प्रसंग आला तरी आपला पाय मागें घेणार नाहीं. जिवलग प्रामाणिक मित्र आणि अत्यंत कडवा शत्रु असा त्याचा पिंड आहे. दूरवर विचार करण्याची शक्तीहि त्याच्यामध्यें आहे. देशांतील हेरखात्याला या समाजाचा फार चांगला उपयोग करून घेतां येण्यासारखा आहे. मात्र त्याला तसें शिक्षण देऊन त्याला तयार केलें पाहिजे. वेरडाच्या स्वभावांतील ही खुबी आम्हांला या धान्यगंगाजळीच्या प्रयोगानेंच पहावयास मिळालेली आहे. अशा तऱ्हेची धान्यगंगाजळी सरकार त्याच्यासाठीं काढील तर त्यांना तें सहज आपलेसे करून घेऊं शकेल. कोणत्याहि चळवळींशीं या धान्यगंगाजळीचा संपर्क स. १९४२ च्या 'चलेजाव' आंदोलनापर्यंत आम्ही येऊं दिलेला नव्हता. पण बेचाळीसच्या चळवळींत आम्हा कार्यकर्त्यांना भूमिगत व्हावें लागल्यानंतर या प्रेमबँकेंतील धान्य त्या वेरड समाजाला वांटून द्यावें लागलें व आमची गंगाजळी संपली. तो प्रसंगहि यथास्थान या पुस्तिकेमध्यें निवेदला जाईल.

## ५९.

## गांवांतील चहा जप्ती : संघटना कां मोडली ?

महात्मा गांधीजींनीं एकदां चहाच्या विरुद्ध मोहीम काढलेली होती. चहाच्या विरुद्ध 'पिकेटिंग'चाहि अवलंब करण्यांत आला होता. दारूचा त्याग करणें एका अर्थी सोपें आहे पण चहा सोडणें विवेकें सोपें नाहीं. कारण चहाला समाजांत प्रतिष्ठा मिळालेली आहे. मोठमोठे लोक चहा पितात, आमच्या सोवळ्यामध्येंहि चहा चालूं शकतो, धार्मिक वृत्तीचे लोकहि उपवासाला चहा वर्ज्य करीत नाहींत. दारूप्रमाणें चहा अप्रतिष्ठ गणलेला नाहीं. दुधासाखरेनें त्याला गोडी आणलेली असते शिवाय अत्यंत माफक प्रमाणांत चहा उत्तेजकहि आहे. त्यामुळें चहाची चट सहजासहजीं सुटणें अवघड आहे. म्हणून त्याविरुद्ध निरोधनाचा उपाय गांधीजींनीं सुचवला होता. चहाच्या मळ्यामुळें होणारा फायदा व उत्पन्न इंग्रजी मालकाच्या पदरीं पडत असे, तो भारतीय पैशाचा ओघ थोडातरी थांबावा हाहि त्यात एक हेतु होताच.

हुदली गांवामध्यें त्या काळीं चहाचें वेड इतकें माजलेलें नव्हतें. गांवांत एकहि चहाचें व फराळाचें दुकान तेव्हां नव्हतें. एकच मनुष्य आपल्या घरीं लोकांना घोंगड्यावर बसवून तयार केलेला चहा विकीत असे. एक पैशाला एक कप चहा मिळत असे. आतां त्याच हुदलीगांवीं टेबलखुर्च्यांवर बसवून चहा पाजणारीं शहरी पद्धतीचीं कितीतरी दुकानें झालेलीं आहेत. गांवांत सर्व किराणी दुकानांतून आतां चहाची पूड विकत मिळते, पण त्यावेळीं एक–दोन–तीन कप चहा होईल एवढी चहाची पूड व त्याला लागणारी साखर एकत्र मिसळून तेवढ्या तेवढ्या सुट्या पुड्या बांधले-ल्याच मिळत. गांवांतील ही सर्व पूड जप्त करून ठेवावी असें आम्हीं ठरविलें. त्यासाठीं लागणारें वातावरण उत्पन्न करण्याच्या उद्यमतीला आम्ही प्रारंभ केला. त्याकाळीं गांवांतील लोकांना चहाचा खर्च अगदीं अनाठायीं आहे असेंच वाटत होतें. आम्ही या कामासाठीं गांवांतील प्रतिष्ठित लोकांची एक समिति नियुक्त केली. खेड्यांमधील लोकरित्यादि निमित्तानें समिति बनविल्यास, त्यांत गांवांतील बहुतेक प्रतिष्ठित लोक

असावयाचेच! कोणत्याहि समितीचे सभासद निदान पन्नास साठ तरी असायचेच. आमच्या चहाप्रतिबंधक समितीचीहि तीच गत होती. या समितीकडून काम करवून घेण्याची काळजी गांवांतील 'तरुण संघ' व आम्ही सर्व कार्यकर्ते घेत होतोंच.

चहाची जप्ती होणारच असें कळल्यामुळें गांवांतील सर्व दुकानांमध्यें त्या आठवड्यांत अधिक चहा विकला गेला. किराणा मालाच्या सर्व दुकानांतील सर्व चहाची पूड आम्हीं जप्त केली, म्हणजे आमच्या ताब्यांत घेतली. या गोष्टीस कोणीहि विरोध केला नाहीं. केवळ एका दुकानदारानें 'मी चहा विकणार नाहीं, माझ्या दुकानांतील चहाला सील करून जा. पण मी तो चहाचा सांठा माझ्या दुकानांतून हलवूं देणार नाहीं.' असें उत्तर दिलें होतें. त्या दुकानदाराच्याच चिरंजिवानें राकेल तेलाच्या दोन बाटल्या तेल आपल्याच दुकानांतील चहामध्यें ओतून टाकलें होतें. त्या व्यापाऱ्यानेंहि कधीं चोरून चहा विकण्याचा प्रयत्न न केल्यामुळें, त्याला देखील ही गोष्ट कळून आली नव्हती. सर्व दुकानांतील ही चहाची पूडच आम्ही ताब्यांत घेतल्यानंतर असें दिसून आलें कीं हा गांवांतील दुकानांतील चहा पाच हजार रुपये किंमतीचा होता. एवढ्याशा गांवांत इतका चहा असेल याची कल्पना देखील आम्हांस किंवा लोकांनाहि नव्हती. ही चहाची पूड वेगवेगळी बंद करवून त्यावर त्यांच्या त्यांच्या नांवाच्या चिठ्या लावण्यांत आल्या व त्या सर्व एकत्रित गठ्ठयावरहि मोहोर करण्यांत आली. हा चहा थोडा थोडा परत मागण्याचा मोह व्यापाऱ्यांस होण्याचा संभव आहे. समितीच्या सभासदांवरहि दडपण आणून, भीड घालून चहा परत मिळवण्याचा संभव आहे हें जाणून 'चहा प्रतिबंधक समितीनें' असा निर्णय घेतला कीं ही सर्व जप्त चहाची पूड बेळगांवांत कै. गु. गंगाधरराव देशपांडे यांच्या घरीं नेऊन ठेवावी. त्या निर्णयाप्रमाणें लागलीच तसें करण्यांतहि आलें. बैलगाड्यांनीं त्या जप्त सीलबंद चहाचे पेटारे बेळगांवास गंगाधररावांच्या घरीं पोहोंचविण्यांत आले. ज्या घरीं जेवढा चहा आज शिल्लक असेल तो त्यांनीं पिऊंच नये हें उत्तम. पण तो कोणी पिऊनच संपविल्याचें उघडकीस आलें तर तें कृत्य उपेक्षणीय मानण्याचें ठरलें. आपापल्या घरीं असलेली चहाची पूड राखून म्हणजे अगदीं जरूर तेव्हांच लोक वापरीत असत. गांवांत या उपक्रमाविषयीं अनुकूल प्रतिकूल चर्चा चालूच होती. 'झालें तें चांगलें झालें. एकदांचा चहा गेला तें बरें झालें! असें कांहींवरी केल्याखेरीज हा चहा गेलाच नसता व लोकांचा अनाठायीं होणारा खर्चहि त्यामुळें कमी झाला.' असेंच लोकमत होतें. ही बातमीसुद्धां कांहीं कानडी वर्तमानपत्रांमधून एक मौज, एक चूप म्हणूनच देण्यांत आली होती व त्याच कुतूहलानें ती वाचली गेली होती.

हा प्रयोग पाहण्यास बेळगांवांतील कांहीं लोकहि येऊन गेले. एकदां श्री. जीवनराव याळगींनीं हा चहाबंदीचा प्रयोग पाहण्यासाठीं हुदलीस भेट दिली होती. त्यांना गांवांत कोणाच्याहि घरीं एक पेलाभर चहा मिळाला नाहीं. याला कारण आम्ही सतत

त्यांच्याबरोबर होतों हेंहि असूं शकेल. पण गांवांत त्यांना चहा मिळाला नाहीं एवढें खरें! ते परत जाण्यासाठीं बेळगांवची गाडी गांठावी म्हणून निघाले. साहजिकच या नवलपूर्ण प्रयोगाविषयीं गप्पा मारीत मारीत आम्ही १०।१५ जण स्टेशनपर्यंत जाण्यास त्यांच्याबरोबर निघालों. बेळगांवहून आलेल्या गाडीनें कांहीं लोक स्टेशनवरून हुदली गांवाकडे येत होते, त्यांत 'चहा प्रतिबंधक समीतीचे अध्यक्ष'हि होते. त्यांना पहातांच कोणीतरी थट्टेनें म्हटलें 'आपल्या हातांतील त्या पिशवीमधून बेळगांवहून चहाची पूड तर आणली नाहींत ना!' ते खादस होते. त्यांना ती थट्टा खपली नाहीं. त्यांना त्या प्रश्नाचा राग आला. त्यांनीं बेळगांवांत चहा विकत घेतलेलाच नव्हता. मग कर नाहीं त्याला डर कसली! त्यांनीं हातांतील पिशवी रस्त्यावरच खाली ठेवली. 'आतां प्रश्नच उपस्थित झालेला आहे, तेव्हां ध्याच एकदां झडती! म्हणजे चहा-प्रतिबंधक समितीचे अध्यक्ष असलें कृष्णकृत्य करणारे नाहींत एवढी लोकांची खात्री तरी होईल!' त्यांच्या या अवतारावरून पिशवींत आक्षेपार्ह वस्तू नाहीं असें भोंवतालच्या लोकांना वाटलें. त्यांनीं झडती घेण्याचें साफ नाकारलें व हा हट्ट अथवा आग्रह त्यांनीं धरूं नये असें परोपरीनें त्यांना सांगितलें. कोणास तुमच्या संशय नाहीं, लोकांचा आपल्यावर पूर्ण भरंवसा आहे, हा केवळ विनोद आहे, असें आर्जवून सांगितलें. असे जों जों आम्ही तो प्रसंग टाळूं पहात होतों तों तों त्या कृत्यानें त्यांना अधिकाधिक चेव येत गेला. त्यांनीं चहा आणलेलाच नव्हता. आपल्या खरेपणा-विषयींची खात्री पटवून देण्याचा ही चालून आलेली संधी चहाप्रतिबंधक समितीचे अध्यक्षहि घालवण्यास तयार नव्हते. त्यांनीं पिशवीची झडती घेतल्याखेरीज पुढें कोणास जाऊंच द्यायचें नाहीं असें ठरविलें. लोकांचा नाइलाजच झाला. आमचें ध्यान गाडीला जाणाऱ्या लोकांची गाडी चुकूं नये या गोष्टीकडे होतें. या गडबडीमुळें निरुपायानें पिशवीची झडती घ्यावयाचें ठरलें. तेवढ्यांत स्टेशनवरून येणाऱ्या आणि स्टेशनकडे जाणाऱ्या लोकांचीहि गर्दी जमली. त्या आमजनतेपुढें पिशवीची झडती घेण्याचा तो सोहळा करावा लागला. गारुड्याच्या पोतडीप्रमाणें एकेक वस्तु बाहेर काढावयाची, पहावयाची नि बाजूला ठेवावयाची हा क्रम सुरू झाला. भाजीची पेंडी काढली, हलवली व ठेवून दिली. कोथिंबीर काढली, आलें आलें, लिंबू आलें, आणखी लहान घरगुती जिनसांच्या पुड्या निघाल्या. त्या उघडून पाहिल्या पण कशांतच चहा निघाला नाहीं. लोक गमत पाहून हंसत होते व त्या त्या वस्तूबरोबर थट्टाविनोदहि होत असे. 'आतां पुरे हो. जाऊं द्या त्यांना आणि आम्हाला पण!' असें लोक म्हणूं लागले. आम्ही आमचा हात आवरता घेतला पण पिशवीच्या मालकानें खसकन ती पिशवीच आमच्या हातांतून काढून घेतली आणि ती रस्त्यावरच पालथी केली. त्यांतून कादे बटाटे गडगडून पळूं लागले. एवढ्यांत एक पिल्लू त्यांतून बाहेर पडलें. ती अगदीं तळाला ठेवलेली घरगुती बांधणीची एक लहानशी पुडी होती. लोकांनीं मालकाचा हात धरून त्याची पिशवी भरण्यास सुरवात केली.

त्यांच्यावरचा विश्वास बोलून दाखवला. तेवढ्या झटापटींत एक वात्रट म्हणालाच 'आतां इतकें झालेंच आहे! राहातां राहिली तेवढीच एक पुरचुंडी. तेवढीहि पाहून टाका म्हणजे तुमचेंहि काम झालें आणि मालकाचेंहि समाधान झालें!'

बेळगांवांतील त्यांच्या नातलगांपैकीं कोणीतरी एका वर्तमानपत्रामध्यें तब्बल तीन पौंड चहा बांधून त्यावर एक मकम फडकें लपेटलेलें होतें. ही गोष्ट त्या अध्यक्षांना माहीत नव्हती. त्यांना तें समजलें असतें तर त्यांनीं ही शोभा होऊंच दिली नसती. हा उपद्यापहि केला नसता. त्यांच्या परोक्ष हें झालेलें असल्यामुळेंच पिशवीची झडती घेण्याचा आग्रह इतक्या निर्भयपणें त्यांनीं धरलेला होता हें उघड आहे. चहाचा वास लपून राहात नाहीं. पिशवीमध्यें तळाला असलेलें तें कापडांत गुंडाळलेलें पुडकें प्रत्यक्ष सोडून पाहण्याची आवश्यकताहि नव्हती. पण खुद्द अध्यक्षांनींच तें पुडकें सोडलें. मालकाचें तोंड खरकन उतरलें. त्यांनीं तो सर्व चहा रस्ताभर उधळून दिला. 'मला याची कांहींच कल्पना नाहीं— नव्हती' असें पुटपुटत त्यांनीं आपलें तोंड चिमणें केलें, आणि खालीं मान घालून ते गप्प उभे राहिले. गाडीला जाणारे लोक गाडीच्या ओढीनें निघून गेले. आणि गांवकऱ्यांनीं गांवचा रस्ता धरला. लोक दूर गेल्यावर अध्यक्षांनीं आपल्या पिशवींत भाजी भरली. इतर जिनसाच्या एकदोन पुड्या होत्या त्या घेतल्या आणि ते एकटेच घरीं निघाले.

गांवांत सर्वांच्या तोंडीं हाच एक विषय होऊन बसला होता. पिशवीच्या तळाशीं चहाची पूड पुडक्यांत घालून पाठविणाऱ्या स्त्रीला आपण केलें काय व झालें काय याची कल्पनाहि नव्हती. 'चहाप्रतिबंधक समितीची' सभा घेण्यांत आली. 'समिति व समितीचे अध्यक्षच असे करूं लागल्यास हा बहिष्कार यशस्वी होणार कसा?' असें गांवांतील व्यापारी म्हणूं लागले. पुष्कळांनीं आपापली चहाची पूड परत मागण्याचा घोशाच घेतला. समितीमध्येंहि दुमत झालें. शेवटीं ज्याचा माल त्यानें आपापल्या अन्य मालाबरोबर बेळगांवहून परत आणावा आणि हा प्रयोग केवळ प्रचारावर व लोकशिक्षणावरच अवलंबून ठेवावा, असा समितीनें निर्णय घेतला. चहा पिण्याच्या बाजूनें लोक व व्यापारी अध्यक्षांना व त्यांच्या पिशवींत चहा बांधून पाठविणाऱ्या महिलेला धन्यवाद देत आणि चहापानविरोधी व या चळवळीचे पुरस्कर्ते अध्यक्षांना दोष देत होते. स्वतः अध्यक्ष निर्दोषी व निष्पाप असूनहि त्यांना सर्व कांहीं ऐकून घेणें व सहन करणें प्राप्तच होतें. वर वा शाप दोन्हीलाहि त्यांच्या ठिकाणीं जागा नव्हती. ही सर्व गडबड दोन महिनेपर्यंत चालली होती. या घटनेनंतर चहाच्या विक्रीला दुकानांत एकप्रकारें उधाणच आलें. स्वतःकडे कांहीहि दोष नसतांना अध्यक्षांना गांवांत फिरणें सुद्धां कांहीं काळ अत्यंत मुष्किलीचें झालें होतें. त्या चहाची पूड ज्याची त्यांनीं बेळगांवांतून गंगाधररावांच्या घरून परत आणली.

मुंबईमधील चहावरील निरोधनहि अशाच कांहीं कारणानें त्यावेळीं आवरतें घ्यावें लागलें होतें. हा चहाबंदीचा प्रयोग आम्ही हुदलीमध्यें चालवीत होतों तोंपर्यंत

कै. गु. गंगाधररावांनीं हुदलीगांवांत कधींहि चहा घेतला नाहीं. एकदोन वेळां तर चहाच्यावेळीं लिंबू पिळून ऊन पाणीच त्यांनीं हुदलीमध्यें घेतलेलें आहे. या चहाबंदीविषयीं आपलें मत त्यांनीं कधींच जाहीर केलेलें नाहीं. कोणीं विचारलेंच तर उत्तर देण्याचें त्यांनीं टाळलें आहे. हा प्रयोग संपून गेल्यानंतर मात्र एकदां गंगाधरराव म्हणाले होते 'हें असें होणार ही गोष्ट ठरल्यासारखीच होती. दोन महिने तरी हें चालू राहिलें हेंच आश्चर्य आहे!'

६०.

## प्लेगची साथ आणि जनसेवा (स. १९३८)

गांवामध्यें प्लेगची साथ सुरू झाली. प्लेगची लस टोचून घेतल्याचा परिणामहि विशेष उपयोगीं पडेल असें अनुभवास येईना. म्हणून गांवांतील सर्व लोकांनीं गांव सोडून बाहेर आपापल्या शेतांत झोपडया बांधून रहावें असें गांवपंचांनीं ठरविलें. मध्यम स्थितींतील बहुतेक सर्व कुटुंबें गांवाबाहेर झोपडीमध्यें राहावयास गेलीं. तेथेंहि कांहीं लोकांना प्लेगनें गांठलेंच होतें. गरीब व असहाय लोक गांवामध्यें आपापल्या घरांतूनच होते. प्लेगच्या रोग्यांना औषधें पोहोंचविणें, प्लेगच्या गाठींना प्रत्यक्ष औषध व लेप लावणें हीं कामेंहि श्री. वडवी व अन्य कित्येक कार्यकर्त्यांनीं केलेलीं आहेत. आश्रमाची व कार्यकर्त्यांची खरी किंमत व आवश्यकता त्यावेळीं लोकांना कळून आली. श्री. वडवी व इतर कार्यकर्त्यांनीं जी निर्भयता दाखविली ती वाखणण्याजोगी आहे. बाहेरगांवाहून जे कार्यकर्ते आश्रमांत शिक्षण घेण्यासाठीं आले होते त्यांना परत त्यांच्या त्यांच्या गांवीं पाठवून देण्यांत आलें. गांवांतील आमच्या ताब्यांत असलेलीं घरें लोकांना त्यांच्या आवश्यकतेनुसार वापरण्यास देण्यात आलीं, हें वेगळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. प्लेगमधील जनसेवेनें लोकांच्या निदर्शनास एक गोष्ट आली कीं गांवांतील सर्वच प्रवृत्ति केवळ लोकसेवेच्या पवित्र हेतूनेंच या कार्यकर्त्यांनीं सुरू केल्या, वाढविल्या व चालू ठेवल्या आहेत. यामुळें गांवांतील सर्व जातींत कित्येक कुटुंबांशीं कार्यकर्त्यांचा घनिष्ट संबंध आला व घरोबा उत्पन्न झाला.

ही प्लेगमधील जनसेवा सुमारें चार महिनेपर्यंत चालू होती. या सेवेची सर्व जबाबदारी व श्रेय श्री. वडवी यांचेंच मुख्यतः आहे. गांवांतील कांहीं तरुणहि त्यांच्याबरोबर काम करीत असत. या रोगावरील औषधें व उपचार सर्वांना माहीत झाले असल्यामुळें प्रत्यक्ष डॉक्टरांची मदत क्वचित् प्रसंगींच घ्यावी लागे. आश्रमाशीं परिचित असलेले कांहीं डॉक्टर मोफत सेवा देण्यास तयारच असत. पण तसा त्रास त्यांना फारसा पडलेला नाहीं. या कामीं पाच्छापूरचे डॉ. जोशी यांची फार मदत झालेली आहे.

६१.

## हुदलीची ग्रामपंचायत स्थापना (स. १९४०).

अनेक कार्यक्रमांच्या गडबडीमध्यें आणि स्वातंत्र्यआंदोलनाच्या धुमश्चक्रीमध्यें हुदलींत ग्रामपंचायतीची स्थापना करण्यांत आली. आमच्याशीं संबंध आलेल्या कार्यकर्त्यांनीं ग्रामपंचायतीमध्यें शिरून निवडून येऊन कार्य करण्यापेक्षां बाहेर राहूनच आजपर्यंत जसें कार्य व सेवा करीत होतों तसेंच कार्य करीत राहावें असा निर्णय घेण्यांत आला. याचा परिणाम गांवांतील लोकांवर चांगला झाला. नाहींतर त्या काळांत आम्हाला किंवा आमच्याबरोबर काम करीत असलेल्या इतर कार्यकर्त्यांना ग्रामपंचायतींत निवडून येणें अगदीं सहज होतें. गांवांतील पंच (देव) सांगतील किंवा ठरवतील त्याप्रमाणें ग्रामपंचायतींच्या निवडणुकी किंवा कामें चालत असत. पुढें कांहीं कालानंतर गांवांतील कित्येक लोक स्वतंत्रपणें निवडणुकीस उभे राहूं लागले होते. गांवांत व्यक्तीव्यक्तीमध्येंच चुरस व पक्षबाजी सुरू झाली. आम्ही आश्रमांतील कार्यकर्ते मात्र या गटबाजीपासून अगदीं बाजूला राहिलों होतों. असल्या निवडणुकीच्या कामांत हे आश्रमीय कार्यकर्ते कधींच पडत नाहींत अशी सर्वांची खात्री झालेली होती. गु. गंगाधररावाच्या आज्ञेप्रमाणेंच हें धोरण ठरविण्यांत आलें होतें. खुद्द गंगाधरराव मात्र या निवडणूकीच्या बाबतींत जरूर पडेल तेव्हां सल्लामसलत देत असत. निवडणूकीच्या आठवड्यामध्यें ते मुद्दाम हुदलीमध्यें म्हणजे कुमरीच्या मध्यांतील आश्रमांत येऊन राहात असत. निवडणुकीच्या या चर्चा गांवांतील लोकांशीं चालू असतांना आम्ही कोणी ऐकत उभे राहिलेले त्यांना खपत नसे. 'तुम्ही आपापल्या उद्योगाला जा. हें तुमचें काम नव्हे.' असें बोलून आम्हांला तेथून पिटाळण्यांत येत असे. ग्रामपंचायतीकडून जनसेवा होण्यापेक्षां गांवांतील पक्षबाजी व बेबनाव यांच्या वाढीलाच ग्रामपंचायतीच्या निवडणुकी अधिकाधिक कारणीभूत होऊं लागल्या. त्यामुळें गांवातील जनसेवेचें कार्य तात्पुरतें मागें पडत चाललें. गांवामध्यें मतल्याच लोकांना अवास्तव महत्व चढलें. त्यामुळें अलीकडे गंगाधररावहि त्यांत प्रत्यक्षरीतीनें लक्ष घालीत नसत, किंवा त्याची विचारपूसहि करीत नसत.

## ६२.

## जमनालाल बजाज विद्यालयाची स्थापना. स. १९४१

गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्यासाठीं कार्यकर्ते त
करण्याच्या हेतूनें 'जमनालाल बजाज विद्यालय' या संस्थे
स्थापना करण्यात आलेली होती. या विद्यालयांत एकंदर
विद्यार्थ्यांना दाखल करून घेण्यांत आलें होतें. बहुतेक विद्यार्थी कर्नाटकांतीलच हे
कर्नाटकांतून दोन तरुण गांधीवाद व खादीची प्रक्रिया शिकण्यासाठीं व यांस गेले हे
आठपंधरा दिवस ते दोन विद्यार्थी सेवाग्रामांत होते. त्यांना सेवाग्रामांतील अधि
त्यांनीं हुदलीस परत पाठवून दिलें. नीलकंठय्या स्वामी व चि. पी. वी. पाटील हे
ते दोन विद्यार्थी होते. आमच्या या विद्यालयांत रोज पहांटे चार वाजतां प्रार्थ
झाल्यानंतर Thought for the day म्हणून गांधीजींचें एक सूत्रवाक्य, त्य
कानडी व हिंदी भाषांतर करून, विद्यार्थ्यांना दिलें जात असे. रोज एक वा
शोधून काढल्याशिवाय मी झोंपतच नसे. या गांधीबोधवचनाशिवाय गांधी
किशोरलालजी, काकासाहेब कालेलकर याचे निवडक लेख रोजच्या सायंप्रार्थनेनं
समजावून सांगण्यांत येत असत. या विद्यालयातील बहुतेक विद्यार्थी कोणत्या
कोणत्या तरी विधायक कार्यामध्यें कायमचे काम करीत राहिलेले आहेत व स्वातंत्र्या
प्रत्येक आंदोलनामध्यें त्यांनीं भाग घेतला आहे. या विद्यालयामध्यें जे विद्यार्थी शिक्ष
घेण्यासाठीं जमलेले होते त्यापैकीं नीलकंठय्या स्वामींचा आमच्याशीं घनिष्ट संबंध उत्प
झाला. एवढेंच नव्हे तर हुदली गांवाशींच त्यांचें एक प्रकारचें नातें उत्पन्न झा
गावांतील कांहीं तरुण त्यांच्याकडेच आकर्षित झाले व आमच्यापेक्षां अधिक नि
त्यांच्याकडे मार्गदर्शनार्थ पाहूं लागले. आम्हांला त्याचें वैषम्य तर वाटलें नाहींच प
उलट आनंदच झाला. गांवांतील कार्यकर्त्यांना एखादी गोष्ट समजून सांगण्यास आम
नीलकंठय्यास्वामीचाहि उपयोग करूं लागलों. आम्ही त्यांत कमीपणा मानला नाह
नीलकंठय्यास्वामी विशेष शिकलेले आहेत असे नाहीं. त्यांची स्वाभाविक विच
करण्याची पद्धतीच गांधीजी, किशोरलालजी किंवा काकासाहेब कालेलकर यांच

पद्धतीशीं मिळती जुळती आहे. बैलहोंगल, रामदुर्ग, सुरेभान या भागांत त्यांनीं आपल्या जीवन जगण्याच्या पद्धतीनें व विचार करण्याच्या स्वाभाविक हातोटीनें जनमानसांत बदल घडवून आणलेला आहे. ते जातील तेथें त्यांनीं कांहीं तरुण आपल्या नादीं लावून घेतलेले आहेत. अशा कांहीं तरुणांपैकीं चि. श्रीपाद नवले व बी. व्ही. पाटील हे दोघे आमच्या संपर्कामध्यें आले. श्रीपाद नवले हा विद्यार्थी मला विशेष हुषार वाटला. म्हणून मी त्याला सेवाग्राममध्यें श्री. नरहरभाई परेख यांच्याकडे पाठवून दिलें. सेवाग्राममधील संस्कार घेऊन चि. नवले परत आल्यानंतर पुनः कॉलेजमध्यें जाऊन त्यानें आपलें शिक्षण पुरें केलें. ते बी. ए., बी. टी. झाले. आज चि. नवले नीलकंठय्यास्वामी यांच्या मार्गदर्शनाखालीं सुरेभान गांवीं एक हायस्कूल चालवीत असून त्यांच्या त्या 'नवभारत हायस्कूल'च्या दोन शाखा अन्य गांवीं निघालेल्या आहेत, व त्याहि चांगल्या वाढीला लागलेल्या आहेत.

गांधीतत्त्वज्ञानाचा अभ्यास 'जमनालाल बजाज विद्यालयांत' संपूर्ण झाल्यानंतर त्या विद्यार्थ्यांची लेखी परीक्षा झाली. प्रश्नपत्रिका हिंदीमध्यें व उत्तरपत्रिका हिंदी किंवा कानडीमध्येंच असल्यामुळें श्री. किशोरलालजी मश्रूवाला यानाच परीक्षक नेमण्यांत आलें होतें. किशोरलालजींना कानडी लिहितांवाचतां येत नव्हतें पण कोणी वाचून दाखविल्यास तें तेवढें कानडी नीट समजूं शकत होतें. त्यांनीं दोनतीन विद्यार्थ्यांशिवाय सर्वांना परीक्षेमध्यें पास केलें होतें. परीक्षेचा निर्णय उत्तरपत्रिकांसह माझ्याकडे पाठवितांना श्री. किशोरलालजी मला लिहितात, 'या परीक्षेमध्यें मी पास होईनच अशी खात्री मला देतां येत नाहीं. प्रश्न इतके कठीण आहेत, तथापि सर्वच विद्यार्थ्यांनीं उत्तरपत्रिका इतक्या उत्तम लिहिलेल्या आहेत कीं त्यांनीं गांधीजींची विचारसरणी नीट समजून घेतलेली दिसते." या परीक्षेमध्यें नीलकंठय्या स्वामी यांचा पहिला नंबर आलेला होता. स. १९४१ सालीं गांधीजींनीं वैयक्तिक सत्याग्रहाचें आंदोलन सुरू केल्यामुळें हें 'जमनालाल बजाज विद्यालय' बंद करावें लागलें. तें पुनः सुरू करण्यास सवडच लाभूं शकली नाहीं.

६३.

## स. १९४१ चें वैयक्तिक सत्याग्रह आंदोलन

स्वातंत्र्याच्या आंदोलनांतील वैयक्तिक सत्याग्रहाचें पर्व सुरू झालें. गांधीजींनीं पहिले सत्याग्रही म्हणून विनोबाजींची निवडणूक केली. तेव्हां पहिल्या सत्याग्रहींचा परिचय व योग्यता गांधीजींनीं 'हरिजन'मधून विशद केली होती. वैयक्तिक सत्याग्रहामध्यें भाग घेण्यासाठीं गुणाला महत्त्व असावें कीं संख्येला महत्त्व असावें, हा वाद आम्हा आश्रमाशीं संबद्ध अशा कार्यकर्त्यांमध्यें चालू झाला. सत्याग्रहींच्या संख्येपेक्षां त्यांच्या गुणाला महत्त्व द्यावें असें कांहींना वाटत होतें, आणि सर्व जिल्ह्यांपेक्षां आमच्या बेळगांव जिल्ह्यांतून अधिक संख्येनें सत्याग्रही तुरुंगांत गेले पाहिजेत असें दुसऱ्या कांहींना वाटत होतें. हा वाद पुढें पुढें अगदींच विकोपाला गेला व कार्यकर्त्यांमध्यें दोन तट पडून ते एक दुसऱ्याचे हाडवैरी होऊन बसले. या दुहीमुळें काँग्रेसची भट्टी बिघडून गेली एवढें मात्र निश्चित. गांधीजींना या बाबतींत कोणी सल्ला विचारल्यास ते तत्त्वाला धरून उत्तर देत असत. मग कोण किती सात्त्विक आहे, किती स्वच्छ व सत्यप्रेमी आहे याची शहानिशा करीत बसण्याकडे सर्वांचीच प्रवृत्ति होऊं लागली.

प्रत्यक्ष सरकारला न जुमानतां कायदेभंग करण्यापूर्वीं म्हणजे या गंभीर वातावरणांत गांधीतत्त्वज्ञान विशद करून सांगण्याची उत्तम संधी असते. ती संधी साधावी व ही संधी व्यर्थ दवडूं नये असें मला वाटत होतें. अर्थात् त्यामुळें कायदेभंगाच्या वेळीं अशी तात्त्विक भाषणेंच करावींत व करवावींत असें मी आग्रहानें प्रतिपादन करीत होतों. माझा हा विचार स्वार्थामधूनच उत्पन्न झालेला आहे, अशी त्यावर होणारी टीका ऐकून मला निमूट बसावें लागत होतें. माझ्या आग्रहाचा कांहींहि उपयोग होत नव्हता आणि खरोखरच इतर सर्व जिल्ह्यांपेक्षां आमच्या बेळगाव जिल्ह्यांतून अधिक संख्येनें सत्याग्रही तुरुंगांत गेलेले आहेत. आम्हालाहि पुढें पुढें अनेक कारणांनीं संख्येकडेच अधिक लक्ष देणें भाग पडलें. तथापि सत्याग्रहींच्या गुणाविषयींचा आमचा आग्रह अगदीं योग्य व बरोबर होता, असें आजहि मला वाटतें. सत्याग्रहाच्या

प्रत्येक कार्यक्रमाच्या वेळीं, सत्याग्रहाच्या पार्श्वभूमीला असलेल्या सिद्धांताचा ऊहापोह जाणत्या लोकांना करण्याची संधी दिली गेली असती तर लोकांना गांधीतत्त्वज्ञानाची अधिक सुस्पष्ट कल्पना देतां आली असती असें माझें मत आजहि कायम आहे. पण त्या काळीं अशा एकामागून एक घटना घडत गेल्या कीं त्यावर कोणाचाच ताबा राहूं शकला नाहीं. एकदां तोल गेल्यावर पूर्ण पतन झाल्याशिवाय तें थांबूं शकलें नाहीं. कार्यकर्त्यांमधील या मतभिन्नतेचा व दुहीचा फायदा ज्यांना ज्या प्रकारें घेतां आला त्यांनीं तो घेतलेला आहे. हुदली आश्रमाशीं संबंध असलेल्या लोकांमधील संघटना, बंधुभाव अजिबात नष्ट झाला.

वैयक्तिक सत्याग्रहींच्या यादीमध्यें माझें नांव गांधीजींकडून मंजूर झालें होतें. विधायक कार्यासाठीं मी तुरुंगांत न जातां बाहेर रहावें, 'बेळगांव जिल्हा विधायक समिती' स्थापन करावी, व विधायक काम करीत राहावें, तुरुंगांत जाण्याच्या इच्छेचा स्वार्थत्याग करून दाखवावा अशा कै. अण्णासाहेब लट्ठे यांच्या कल्पनेशीं गंगाधरराव सहमत होते. त्या दिवसांत श्री. रघुनाथराव धोत्रे बेळगांवास आले होते. त्यांनीं मला सरळ सांगितलें कीं, अण्णासाहेब-गंगाधरराव यांच्या आज्ञेप्रमाणें, तुरुंगांत जाण्याची इच्छा तुम्ही सोडणारच नसाल तर तशी आज्ञा मला बापूजींच्याकडून आणवितां येईल! माझा नाइलाज झाला. मी तें मान्य केलें. त्यांच्या विचाराप्रमाणें मग 'बेळगांव जिल्हा विधायक समिती' हुदलीमध्यें स्थापन झाली. त्या समितीचे अध्यक्ष श्री. अण्णासाहेब लट्ठे व मी चिटणीस अशी निवड झाली. भाई रघुनाथराव धोत्रेजी यांचें हुदलीमध्यें याविषयीं एक व्याख्यानहि झालें. पण पुढें लागलीच थोड्याच दिवसांत 'बेळगांव जिल्हा काँग्रेस विधायक समिती' स्थापन करण्यांत आली. या दोन समित्यांमध्यें स्पर्धा व ईर्षा कांहीं महिने चालू होती. त्यामुळें हीं भांडणें वाढूं लागतील म्हणून आम्ही आमची समिती स्थगित केली. कारण आम्ही सर्वचजण काँग्रेसचे होतों ना? या सर्व गोष्टी पुढें विकोपाला गेल्या. त्याची सर्व हकीगत येथें देण्याचें कारण नाहीं व लोकशिक्षणाच्या दृष्टीनें त्याची तादृश आवश्यकताहि नाहीं. एवढेंच नव्हे तर तो कोळसा आतां उगाळण्यांतहि अर्थ नाहीं. थोडक्यांत एवढेंच सांगतां येईल कीं गांधीविचारांचा प्रचार व प्रसार जिल्हाभर करण्याची संधी आम्ही कार्यकर्त्यांनीं आपापसांत भांडून गमावली यांत शंका नाहीं. संघटनेपेक्षां विघटनेचीं चक्रें अधिक जोरानें फिरूं लागलीं. काँग्रेस कमिटी ज्यांच्या हातीं त्यांचेंच चालूं लागलें; काँग्रेस कमिटीच्या निवडणुकांकडे दोन्ही पक्षांचें लक्ष वेधलें. तो प्रयत्न करीत असतां, आमच्या निदर्शनास आलें कीं या भांडणामुळें काँग्रेसची जनमानसावरील पकड ढिली होत आहे. गोकाकमध्यें एकदां निवडणुकींत अपयश घेतल्यानंतर एका पक्षानें तो मार्गच सोडला. या चढाओढीमध्यें अण्णासाहेब लट्ठे व गंगाधरराव हे दोघेहि भाग घेत नव्हते. ते दोघेहि गोकाकला हजर नव्हते. काँग्रेस कमिटीच्या निवडणुकींतील स्पर्धेमुळें ही दुही जिल्हाभर पसरली. दोन्ही पक्ष करावयास गेले एक आणि झालें भलतेंच! ईश्वराची इच्छाच तशी

होती असें म्हणत निमूटपणें सर्व सहन करण्याखेरीज गत्यंतरच राहिलें नाहीं. या पक्षोपपक्षांच्या मांडणामुळें जिल्ह्यांत भलत्याच व वेगळ्याच लोकांना महत्त्व आलें. कॉंग्रेसची प्रतिष्ठा व पातळी या जिल्ह्यामध्यें खालीं उतरली. यांत अमुक एका पक्षाला दोष देण्याचा किंवा कमीपणा आणण्याचा माझा हेतु नाहीं. पण दोषाचें खापर कोणाच्या तरी डोक्यावर फोडायचेंच असेल तर तें जे अधिक जाणते व समंजस होते त्यांच्या डोक्यावरच फोडावें लागेल. यामध्यें खरे जाणते व समंजस कोण हें ज्यांचें त्यांनींच ठरवून आपल्या पदरीं दोषाचें माप घ्यावें. पण ज्या गोष्टी घडल्या ती एक शोकांतिकाच झाली यांत दुमत होण्याचें कारण नाहीं. यांत प्रत्येकाला शिकण्या-सारखें पुष्कळच आहे. मनुष्यस्वभावाचे किंवा मानसशास्त्राचे प्रवाह, उभे आडवे उपप्रवाह त्यांत पुष्कळच आहेत. त्या सर्वांचा उहापोह बोधप्रद व अभ्यसनीय असला तरी तो चर्चिणें या मर्यादित पुस्तकाचा विषय नव्हे. म्हणून तो विषय मी येथेंच सोडून देतों. आश्रमाशीं संबंध असलेल्या सर्वच कार्यकर्त्यांनीं वैयक्तिक सत्याग्रहांत भाग घेतलेला आहे.

६४.

## सन १९४२ चें 'चलेजाव' आंदोलन.

सन १९४२ च्या ऑ. इं. काँ. कमिटीच्या मुंबई अधिवेशनास कै. गु. गंगाधरराव यांच्याबरोबर मीहि गेलों होतों. त्या अधिवेशनांतील भाषणें, विशेषतः महात्माजींचें भाषण, ऐकून माझ्या मनांत विचारांचें काहूर माजून राहिलें होतें. त्यावेळची देशांतील किंवा महाराष्ट्र-कर्नाटकांतील चळवळीच्या इतिहासाचीं पानें मला येथें उलगडावयाचीं नाहींत. आमच्या हुदली आश्रमाशीं ज्यांचा संबंध, थोडाबहुत को होईना, आला त्यांनीं आपलें कर्तव्य कसें चोख बजावलें आहे तेवढेंच मला येथें संक्षेपानें सांगावयाचें आहे.

ऑ. इं. काँ. क. च्या अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशीं पहांटेच्या सुमारास बहुतेक सर्व काँ. व. क. च्या सभासदांना सरकारनें अटक केली. ही अटक अशी इतक्या लौकर होईल अशी महात्माजींची अटकळ नव्हती. आणखी एकदां वाटाघाटीची किंवा विचारविनिमय करण्याची संधी काँग्रेसला मिळणार आहेच असें गांधीजींना वाटत होतें. तेवढ्यासाठीं आपल्या निवेदनांत त्यांनीं कांहीं थोडें हातचें राखून ठेवलें होतें. पण प्रत्यक्ष घडून आलें तें वेगळेंच! सकाळीं नऊ वाजण्याच्या सुमारास सरदारगृहांत एक टेलिफोन गंगाधररावांच्या नावानें आला. तो मीं घेतला. फोनवर मला कोणी तरी विचारलें 'गंगाधरराव देशपांडे आहेत काय?' 'होय, ते आहेत.' मी उत्तर दिलें. लगेच फोन खालीं ठेवल्याची चाहूल आली. झालेली गोष्ट मी गंगाधररावांना सांगितली. ते म्हणाले 'चूक झाली. तो पोलीस अधिकाऱ्यांचा फोन असावा. मला अटक करण्यासाठीं इतक्यांत पोलीस येतील. सर्व सामान नीट बांधून तें वरच्या मजल्यावर श्री. साळवेकर यांच्या बिऱ्हाडीं नेऊन ठेव." त्याप्रमाणें सामान बांधण्याच्या व तें वरच्या मजल्यावर नेण्याच्या उद्योगाला मी लागलों. तेवढ्यांत गंगाधरराव स्वतः अंगावर कपडे चढवून सरदारगृहाच्या कौंटरवर गेले. सरदारगृहाचें बिल मागवून पावती त्यांनीं घेतली, आणि कौंटरवरील मनुष्यास सामान खालीं नेण्यासाठीं हमाल बोलविण्यास सांगितलें. ही सर्व केवळ हुल्कावणी होती.

गंगाधररावांच्या अंदाजाप्रमाणें लगलीच ५।१० मिनिटांत गंगाधररावांना अटक करण्यासाठीं पोलीस अधिकारी सरदारगृहांत आले. त्यांनीं सरदारगृहाच्या गल्ल्यावर असणाऱ्या कारकुनाजवळ चौकशी केली. गंगाधरराव उतरलेली खोलीहि त्यांनीं पाहिली. सामान टॅक्सींत नेऊन ठेवणाऱ्या हमालालाहि बोलावण्यास गंगाधररावांनीं सांगितल्याचें त्या कारकुनास माहीत असल्यामुळें त्यानें प्रामाणिकपणेंच पोलीस अधिकाऱ्यास सांगितलें कीं, गंगाधरराव आतांच सरदारगृहाचें बिल भागवून पावती घेऊन आपल्या सामानासह टॅक्सींतून स्टेशनवर जाण्यासाठीं गेले. हा सर्व प्रकार होणार व व्हावा याच दूरदर्शी बुद्धीनें सर्व गोष्टी गडबडीनें गंगाधररावांनीं उरकून घेतल्या होत्या.

आमच्याबरोबर त्याच वेळीं त्या खोलीमध्यें श्री. ह. मो. जोशी हेहि होते. गंगाधररावांना भेटण्यासाठीं पू. श्री. काकासाहेब कालेलकरहि तेथें आले होते. बॅ. विनायकराव सावरकर यांना या लढ्यामध्यें भाग घेण्यास बोलवावें अशी चर्चा गंगाधरराव व काकासाहेब यांच्यामध्यें चालू होती. ती सर्व आज माझ्या ध्यानांत नाहीं. फक्त गंगाधरराव यांच्या सांगण्यावरून मी बॅ. सावरकरांना फोन केला होता इतकेंच मला आठवतें. पण इतक्यांत ही सर्व गडबड झाल्यामुळें सर्व कांहीं जेथल्या तेथेंच राहून गेलें असावें. त्यानंतर तीन दिवसपर्यंत गंगाधरराव मुंबईमध्यें होते. त्यांनीं व श्री. ह. मो. जोशी यांनीं मिळून या चळवळीसाठीं कांहीं आर्थिक मदत मुंबईमध्यें जमवून ती भूमिगत कार्यकर्त्यांच्या हातीं दिली होती. दोन प्रहरीं भोजन झाल्यानंतर मी बेळगांवला जाण्यासाठीं निघण्यापूर्वी गंगाधरराव यांचा निरोप घेतला. त्यावेळीं ते मला म्हणाले, 'ही चळवळ तुरुंग भरण्याची नव्हे. गोळी खाऊन मरण्याची ही चळवळ आहे. तुला जें सुचेल तें कर. तूं गोळी खाऊन मेल्याचें मला कळेल तर मला आनंद होईल. जा. जें काय धाडस, करामत करून दाखवायाची असेल तें तें सर्व करून दाखव. माझा तुला आशीर्वाद आहे!' मीं त्यांचा निरोप घेतला, पुण्यास आलों. तेथून थेट मिरजेस गेलों. पुण्यामध्यें पोलीस अधिकारी श्री. भीमराव चेनापूर यांच्या घरींच मी एक रात्र होतों. मिरजेहून सांगलीस गेलों. तेथें श्री. गणपतराव अभ्यंकर यांच्या बंगल्यामध्येंच दोन महिनेपर्यंत भूमिगत म्हणून राहिलों. पोलीस माझ्या तपासावर होतेच.

त्या वेळीं देशांतील चळवळीस अलोट भरतें आलें होतें. चोहोंकडे (सबोटेज) मोडतोडीचें वातावरण होतें. तारा तोडणें, रूळ उखडणें, रेल्वेस्टेशन जाळणें, हस्तपत्रकें छापून वाटणें, सरकारी घातपाताला लोक चेतवणें, अशल्या गोष्टी सर्रास व वाढत्या प्रमाणांत सर्वत्र चालू होत्या. मीं पहिलें बुलेटिन सांगलीहून भूमिगत असतांनाच काढलें होतें. त्यांत या जाळपोळीच्या विरुद्ध लिहिलें होतें. या गोष्टी गांधीतत्त्वज्ञानावर उभारलेल्या चळवळींत बसत नाहींत, असें माझें पहिलें पत्रक होतें. पण पुढें पू. काकासाहेब कालेलकर व श्री. किशोरलालजी यांनींहि या मोडतोडीची

वरफदारीनें प्रशंसा केली. मला त्यांचें लेखन वाचावयास व पहावयास मिळालें. त्यानंतर मी माझीं मतें सुधारून घेतलीं. वैराण प्रदेशांतून मैल न् मैल रेल्वेचे रूळ जात असल्यामुळें तेथें ते प्रथम उखडावेत असें त्यांचें मत असल्याचें प्रसिद्ध झालें. सांगलीमध्यें श्री. अभ्यंकरांच्या घरीं बसून, बुलेटिन तयार करून मी छापवीत होतों. प्रो. शहा आपल्या छापखान्यामध्यें तीं राजरोसपणें छापवून देत. त्या त्या तारखांचीं भाटवड्याला दोनप्रमाणें पुढील चार महिन्यासाठीं अशीं हस्तपत्रकें छापून मी तयार करून ठेवलीं होतीं. माझे वडील बंधु श्री. गोपाळराव तथा बंडोपंत हीं बुलेटिन्सचीं पुडकीं बेळगांव जिल्ह्यांत ठराविक ठिकाणीं पोचवीत होते. दैवयोगानें एके दिवशीं फजगत झाली. मी बेळगांव व सांगली या दोन्ही ठिकाणच्या पोलीस सबइन्स्पेक्टरांच्या जवळून दिवसाच सांगलीमध्यें सायकल वरून गेलों. त्यांनीं मला ओळखलें. हाकहि मारली. पण मी त्या गांवचाच नव्हे अशा झोकांत माझी सायकल मी तशीच पुढें तावडली, आणि जोरांत निघून गेलों. वेश पालटण्याच्या व पोषाख बदलण्याच्या विरुद्ध मी त्यावेळीं होतों. सायंकाळच्या आंत पोलिसांनीं माझा माग काढून शोध लावला. श्री. अभ्यंकर यांच्या घराला पोलिसांनीं वेढा दिला. बंगल्याच्या गेटवर दोन सशस्त्र पोलीस बसविले. जरा काळोख पडेपर्यंत मी बसा तरी वेळ काढला. श्रीयुत अभ्यंकर यांचे सर्वांत कनिष्ठ चिरंजीव श्री. वसंतराव यांच्या हिकमतीनें मी त्या पोलीस वेढ्यांतून युरोपियन ड्रेस करून निसटलों, तो औंधला पहाटे पांच वाजतां पोहोंचलों. श्रीमंत अप्पासाहेब पंत यांनीं मला पंडित सातवळेकर यांच्या घरीं दोन दिवस ठेवले होते. मी लिहून छापवून घेतलेलीं सर्व बुलेटिन्स कानडीमध्यें छापवून घ्यावींत, हा माझा औंधला येण्यामधील हेतु होता. पण ती व्यवस्था तेथें होऊं शकली नाहीं. म्हणून मी परत सांगलीस व सांगलीहून मोटारकारनें शहापूरास (बेळगांव) जावें आणि तेथून हुदलीस पोहोंचावें असा माझा विचार होता. मुळधाळ स्टेशनजवळील ओढ्यावरील रेल्वेपूल पाडण्याचा कार्यक्रम माझ्या योजनेंत होता. या कामांत आमच्या हुदली येथील वेरड बंधूंनीं मदत करावी या हेतूनें आमच्या धान्यगंगा-जळींतील धान्य ज्यांना ज्यांना दिलें गेलें होतें तेवढें त्यांना तें दान म्हणून समजावें असें मीं जाहीर केलें. तो शेवटचाच लढा असल्यामुळें कोणीहि कांहीं शिल्लक ठेवावयाचेंच नाहीं असेंच धोरण चळवळीमध्यें चोहोंकडे अंगिकारलें होतें. यांत आमची धान्यगंगाजळी (Grain Bank) संपविण्यांत आली. पण सांगलीमध्येंच मला अटक झाल्यामुळें तो पूल उडवून देण्याचा कार्यक्रम होऊं शकला नाहीं. सांगलीचे चि. लक्ष्मणराव गाडगीळ सराफ, बुधगांव स्टेशनवर मला उतरून घेऊन शहापूर-पर्यंत पोहोंचविण्याची जबाबदारी पार पाडण्यास मोटार घेऊन आले होते. पण मला त्याच बुधगांव स्टेशनवर डुलकी आल्यामुळें मी त्या गाडीनें पुढें मिरजेस गेलों. तेथें मला पोलीसांनीं ओळखल्यामुळें मी त्यांना हुलकांडी दिली, व सांगलीस रवाना झालों. सांगली स्टेशनवर मला ओळखण्यांत आलें. मी पकडला गेलों. पोलीसांनीं मला

टांग्यांतून पोलीसचौकीकडे चालविलें. टांग्यांत बसल्या बसल्या माझ्या खिशांतील सर्व कागदपत्रें, योजना व बुलिटिन्सच्या प्रती फाडून चुरा करून रस्त्यांत फेकून दिल्या. अर्थात् पोलीसांच्या हातीं माझ्याशिवाय कांहींच लागूं शकलें नाहीं.

श्री. वडवीमास्तर यांना वेरडवधूनीं आपल्या घरामध्यें अगदीं सुरक्षितपणें ठेवलेलें होतें. असल्या कामांत वेरड लोकांना विशेष हौस! तो त्यांचाच खास विषय!! श्री. वडवी जवळजवळ दोन वर्षे पोलिसांना सापडूं शकले नाहींत. त्यांना धरून देणारास पांच हजार रुपयाचें बक्षीस सरकारनें जाहीर केलें होतें. श्री. वडवी प्लॅटफार्मवर व्याख्यानें देण्यास जात नसल्यामुळें, त्यांची चेहरापट्टी पोलिसांना माहीत नव्हती. कांहीं पोलीस तर वडवी कोठें असावेत हें श्री. वडवींनाच विचारीत होते. एकदां दोनदां पोलिसांनीं रस्त्यामध्यें त्यांना ओळखल्यानंतर श्री वडवींनीं त्यांना चुकांडी देऊन आपली सुटका करून घेतलेली आहे. पोलीस अधिकाऱ्यांनीं हुदलीच्याच एका प्रतिष्ठित मनुष्याकडून श्री. वडवींचा फोटो मिळविला. आपलें नांव त्यांत गोविलें येणार नाहीं, याची काळजी त्या सज्जन माणसानें घेतलेलीच होती. त्या सर्व अद्भुतरम्य कथा देऊन मी मजकूर वाढवीत नाहीं. आमच्या हुदली आश्रमांतील सर्व लहानथोर कार्यकर्त्यांनीं आणि आश्रमापासून संस्कार घेऊन बाहेर पडलेल्या बहुतेक सर्व आंदोलकांनीं आपलें सर्वस्व पणाला लावून कार्य केलेलें आहे, एवढें सांगितलें म्हणजे त्यांत सर्व आलें. माझा व वडवींचा पत्ता कोठें आहे ही गोष्ट श्री. अल्लीसाहेब बारिमनी यास माहीत होती. परंतु पोलिसांनीं त्याला कितीहि मारलें, झोडलें व कितीहि भिवविण्याचा प्रयत्न केला तरी त्याला या अल्लीसाहेबांनीं भीक घातलेली नाहीं. या अखेरच्या चळवळीमध्यें आम्ही सर्वांनीं एकदिलानें, आपसांतील भेदभाव, असूया, द्वेषभावना व मतभिन्नता विसरून काम केलें आहे.

सन १९४४ सालीं आम्ही सर्व तुरुंगांतून मुक्त होऊन बाहेर पडलों. आम्ही पुनः आमचा हुदलींतील आश्रम सुरू केला. आमच्या आश्रमाची जागा व इमारतहि आमच्या ताब्यांत आली. तुरुंगांत राहून बाहेर निरोप पाठवून चळवळी व चळवळीचें मार्गदर्शन करूं शकणारे अशा कांहीं सत्याग्रहींना हिंडलगा जेलमधून नाशिक तुरुंगांत पाठविण्यांत आले होते, त्यात आमच्या आश्रमाशीं संबंध असलेले ४।५ सत्याग्रही होते. सन १९४४ च्या जूनपासून सत्याग्रहींच्या सुटकेला प्रारंभ झाला. दे. भ. केशवराव गोखले यांनीं आपल्या शिक्षेविरुद्ध हायकोर्टांत अपील केलें होतें. त्यांच्या अपीलचा निकाल श्री. गोखले यांच्यासारखा लागला. त्याच कलमाखालीं ज्यांना ज्यांना शिक्षा झाल्या होत्या त्या सर्वांना सोडून देणें सरकारला भाग पडलें. त्यांत माझीहि सुटका झाली. आश्रमाची व कामाची विसकटलेली घडी सावरून पुनः नीट घालण्यास आम्हांला आठदहा महिने लागले.

६५.

## समग्र ग्रामसेवा समितींची स्थापना व कार्य
(स. १९४४–४५)

गेल्या दहा वर्षांच्या विधायक कार्याचा अनुभव, सन १९४१–४२ च्या चळवळीचा अनुभव, जिल्ह्यांतील कॉंग्रेस संघटनेची परिस्थिति, हें सर्व ध्यानांत घेऊन तुरुंगांत जें मनन आणि विचार-विनिमय झाला त्या सर्वांचा सामग्र्यानें विचार करतां, आश्रमातर्फे होणाऱ्या विधायक कार्याची घडी अगदीं नवीन प्रकारें बसविण्याचा प्रयत्न झाला. पहिली गोष्ट ही ठरविण्यांत आली कीं आश्रमांत किंवा आश्रमामार्फत बाहेर काम करणाऱ्या इसमानें, (एक माझ्या शिवाय कोणीहि) अविवाहित राहतां कामा नये. आध्यात्मिक साधनेसाठीं कोणाला आजीवन ब्रह्मचर्य पालन करावयाचेंच असेल तर व्यक्तिशः त्याचा विचार आश्रम करील व निर्णय देईल. आमच्या आश्रमाच्या चौकटींतून बाहेर निघून, आपला मनःपूत जीवनक्रम आंखण्याचें व्यक्तिस्वातंत्र्य कोणासहि आहे, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्याचप्रमाणें 'कार्यकर्त्याला पहिलें संतान होतांच पांच रुपये वेतनवाढ मिळेल, दुसरें संतान होतांच पुनः तीस रुपये वेतनांत वाढ केली जाईल, आणि तिसरें संतान होतांच दोन रुपये वेतन कमी करण्यांत येईल आणि चौथें संतान झाल्यानंतर मात्र त्याला राजीनामा देऊन बाजूला व्हावें लागेल,' असा निर्णय घेण्यांत आला. त्याचें अगदीं उघड कारण एवढेंच होतें कीं कार्यकर्त्याची प्रजा वाढेल तसतसें त्याचें वेतन वाढवीत जाणें आश्रमाला शक्य नव्हतें. घरीं खाणारीं तोंडें अधिक झालीं म्हणजे दुसऱ्याचा किंवा संस्थेचा पैसा वापरण्याची अगर अपहार करण्याची बुद्धि मनुष्याला अनावर होते, स्वतःचें मन विरोध करीत असूनहि माणूस करूं नयेत त्या गोष्टी करूं लागतो, त्याला कशाचा विधिनिषेध वाटत नाहीं, मन निढावतें, निलाजरेपणाचे घट्टे पडतात, आणि प्रत्यक्ष कामावरून त्याचें मन उडूं लागतें. कामापेक्षां तो स्वार्थांत अधिक गुरफटतो.

स्वातंत्र्य इतक्या लौकर देशाला लाभेल असें त्यावेळीं कोणासच वाटत नव्हतें.

स्वातंत्र्य मिळालें तरी राष्ट्रसंवर्धनाचें हें विधायक कार्य असेंच पुढेंहि चालू राहणार आहे. असलीं कामें केवळ लोकांच्या मदतीवरच कायमचीं चालणार नाहीत; तशीं तीं केवळ सरकारी मदतीवर चालविलीं तर त्यामागील पावित्र्य व देशसेवा मंदावेल व लोकांची तत्त्वनिष्ठाहि नाहींशी होईल म्हणून कार्यकर्त्यांनीं आपापल्या पसंतीच्या गांवामध्यें स्वतंत्रपणें व स्वतःच्या हिंमतीवर कार्य उभारून दाखवावें व अशा स्वतंत्र कार्यकर्त्यांना जरूर तेवढें वेतन आश्रमाकडून मिळावें, हें वेतन प्रतिवर्षी पंचवीस टक्के कमी कमी करीत चार वर्षांनतर बंद व्हावें, असें ठरविण्यांत आलें. कार्यकर्ता चार वर्षांनंतर स्वतंत्रपणें सर्वस्वीं आपल्या पायावर उभा राहिल्यास, त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें वाटेल त्या पक्षांत सामील होण्यासहि तो स्वतंत्र राहील. या विचाराच्या आधारावर 'समग्र ग्राम सेवा समिति' स्थापन करण्यांत आली. समितीचें हें नांव वर्धाच्या केंद्र संस्थेकडूनच सुचविलें गेलेलें आहे. या समितीमध्यें काम करणाऱ्या सर्वांना या सैद्धांतिक गोष्टी माहीत होत्या असें नाहीं. त्या गोष्टी आकलन करून घेण्याची बौद्धिक पातळी फारच थोड्यांची होती. एका नवशिक्या कार्यकर्त्यानें अगदीं मोकळ्या मनानें मला सुचविलें होतें कीं, 'आम्हीहि प्रथमपासून समितीमध्यें आहोंत, समितीचे कायमचे अध्यक्ष तुम्हीच रहा, आम्ही सर्व साधे समासद राहूं व समितीचें कार्य मताधिक्यानें ठरेल त्याप्रमाणें चालवूं.' या सरळ भाषणाच्या विचारांत चूक कांहीं नाहीं. पण कोणत्या बौद्धिक पातळीवरील कार्यकर्त्यांना आम्ही हाताशीं धरतों किंवा स्वतंत्र कार्यकर्ता ठरण्यास कोणत्या गोष्टींची आवश्यकता असते याची त्याला नीटशी कल्पना नव्हती. निराळ्या शब्दांत स्पष्ट सांगावयाचें म्हणजे त्या कार्यकर्त्याला आपल्या स्वतःची बौद्धिक पातळी कोणत्या दर्जाची आहे किंवा एखाद्या स्थानिक अडचणीच्या प्रसंगीं विशिष्ट निर्णय घेण्यास लागणारी चतुरस्रता, शिक्षण व अनुभव यांचा कसा व कुठें उपयोग करून घ्यावा लागतो याची पुसट देखील कल्पना त्याला नव्हती.

एक एक कार्यकर्त्याला त्या त्या त्याच्या निवडीच्या विभागांतील महंत बनवावा ही माझी मूळ कल्पना होती. समर्थ रामदासस्वामींनीं अशा तऱ्हेचे महंत ठिकठिकाणीं पेरून ठेवले होते आणि त्यांच्यासाठीं जागोजाग मठ स्थापिले होते व जनजागृति केली होती. तें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून समितीचें धोरण आम्ही आंखलें होतें. वसा विशेष कर्तबगारीचा एखादा कार्यकर्ता निघाल्यास त्याला वरील सर्व नियम ओलांडून अधिक आर्थिक मदत अधिक दीर्घकालपर्यंत समितीकडून चालू राहिली असती, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्या कार्यकर्त्यांना हुदलीतील आपलें बिऱ्हाड एकदम हलवितां येण्यासारखें नव्हतें त्या प्रत्येकासाठीं एकेक सायकल विकत घेऊन दिली. दुसऱ्या गावांत जाऊन आपण आपला जम तेथें बसवूं शकूं असें त्यांच्या प्रत्ययास आल्यानंतरच त्यानें आपलें बिऱ्हाड हलवावें, असाहि त्यांत माझा हेतु होता. या योजनेप्रमाणें चार गांवांत चार विद्यार्थ्यांना पाठविलें. पण त्या प्रयोगांत विशेष

उत्साहवर्धक किंवा ही योजना अखंड चालवावी असा आशादायक अनुभव आला नाहीं. जो जितका अधिक हुपार व कल्पक तितकें अधिक त्यानें आम्हाला चकविलें. विजापूरच्या बाजूचा एक कार्यकर्ता श्री. विंदुमाधव देशपांडे यांच्या अनेक लटपटींमुळें मला आमच्या प्रयोगांतील वैय्यर्थ्य कळून आलें. हातीं असलेल्या साधनसामग्रीवरच काम भागवणें क्रमप्राप्त होतें! प्रत्येक वेळीं नवी सेना तरी कशी मिळवायची आणि माझ्या कल्पनेंतले महंत तरी कसे तयार व्हावयाचे! या कामीं मला अपयश आलें. खर्चहि बराच सहन करावा लागला. श्रम फुकट होऊं लागले.

मला असें वाटत होतें व आजहि वाटते कीं मनुष्याच्या अंगावर कार्य येऊन पडलें म्हणजे ईश्वर त्याला आवश्यक ती शक्तीहि देतो. माझ्या स्वतःच्या बाबतींत असें अनेक वेळां अनुभवास आलेलें आहे. सासवडहून श्रीमती प्रेमाबाई कंटक यांना एक असा कार्यकर्ता पाहिजे होता कीं जो सूत कातण्यापासून तों त्या सुताचें वस्त्र विणण्यापर्यंतच्या सर्व प्रक्रिया शिकवूं शकेल. असा कार्यकर्ता मी पुरवूं शकेन, अशी त्यांची कल्पना होती. आमच्याकडे तसे कार्यकर्ते होतेहि अनेक. पण त्यांना मराठी समजत नव्हतें. काम अंगावर येऊन पडल्यावर मनुष्य सर्व कांहीं जमवून घेतो व आला प्रसंग निभावून नेतो या विश्वासावर मी एक कार्यकर्ता तयार केला. तो सर्व कांहीं आपोआप शिकून घेईल, स्वतःला तयार करील आणि इतरांनाहि शिकवील, अशा विचारानें चि. निंगाप्पा तुकार या कार्यकर्त्याला मी सासवडला पाठवून दिलें. तो सासवडला जाऊन पोहोंचला. पण सासवडच्या लोकांनीं त्याला आणि त्यानें त्या सासवडच्या वातावरणाला पसंत केलें नाहीं. तो परत आला. त्यानंतर पुनः आमच्या समितीकडे तशा कार्यकर्त्याची मागणी प्रेमाबाई कंटक यांनीं केली नाहीं. प्रत्यक्ष भेटीमध्यें त्यांतील अडचणी त्यांनीं मला समजावून सांगितल्या, तशा आशयाचें एक पत्रहि त्यांनीं मला लिहिलें होतें.

## ६६.

## विणकामवर्गाची स्थापना व अनुभव

वेरड समाज बुद्धीनें हुषार व चिकाटीचा असल्यामुळें त्या समाजांत क्रांति घडवून आणणें अधिक सोपें आहे, असें आम्हांला वाटत होतें. म्हणून आम्ही अनेक उन्हेनें प्रयत्न करून पाहात होतों. त्या समाजाशीं अधिक संबंध व परिचय वाढविल्यावांचून त्या समाजाचें मानव-परिवर्तन होणार नाहीं, असें आम्हांला वाटत होतें. म्हणून वेरडांच्या कांहीं कुटुंबांना या विणकामाच्या धंद्यामध्यें घालावें हा विचार दृढ झाला. त्याप्रमाणें योजना आंखण्यांत आली. त्या कुटुंबांना राहण्यासाठीं एक चाळ बांधविण्यांत आली. त्या वेरड कुटुंबांना आपल्याला विणकाम साधेल हा आत्मविश्वास नव्हता, परंतु आम्ही त्यांना पहिल्या दिवसापासूनच माणशीं रोज एक रुपया मजुरी देण्याचें ठरविलें. त्यांनाहि तें प्रलोभन वाटलें. त्यांनी कापड विणण्याची सर्व प्रक्रिया चारसहा महिन्यांत चांगल्या रीतीनें शिकून घेतली. पुरुष प्रत्यक्ष मागावर कापड विणूं लागले आणि स्त्रिया सुती पांजण, मागासाठीं ताणा तयार करणें, बॉबीन म्हणजे कांड्या भरणें वगैरे कामें करूं लागल्या. कांहीं काळ हा अनुभव घेतल्यावर आपण विणाईत अधिक मजुरी मिळवूं शकूं असें त्यांना वाटूं लागलें व तशी परिस्थिति येतांच विणकामाच्या मजुरीवर स्वतंत्रपणें आपला निर्वाह करण्याचें त्यांनीं ठरविलें. आम्हाला पाहिजे होतें तेंच झालें! धंदेवाईक पिढीजात विणकरांच्या बरोबरीनें हे वेरड समाजांतील नवविणकर विणाई करूं लागले. धंदेवाईक विणकरांच्या युक्त्याप्रयुक्त्या मात्र त्यांना अद्याप साधलेल्या नव्हत्या. त्यांच्या खादीची विणाई अधिक चांगली होत असे. धंदेवाईक विणकर पोटापुरती मजुरी मिळविल्यानंतर, वेळ सवड असूनहि अधिक विणत बसण्याचें पाप (!) कधींच करीत नाहींत; पण हे वेरड म्हणजे नवविणकर अधिकांत अधिक विणाई मिळविण्याचा प्रयत्न करीत असत. हा दोघामधील खास फरक आहे. विणाईच्या वर्गांत वेरडांशिवाय इतरहि कार्यकर्त्यांचा समावेश केला जात होता. सर्वच कार्यकर्त्यांनीं विणकाम म्हणजे पांजण, वही, फणी, ताणा, खळ, कांडी भरणें,

सूत जोडणें वगैरे सर्व शिकलें पाहिजे अशी सक्ती करण्यांत आलेली होती. ही सक्ती कांहीं कार्यकर्त्यांना आवडलेली नव्हती. तरी समितींतील नोकरीसाठीं ती त्यांना सहन करावी लागली व विणकाम शिकावें लागलें. अर्थात् या सक्तीचा फायदा पुढें त्यांना मिळाला ही गोष्ट वेगळी. या विणकाम वर्गामध्यें केवळ विणकाम शिकण्याकरितांच अन्य ठिकाणाहून आलेले एकदोन विद्यार्थी होते. शिकतांना प्रारंभीं त्यांनीं जेवढें सूत खराब केलें असेल त्यापेक्षां अधिक फायदा ते लोक विणकाम शिकल्यानंतर मजुरीच्या रूपानें समितीस देऊन गेलेले आहेत.

६७.

## प्रवासद्वारां मिळणारें शिक्षण व संस्कार

प्रवासाच्या द्वारा मनुष्याला पुष्कळ शिक्षण मिळूं शकतें व उत्तम संस्कारहि मिळूं शकतात असें मला वाटत असल्यामुळें, मी समितीमधील शिक्षित व संस्कारक्षम कार्यकर्त्यांना अखिल भारतभर हिंडवून आणण्याचा उपक्रम केला होता. हा सर्व प्रवासखर्च मी स्वतः सहन करीत होतों. जयपूर, दिल्ली, कलकत्ता, आग्रा वगैरे मोठमोठ्या शहरांतून आमच्या कार्यकर्त्यांना प्रसंगाप्रसंगानें मी हिंडवून आणलेलें आहे. अनेक थोर पुढाऱ्यांचें दर्शन व परिचय आणि सहवासहि त्यांना मिळवून दिलेला आहे. पण पुढें मला असें दिसून आलें कीं हें शिक्षण घेण्यास किंवा संस्कार घडण्यासहि एक प्रकारची लायकी असावी लागते. माझ्याबरोबर भारतभर हिंडलेल्या सर्वच कार्यकर्त्यांवर शुभ संस्कारच झालेले आहेत, असें सांगतां येणार नाहीं. कांहीं कार्यकर्त्यांवर उलटे संस्कारहि झालेले आहेत. 'अमुक नेता नव्हे का, पाहिलें आहे मी त्याला!' असें म्हणण्यापुरतेंच त्यांच्यावर संस्कार झाले असल्यास नवल नाहीं. त्यांतहि स्वाभाविकपणेंच अनुक्रम लागून जातो.

पण तेवढ्यानें मी निराश झालों नाहीं. समितीमधील सर्वच कार्यकर्त्यां स्त्रीपुरुषांनीं कर्नाटकांतील विधायक कार्य करणाऱ्या संस्थांच्या दर्शनास व यात्रेस जावें असें ठरवून सुमारें पंचेचाळीस स्त्रीपुरुष कार्यकर्त्यांना मी मुद्दाम पाहण्यास कर्नाटकांत, एका टोळीनें पाठवून दिलें. त्या त्या विधायक संस्थांना या आमच्या उपक्रमाचें कौतुक वाटलें. आमच्या समितीमधील कार्यकर्त्यांनींहि या यात्रेमध्यें आपली वागणूक व शिस्त चांगली राखलेली होती. त्या त्या संस्थेकडून माझ्याकडे तसें लिहूनहि आलेलें आहे. ज्यांना आपलें खेडें सोडून बाहेरचें जग पाहण्याची संधी कधींच मिळाली नव्हती किंवा मिळूं शकली नसती त्यांना कर्नाटकभर फिरून विधायक केंद्र पाहावयास मिळालीं. ज्या कार्यकर्त्यांना आपल्या जिल्ह्याच्या बाहेर कधींच जातां आलें नव्हतें त्यांना भारतभर हिंडवतां आलें. माझ्याबरोबर मी ज्यांना फिरतीवर नेत असें त्यांना, मी

ज्या वर्गानें प्रवास करीन त्याच वर्गाचीं तिकिटें त्यांच्याकरितांहि मी काढीत असे. प्रवासामध्यें पंक्तिप्रपंच झाल्यास त्याचाहि परिणाम अज्ञ कार्यकर्त्यांवर चांगला होत नाहीं, असें मीं पाहिलेलें आहे. अशा वेळीं प्रवासास गेल्याचें पुण्य तर लाभत नाहींच पण खालच्या वर्गाचें तिकिट काढल्याचें पाप मात्र पदरीं येतें आणि प्रवासांत आवश्यक असणारें मानसिक स्वास्थ्य बिघडून जातें.

जयपूर कॉंग्रेसच्या वेळीं मी एक महिना आधीं गेलों होतों. प्रदर्शन-प्रचार खात्याचा मुख्य म्हणून मला नेमण्यांत आलें होतें. ही माझी शिफारस भाई रघुनाथराव धोत्रे यांनीं केलेली होती. त्यावेळीं माझ्याबरोबर चि. रामचंद्र तथा अप्पय्या वडगेर व आणखी एक कार्यकर्ता यांना मी नेलें होतें. चि. रामचंद्र हा उत्तम गुणी व कलाकार सुतार असल्यामुळें प्रदर्शनाची पूर्वतयारी करण्यास त्याचा फार उपयोग झाला आणि त्यालाहि त्यामध्यें पुष्कळ अनुभव मिळाला. दुसराहि एक असाच सुताराचा कलावंत मुलगा हातांत सुतारीची चांगली कला असल्यामुळे, मुंबईचे प्रसिद्ध फर्निचरमेकर श्री. जयानंद खीरा यांच्याकडे शिक्षणासाठीं मी पाठवून दिला. श्री. खीरा यांनीं त्याला त्याचा सर्व खर्च चालवून आपल्या कारखान्यामध्यें दाखल करून घेतलें होतें. परंतु तो, वारंवार घरची आठवण होते एवढ्याच कारणासाठीं घाबरून परत आला. तथापि त्यावेळीं त्याच्यावर झालेले संस्कार फुकट गेलेले नाहींत. पुढें तो स्वतंत्रपणें ओरिसा प्रांतांत सरंजाम कार्यालयाच्या कामासाठीं गेला. तेथें त्यानें आपल्या सुतारी कौशल्यानें सर्वांना संतोष दिला. हल्लीं देखील तो अखिल भारतांत जरूर लागेल तेथें किंवा मागणी असेल त्या ठिकाणीं सरंजाम कार्यालयाच्या वतीनें काम करण्यास जातो व आपल्या कलेनें सर्वांना आनंद देत असतो.

## ६८.

## सैद्धांतिक जीवन जगण्यास शिकविण्याचा प्रयत्न

समाजामध्यें सैद्धांतिक जीवन जगण्याची भावना व हौस उत्पन्न व्हावी म्हणून सामाजिक जीवनामध्यें एक नवीन क्रांति घडविण्याचा विचार आमच्या मनांत आला. त्यासाठीं गांवांत तशा प्रकारचें वातावरण उत्पन्न करण्याच्या प्रयत्नाला आम्ही लागलों. आपल्या समाजानें 'स्त्री मजूर' व 'पुरुष मजूर' यांना सारखीच रोजमजुरी द्यावी, हा विचार समाजामध्यें रुजविण्याच्या खटाटीला आम्ही प्रारंभ केला. आज समाजामध्यें पुरुषांपेक्षां स्त्रियांना कमी मजुरी दिली जाते, आणि त्याविषयीं मजुरांमध्यें कोणीहि तक्रार करीत नाहीं. 'ही प्रथा योग्य व न्यायनीतीला धरूनच आहे. सर्वांनीं या तत्त्वाला तशी मान्यता दिलेलीच आहे' अशी सर्वत्र वागणूक असते. परंतु वास्तविकपणें विचार केला तर याच्या उलट वस्तुस्थिति असणें आवश्यक व न्यायनीतीला धरून आहे, असें आढळून येईल. स्त्रीजात पुरुषापेक्षां किती तरी पटीनें नाजूक, स्त्रियांच्या बाळंतपणाचा काळ म्हणजे जवळ जवळ पुनर्जन्मच असतो. काळाच्या गुहेंतून तेव्हा त्यांचा प्रवास होत असतो. सामान्यतः पाहिल्यास स्त्रियांचा आहारहि पुरुषापेक्षां अधिक असतो. काम करीत असतांना तंबाखू ओढण्याच्या निमित्तानें, पानतंबाखू खाण्याच्या निमित्तानें, पुरुष मजूर कितीतरी वेळ व्यर्थ घालवितो. तसा अप्रामाणिकपणा स्त्रीमजूर सहसा करीत नाहीं. पुरुषापेक्षां स्त्री आपलें काम अधिक सुबक व प्रामाणिकपणें करते. ससा आणि कासव या गोष्टीचा प्रत्यय येथें येण्यासारखा आहे. या प्रकारें दिवसभर पुरुषाबरोबर राबून, घरीं जातांच पुरुष विश्रांति घेईल पण स्त्री लागलीच घरकामाला लागते. या सर्व गोष्टी ध्यानांत घेता पुरुषमजुरापेक्षा स्त्रीमजुराला वास्तविक अधिक वेतन किंवा रोजमुरा मिळणें न्यायाच्या व नीतीच्या दृष्टीनें आवश्यक व क्रमप्राप्त ठरतें. परंतु ही माणुसकी अगर थंभर नवरी नीति किंवा धोरण ठेवणारा असा कोण 'उदार दाता' आहे! तें अधिक मजुरी मिळण्याचें भाग्य स्त्रीच्या नशिबीच नाहीं, असा दैवाचा दोल वाजून किती दिवस बसायचें! केव्हां तरी धनिक समाजाला हें पटवून

विचारावयालाच हवें कीं पुरुषापेक्षां जास्त मजुरी द्यावयाचें बाजूला राहूं द्या पण निदान पुरुष मजुराइतकी तरी मजुरी स्त्रीमजुराला द्याल कीं नाहीं ? स्त्रीसमाजाची ही किमान मागणी श्रीमान् धनिकाकडे आहे. गांवांत व्याख्यानाच्या रूपानें आणि घरोघर संभाषणाच्या रूपानें आम्ही हा विचार लोकांपुढें सतत मांडत होतों. सर्वच मजुरांना व विशेषतः स्त्रीमजुरांना हा आमचा विचार फारच आवडला होता. पुरुषमजुरांइतकी मजुरी मागण्यास कांहीं स्त्रीमजूर आरंभहि करूं लागले. या आमच्या प्रचारानें गांवांतील कांहीं लोकांना धास्ती वाटूं लागली. 'हा प्रचार समाजाला कोठपर्यंत नेणार आहे कोणीं सांगावें ?' असें लोकांना वाटे.

हुदलीगांवामध्यें आमच्या समितीच्या अनेक प्रवृत्तींकरितां आम्ही कित्येक इमारती बांधविल्या आहेत. त्या बांधकामाच्या वेळीं आम्हीहि स्त्रीमजुरांना इतरांप्रमाणेंच पुरुष मजुरांपेक्षां कमीच मजुरी देत आलों होतों. 'पुरुषमजुराएवढी मजुरी स्त्रीमजुराला मिळेल तरच व तेथेंच आम्ही मजुरीला जाऊं' अशी प्रतिज्ञा ज्या स्त्रिया करतील त्यांनाच फक्त आमच्या कामाच्या वेळीं पूर्वी दिल्या गेलेल्या कमी मजुरीचा हिशेब करून, त्या त्या स्त्रीमजुरांना मुद्दाम उरलेली मजुरी पोचविली आहे. आमच्या विचारांशीं व मतांशीं आम्ही कसें एकनिष्ठ आहोंत, हें जनतेपुढें ठेवून आमच्या प्रचाराला नवी धार, नवा जोर व उत्कटता आणण्यासाठींच आम्ही हा खर्च अंगावर घेतला होता, हें उघडें गुपित होतें. ही आमची 'मतानुसार कृति पाहून' त्यावेळीं स्त्री-मजुरांना आश्चर्यच वाटलें होतें. अशा रीतीनें प्रतिज्ञाबद्ध झालेला स्त्री-मजूर आमच्याकडे मजूर म्हणून कामावर येतांना, पुरुष मजुराइतकीच मजुरी मागून घेत असत. परंतु इतर कोणाकडे काम करण्याचा प्रसग आला असतां त्या वेळीं मात्र हे प्रतिज्ञाबद्ध स्त्री-मजूर पुरुष-मजुरांपेक्षां कमी मजुरी घेऊनच काम करीत, ही गोष्ट आमच्या निदर्शनास आली. गांवामध्यें एकहि रयत किंवा सुखवस्तु मनुष्य या उच्च तत्त्वाप्रमाणें वागण्यास तयार नव्हता. 'तुम्ही म्हणतां तसें होणें आवश्यक आहे, आपली विचारसरणी योग्य आहे.' अशी तत्त्वतः ते कबुली देत पण प्रत्यक्ष कृतीमध्यें हा विचार उतरविण्यास एकाहि कुटुंबांतील कर्ता पुरुष तयार झाला नाहीं. चारसहा महिने या विचाराचा प्रचार करून, त्यांतील अपयश आम्हीं कबूल केलें. पुढें हा प्रचारहि बंद केला. या कामीं माझा बराच खर्च झाला, बरीच झीज सोसावी लागली. लोकांच्या आचरणांत हा सिद्धान्त येवो अथवा न येवो, आम्हांला मात्र या विचाराचें पाऊल आतां मागें घेतां येण्यासारखें नाहीं. आमच्याकडे जे स्त्री-पुरुष मजूर कामाला येतील त्यांची मजुरी एकच म्हणजे समान ठरविणें, हा आमचा धर्म होऊन बसला. तो आम्ही काटेकोरपणें पालन केलेला आहे. आम्ही पेरलेलें हें बी केव्हांतरी उगवणार व त्याला भलतेंच जोराचें पीक येणार अशी माझी श्रद्धा आहे. मला त्यांत शंका नाहीं.

६९.

## 'सत्यबोध' विद्यालयाची कल्पना आणि त्यांतील यश

केवळ पत्रव्यवहारानें शिक्षण देणारी एक संस्था आमच्या समितीच्या मार्फत चालविण्याचा विचार माझ्या मनांत आला. विद्यार्थ्यानें आपल्या घरींच राहावें व आपला शालेय शिक्षणक्रम जसा जेथें चालू असेल तसा तेथेंच चालू ठेवावा. फक्त प्रत्येक महिन्याच्या ता. १ व ता. १५ ला श्री. पुंडलीकजींच्या नांवें सविस्तर पत्र लिहून आपले विचार व प्रगति कळवीत राहावें. विद्यार्थी जेथें शिक्षण घेत असेल तेथील परीक्षेंत तो नापास झाल्यास 'सत्यबोध' विद्यालयांतूनहि त्याचें नांव काढून टाकण्यांत येईल. श्री. पुंडलीकजी आपल्या पत्रांतून ज्या सूचना वेळोवेळीं देतील त्याला अनुसरून विद्यार्थ्यानें घरीं आपलें वर्तन राखावयाचें असे. रोज प्रातःकाळीं आपल्या घरांतील सर्व वडील मंडळींना, त्यांच्या पायाला स्पर्श करून, नमस्कार करणें, गीतेचा किंवा गीताईचा एक अध्याय घरीं मोठ्यानें म्हणणें, अशी या 'सत्यबोध' विद्यालयाची फी ठेवलेली होती. आम्ही सुचवूं तीं पुस्तकें विद्यार्थ्यानें मिळवून घरीं वाचावीत व त्याविषयीं मला लिहावें. एखाद्या सार्वजनिक कामास किंवा एखाद्या परिषदेस अथवा कॉंग्रेसच्या अधिवेशनास मी जात असल्यास या 'सत्यबोध' विद्यालयांतील ज्या कोणा विद्यार्थ्यास त्यावेळीं सवड वा सुटी असेल त्याला आळीपाळीनें मी माझ्याबरोबर माझ्या खर्चानें नेत असे. त्याचप्रमाणें या 'सत्यबोध' विद्यालयांतील ज्या विद्यार्थ्याला, आपल्या शाळेमध्यें किंवा कॉलेजमध्यें परीक्षेंत पहिला नंबर आला असूनहि, घरच्या आर्थिक परिस्थितीमुळें पुढें शिक्षण चालू राखणें झेपत नसे किंवा तें बंदच करावें लागत असे, त्याचें शिक्षण पुढें चालू राखून पूर्ण करण्यास मी मदत करीत असें. या विद्यालयांतील हुशार पण गरीब विद्यार्थ्यांना हा मोठाच फायदा घेतां येत असे. हा सर्व खर्च माझ्या मित्रांकडून आणि अन्य परिचित धनवानांकडून मी मिळवीत असें. या सत्यबोध विद्यालयांमधील आठ विद्यार्थ्यांचें बी. ई. पर्यंतचें शिक्षण, दोन विद्यार्थ्यांचें एम. बी. बी. एस्. पर्यंतचें, दोन विद्यार्थ्यांचें बी. ए. एलएल्. बी पर्यंतचें,

व सहा विद्यार्थ्यांचें आयुर्वेदमहाविद्यालयांत शिक्षण पूर्ण करण्यास मी मदत करविलेली आहे. मॅट्रिकपर्यंतच्या सोळा विद्यार्थ्यांच्या शिक्षणास मी जबाबदार आहें. या विद्यालयांतील विद्यार्थ्यांची संख्या एके काळीं सत्तेचाळीसपर्यंत वाढलेली होती. पण तीन चतुर्थांशापेक्षांहि अधिक विद्यार्थी नियमित पत्र पाठविण्याच्या बाबतींत निष्काळजी किंवा उदासीन असत. 'या खेपेस वेळेवर पत्र लिहिलें गेलें नाहीं, याबद्दल क्षमा करावी' अशी पत्राची सुरुवात करणारे विद्यार्थीच पुष्कळ!! विद्यालयाची ही मामुली फी किंवा शुल्क देण्यासहि हयगय होत असे. आपल्या आईवडिलांना पायाला स्पर्श करून रोज नमस्कार करण्यास प्रथम प्रथम लाजणारे कांहीं विद्यार्थी होते. 'यांत त्यांचा किंवा आमचा काय फायदा आहे?' असेंहि मला पत्रांतून काहींनीं विचारलें आहे. कांहीं कांहीं विद्यार्थ्यांचीं पत्रें फारच सुंदर असत. सर्वांनीं आपापल्या पत्रांमधून आपली एखादी लहानपणची आठवण लिहावी, असें सर्वांना मी लिहिल्या-नंतर प्रत्येकाच्या पत्रांतून प्रत्येक वेळीं एकेक आठवण येऊं लागली. त्या आठवणी इतक्या सुंदर आहेत कीं त्यांचेंहि एक सुंदर पुस्तक होण्यासारखें आहे. 'सत्यबोध' विद्यालयानें निर्दिष्ट केलेलीं पुस्तकें वाचून, त्याविषयींचे आपापले अभिप्राय व त्यांतील प्रतिपादित विषयाचा ऊहापोह कांहीं प्रौढ विद्यार्थ्यांनीं आपापल्या पत्रांतून व्यक्त केलेला आहे, तोहि वाचनीय आहे. विद्यार्थ्यांच्या या पत्रांपैकीं कांहीं पत्रें मी जयपूर कॉंग्रेसच्या वेळीं पू. विनोबाजी यांना वाचून दाखविलीं होतीं. त्यांना माझा हा उपक्रम आवडला होता. या विद्यालयामध्यें शिक्षक, शिक्षिका, हायस्कुलांतील विद्यार्थी, कॉलेजमधील विद्यार्थी, व विद्यार्थिनी यांना प्रवेश दिला जात असे. शिक्ष-णाची जबाबदारी ज्यांच्या बाबतींत मी स्वीकारली होती तेवढी पूर्ण करण्यांत आली. नंतर अन्य कामाच्या दडपणामुळें ही प्रवृत्ति आवरती घ्यावी लागली. हें 'सत्यबोध' विद्यालय बंद केलें त्यावेळीं त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या तीस होती. महाराष्ट्र, कर्नाटक, खानदेश व वऱ्हाड या भागांतील हे विद्यार्थी होते. आणि त्यांचीं येणारी पत्रें मराठी, कानडी, इंग्रजी व हिंदी यांपैकीं एखाद्या भाषेंत असत. प्रत्येक विद्यार्थ्याच्या नावानें एकेक स्वतंत्र फाईल राखलें जात होतें. त्याच्या पत्रावरून त्यांची प्रगति कशी होत गेली हेंहि दिसून येत असे. प्रत्येक विद्यार्थ्याचा फोटो, व जन्म-लग्न-कुंडलीहि मागविण्यांत येत होती. विद्यार्थ्यांची झोपून उठण्याची वेळ आस्ते आस्ते पहांटे चारपर्यंत आणून ठेवावी, आपल्या घरांतील वडीलधाऱ्या लोकांविषयीं विद्यार्थ्यांच्या मनांत अत्यंत आदर कायम राहील असें करावें, विद्यार्थ्यांकडून आपल्या शाळा-कॉलेजांतील अभ्यास नीट करवावा, त्याला पूर्ण निर्व्यसनी राखावें, गांधींचे विचार आणि त्यांच्या भाष्यकारांचे विचार विशद करून सांगावेत व वाचून घ्यावेत, विद्यार्थ्यांचें जीवन सैद्धांतिक जीवन बनविण्याचा प्रयत्न करावा आणि या सर्वांचा परिणाम म्हणून विद्यार्थ्यानें खरे देशभक्त व निष्ठावंत देशसेवक बनावें हें ध्येय आमच्या 'सत्यबोध' विद्यालयानें ठेविलेलें होतें. त्या दिशेनें हा एक नम्र प्रयत्न होता. गांधीजींच्या

विचाराचे भाष्यकार म्हणजे काकासाहेब कालेलकर, किशोरलालजी मश्रूवाला, विनोबाजी, नरहरभाई परेख आणि महादेवभाई देसाई यांचें लेखनच मुख्यत्वें विद्यार्थ्यांच्या वाचनांत यावें व संस्कार घडण्यास मदत व्हावी ही दृष्टि आमची असे. विद्यार्थ्यांना अशा प्रकारचे संस्कार देण्याच्या कामीं आमच्या 'सत्यशोध' विद्यालयाला किती यश आलें असेल याचें मोजमाप करण्याचें साधन आमच्यापाशीं नाहीं. या विद्यार्थ्यांतील कित्येक विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष पहाण्याचा योगहि मला लाभलेला नाहीं. मला येत असलेल्या पत्रांवरून मात्र कोणाहि दिसून येण्यासारखें आहे कीं विद्यार्थ्यांच्या विचारामध्यें व आपले विचार व्यक्त करण्याच्या त्यांच्या मांडणीमध्यें ज्याची प्रगति झालेली नाहीं असा एकहि विद्यार्थी आढळून आलेला नाहीं. कांहीं विद्यार्थ्यांच्या पालकांनींहि पुढें या विद्यालयांत आपलें नांव दाखल करून घेतलेलें आहे. त्यामुळें त्या विद्यार्थ्यांच्या घराण्याशींहि माझा व्यक्तिशः घरोबा वाढलेला आहे. या माझ्या विद्यार्थ्यांच्या भावी जीवनामधील अनेक समस्यांमध्यें मी लक्ष घालीत आलों आहें. सल्लामसलतीचें माझें हें काम आतां कधींच न संपणारें होऊन बसलें आहे.

७०.

## बालमंदिराची स्थापना व प्रगति

आमच्या 'समग्र ग्राम सेवा समितीच्या' मनांत एक 'बालमंदिर' स्थापन करण्याचा विचार कार्याची नवीन घडी बसवितांना आला. स. १९४४ मध्यें तुरुंगांतून मुक्त होऊन बाहेर आल्यापासून तो विचार डोक्यांत होता. सहा वर्षांपर्यंतची मुलें व मुली त्यांत ध्यावींत, ज्यांचा उपयोग घरीं रयतांचीं गुरें रानचराईला नेण्यासाठीं होत नाहीं व तीं शाळेलाहि जाऊं शकत नाहींत असे बालगोपाल जमवावेत अशी बालमंदिराची योजना होती. त्यासाठीं मुंबईतील अनेक बालमंदिर संस्थांमध्यें मी स्वतः निरीक्षणार्थ जाऊन आलें. येतांना पांचशें रुपयांचीं खेळणीं मुलांसाठीं हुदलीस आणलीं. तीं खेळणीं पाहून मुलांना आनंद झाला. आपल्याला हीं रंगीबेरंगी उत्तम खेळणीं रोज खेळायला मिळणार याचा परमानंद त्यांच्या बालमुखांवर नाचूं लागला. खेळतांना तीं मोडलीं तरी हरकत नाहीं, पण हसतां खेळतां मुलांनीं शिकावें हा त्यांत हेतु होता. या बालमंदिरामध्यें खेळण्याच्या नादानें मुलें रमतात आणि खेळण्याच्याच माध्यमानें सामान्य अक्षरज्ञानाशीं तीं परिचित होतात हें मीं प्रत्यक्ष पाहिलेलेंच होतें. या बालमंदिरामध्यें मुलांना शिकवण्यासाठीं प्रेमळ अंतःकरणाची प्रौढ शिक्षिकाच अधिक उपयोगी पडते. हें जाणून येथेंहि एका शिक्षिकेलाच मुलांवर देखरेख करण्यास ठेवलें. बालमंदिरांत मुलें येतांच त्यांचे हात, पाय, नाक, डोळे, दांत, तोंड या शिक्षिकेनें स्वच्छ राखावे, मंदिरांत असतांना तेवढ्यापुरते प्रत्येकाचे वेगळे स्वच्छ कपडे त्यांना वापरण्यास द्यावेत आणि ज्यायोगें मुलें या मंदिरांत अधिक काळ रमतील असे प्रयत्न करण्यांत यावेत अशी योजना होती. या बालमंदिरांतील कोणतीहि वस्तु किंवा खेळ कोणालाहि न विचारतां आपण वापरूं शकतों आणि तो खेळ मोडला, तुटला किंवा फुटला तरी कोणी रागावत नाहीं, कोणी बोलतहि नाहीं. सर्व आमचेंच राज्य आहे असा विश्वास व अनुभव त्यांच्या मनांत उत्पन्न होऊं दिला. त्यामुळें मुलांना या बालमंदिराची ओढ लागली. घरोघर जाऊन मुलें गोळा करण्याचे प्रसंग

कमी कमी येऊं लागले. अशा तऱ्हेनें मुलें जमूं लागल्यानंतर त्यांना गमतीगमतीचीं गोड गाणीं शिकवणें, मजेमजेच्या गोष्टी सांगणें, या कार्यक्रमामुळें तर मुलें या मंदिरांत अधिकच उल्हसित राहूं लागलीं. त्यासाठीं ती शिक्षिकेच्या कच्छीं असत. त्यांना तो एक व्छाच लागला. अशा तऱ्हेचें कार्य एखादी सुशिक्षित प्रेमळ स्त्री कार्यकर्तीच करूं जाणे. तें काम पुरुषाच्या हातून इतकें सहज होणार नाहीं. तो मुलांकडून कांहीं कमीअधिक झाल्यास दडावणी दाखवील, मारील, आणि सवापून पोराल घालून देईल, आणि बालमंदिर चालविण्यांतील हेतु धुळीला मिळून जाईल. स्वातंत्र्याच्या अनेक चळवळींमध्यें आम्ही जात असल्यामुळें व अन्य कारणानें जेव्हां हें बालमंदिर बंद करण्याचा निर्णय आम्हांला घ्यावा लागला तेव्हां हें सर्व खेळण्याचें सामान पेटाऱ्यामध्यें भरून तो व्यवस्थित बंद केला आणि हुबळी येथील श्रीमती उमाबाई कुंदापूर यांनीं उत्तम रीतीनें चालविलेल्या बालमंदिराला आमच्या समितीची देणगी म्हणून तीं खेळणीं आनंदानें देऊन टाकलीं. आमच्या या बालमंदिरासाठीं मुंबईच्या श्री. शंकरराव सोहनी यांनीं दिलेल्या मनुष्याच्या पोटांतील, छातींतील, डोक्यांतील, डोळ्यांतील अवयवांची माहिती करून देणारीं विविध मॉडेल्स अथवा मातीच्या प्रतिकृती, त्यावरील कांचेच्या कपाटांसह हुदली येथील प्राथमिक शाळेला देणगी म्हणून देण्यांत आली. हें बालमंदिर बंद करून मुलांच्यासाठीं मुद्दाम विकत घेतलेलें खेळाचें सामान हातावेगळें करतांना मला अत्यंत दुःख झालें. हें सामान मी पेटाऱ्यांत भरीत असतां एक रयत—यल्लाप्पा तुकार—उपस्थित होता. त्यालाहि फार वाईट वाटलें. गांवांतील लहान मुलें व मुली रस्त्यांत धुळीमध्यें खेळत असलेलीं पाहतांना मला आमच्या बालमंदिराचें स्मरण झाल्याशिवाय रहावत नाहीं. लहान मुलांचीं खेळणीं आणि त्यांतून शिक्षण देण्याची कल्पना आज इतकी प्रगत झाली आहे कीं प्रौढांनाहि आपण पुनः बाल होऊन या खेळ साधनांचा उपभोग घ्यावा, त्या स्वैर खेळण्यांतील आनंद मनमुराद लुटावा, असें वाटल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

त्यांतल्या त्यांत आज समाधानाची गोष्ट एवढीच आहे कीं 'गांधीस्मारक निधी'तर्फे, हुदलीमध्यें 'गांधी घरा'ची स्थापना झाली व त्यासाठीं इमारतहि झाली असून या कार्याला बालमंदिरापासूनच सुरवात झालेली आहे. त्यासाठीं एका शिक्षिकेची नियुक्ति झाली आहे. हें बालमंदिर शास्त्रीय पद्धतीनें मुबलक साधनांच्या द्वारां चालविलें जाईल तर गांवांतील प्राथमिक शाळा व त्यांतील शिक्षण यांत बरीच प्रगति झाल्यावाचून रहाणार नाहीं. गांवांतील लोकांचें लक्षच आपल्या मुलांकडे व त्यांच्या शिक्षणाकडे असावें तसें नाहीं, ही यांतील खरी उणीव आहे. जनतेच्या मनावर ही गोष्ट बिंबवून देणारे व त्यांचें ध्यान याकडे आकृष्ट करून घेणारे शिक्षक मिळूं शकतील तेव्हांच या उपक्रमाला महत्त्व येऊं शकेल व त्याचे सुपरिणामहि सर्वांना प्रत्यक्ष दिसून येतील.

७१.

## गु. गंगाधरराव यांचा वाढदिवस साजरा करण्यांत आला

सन १९४६ सालीं मार्चअखेर गु. गंगाधरराव यांचा वाढदिवस साजरा करण्याची कल्पना कांहीं कार्यकर्त्यांच्या मनांत आली, व हुदलीमधील जनतेनें ती हौसेनें उचलून धरली. हा वाढदिवस सार्वजनिक रीतीनें साजरा करावा असें ठरलें. त्या दिवशीं गंगाधररावांच्या फोटोची मिरवणूक गांवामध्यें काढण्यांत आली होती. या मिरवणुकीचें पर्यवसान पुढें जाहीर सभेमध्यें झालें. या समारंभासाठीं वेळगांवहून श्री. जीवनराव याळगी व श्री. के. एस्. पाटील वकील यांना पाहुणे म्हणून मुद्दाम बोलावण्यांत आलें. गु. गंगाधरराव यांच्या गुणवर्णनपर या दोन्ही पाहुण्यांचीं भाषणें झालीं. व शेवटीं रीतसर आभार, प्रत्याभार व हारतुरे झाल्यानंतर त्या सभेचें काम संपविण्यात आले. या समारंभासाठीं कुंदरनाडमधील कांहीं जागृत खेड्यांतील कार्यकर्तेहि उपस्थित राहिले होते. त्याच दिवशीं रात्रीं पोवाडे, गी–गी–पदें (लावणी), फ्लूटवादन, व भजन असा कार्यक्रम झाला. या कामीं गांवांतील सर्व लोकांनी भाग घेतलेला असला तरी त्यांतहि श्री. नारायण वंडो देशपांडे, गंगाप्पा यमकनमर्डी यांचा विशेष पुढाकार होता. श्री. ना. बं. देशपांडे हा कार्यकर्ता त्यावेळीं मदवाल येथें छात्रालय चालवीत होता. ग्रामसेवक म्हणूनच त्याला तेथें नियुक्त करण्यांत आलें होतें. त्यानें स्वतःच मदवालमध्यें शिकवून तयार केलेला मेळा या वाढदिवससमारंभासाठीं मुद्दाम हुदली येथें आणिला होता. त्या मेळ्याचा कार्यक्रमहि चांगला झाला. गंगाधररावांच्या फोटोच्या मिरवणुकीमध्यें या मदवालच्या मेळ्याने प्रामुख्यानें भाग घेतला होता. गांवांतील सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांनीं मोठ्या हौसेनें यांत भाग घेतला होता. गांवांतील हरिजनबंधूंनी या वाढदिवस-समारंभामध्यें विशेष आस्था दाखविली होती. हुदली गांवांतील हरिजनांविषयींची अस्पृश्यतेची भावना जवळजवळ नाहींशी होण्यास गु. गंगाधररावांचे परिश्रम व प्रत्यक्ष आचरणच कारणीभूत झालेलें आहे. या अनुभवाची कृतज्ञता व्यक्त करण्याची ही सुवर्णसंधी हरिजन बंधूंनीं या समारंभांत

उत्साहानें भाग घेऊन साधून घेतली. या वाढदिवस समारंभामुळें, गंगाधररावांचें भारतीय राजकारणांतील स्थान, कार्य आणि योग्यता याची सामान्य कल्पना लोकांना विदित झाली. आपले धनी गंगाधरराव फार मोठे आहेत, एवढेंच त्यांच्याशीं संबंध आलेल्या लोकांना हुदलींत माहीत होतें पण या समारंभानें त्यांचें मोठेपण कां व कशासाठीं आहे याचें चित्र लोकांच्या डोळ्यांपुढें निरंतर उभें राहण्यास मदत झाली.

## ७२.

## संरंजाम कार्यालयाचा उपक्रम स. १९४६

'समग्र ग्राम समिती' मध्यें गांवांतील एका सुताराचा मुलगा चि. रामचंद्र वडगेर हा दाखल झाला. हा मुलगा सात्त्विक व सत्प्रवृत्त आहे. त्याला हुदली येथील चरखा संघाच्या सरंजाम कार्यालयांत शिक्षणासाठीं पाठवून देण्यांत आलें. चि. रामचंद्र वडगेर याच्या हातामध्यें सुतारीची कला भरपूर असल्यामुळें त्यानें चरखा, माग, वगैरेंना लागणारें सामान अधिक सुबक रीतीनें तयार करण्याचें शिकून घेतलें, एवढेंच नव्हे तर त्यांत त्यानें आपल्या कल्पकतेनें प्रगतीहि करून दाखविली. हुदलीकेंद्रांहि हुदलीच्या सरंजाम कार्यालयांतील मालाला अधिक महत्त्व प्राप्त झालें. हा मुलगा आमच्या समितीला लाभल्यामुळें त्याच्यासाठीं म्हणून मी आमच्या समितीमध्यें सरंजाम कार्यालयाची स्थापना केली. सुतारीचीं बहुतेक साधनें व हत्यारें विकत घेऊन सरंजाम कार्याची पूर्ण सिद्धता करून देण्याकडे माझी सर्व शक्ति सुमारें दोन वर्षे खर्च केली आहे. या सरंजाम कार्यालयाचा परिणाम आमच्या समितीचें नांव अखिल भारतीय विधायक कार्यक्रमाच्या संस्थांमध्यें उल्लेखिलें जाण्याइतका झालेला आहे, यांत शंका नाहीं. अंबरचरख्याच्या उत्पत्तीच्या दृष्टीनेंहि या सरंजाम कार्यालयाचा चांगला उपयोग झाला आहे. सरंजाम कार्यालयाची संघटना व व्यवस्था चि. रामचंद्र वडगेर यानें चांगली ठेवली होती. हुदली गांवांतील सुतारांचीं मुलें या सरंजाम कार्यालयात दाखल करून घेऊन, त्यांना उत्तम सुतार बनविण्याच्या कामातहि त्यानें बरेंच यश संपादून दाखविलें होतें. या शिकाऊ मुलांना पहिल्या दिवसापासूनच मजुरी देण्यास आम्ही प्रारंभ केल्यामुळें, आपलीं मुलें या सरंजाम कार्यालयांत दाखल करण्यास कोणीहि आडकाठी घेत नसत. विणकाम वर्ग व हा सरंजाम कार्यालयांतील सुतारीचा वर्ग चालू होता तोंपर्यंत समितीच्या कामाचें प्रदर्शन पाहुण्यांसमोर चांगलें होत असे. तें पाहून पाहुणेहि संतोष व्यक्त करीत असत. याच्या जोडीला समितीमध्यें चालू असलेल्या संबंधित कामांचा व्यापहि पाहुण्यांना पहावयास मिळत असे.

खेड्यांतील स्त्रियांच्याकडून सूत विकत घेणें, सुताची प्रतवारी करणें, विणकरांना सूत वजन करून देणें, विणकरांकडून खादी वजन करून घेणें, विणलेल्या खादीचे तागे धोब्यास मोजून देणें व धुवून आणलेले तागे मोजून घेणें, हीं सर्व कामें पाहून बाहेरचा मनुष्य खूष होत असे.

या सरंजाम कार्यालयांत आणखी एकदोन कार्यकर्त्यांची तरी सोय करतां येईल असें आम्हाला प्रथम वाटत होतें, पण आतां त्यात ८।१० कार्यकर्ते काम करीत आहेत. लोकलबोर्डाच्या प्राथमिक शाळेच्या शिक्षकांच्या शिबिरास लागणाऱ्या सुतारीच्या सामानांचा व साधनांचा पुरवठा या सरंजाम कार्यालयाकडून झालेला आहे. समितीच्या कामासाठीं, इमारती बांधविवांना लागणाऱ्या सुतारीच्या मदतीचा प्रश्नहि या सरंजाम कार्यालयानें बराच सोडविलेला होता. स. १९४८ अखेरपर्यंत या सरंजाम कार्यालयानें ८६ येरवडा चरखे, ४४० किसान चरखे आणि सहा माग तयार करून विकलेले आहेत. या सरंजाम कार्यालयांत समितीनें सुमारें दोन हजार रुपये गुंतविलेले होते. पांच कार्यकर्त्यांना सुतारीचें संपूर्ण शिक्षण या सरंजाम कार्यालयानें दिलेलें आहे. चि. रामचंद्र बाळकृष्ण बडगेर यासच या विभागाचे प्रमुख (प्रिन्सिपाल) म्हणून नेमण्यांत आलें होतें.

पुढें समितीचें काम जेव्हां मीं बंद केलें त्यावेळीं उरलेलें लाकूड व सर्व सुतारीचीं हत्यारें चि. रामचंद्र बडगेर यांस देऊन टाकलीं आहेत. त्या हत्यारांचा यापुढील इतिहास या ठिकाणीं सांगत बसण्याचें मी मुद्दाम टाळलेलें आहे.

७३.

## खादी कार्याची नवीन घडी आणि अनेक पेचप्रसंग

चळवळींतून थोडीशी उसंत मिळण्यासारखी परिस्थिति, आम्ही सर्व कार्यकर्ते स. १९४४ मध्यें तुरुंगांतून मुक्त होऊन बाहेर पडल्यावर उत्पन्न झाली होती. स. १९४८ अखेरपर्यंत खादी कार्याची नवीन घडी बसविण्याकडे सर्वांचेंच लक्ष लागलेलें होतें. 'समग्र ग्रामसेवा समितीच्या' स्थापनेनंतर त्याला चालना यावीच लागली. या चार वर्षांत (स. १९४४–४८) त्या दृष्टीनें बरेंच काम उभारलें गेलें होतें. वर्षाला ६७७१ चौ. गज खादी विणली जाण्याइतकी पुनः संघटना होऊं शकली होती. सुमारें दहा हजार रुपये किंमतीची खादी विणली व विकली जाऊं लागली होती. याशिवाय कांहीं लोक स्वतः कातलेल्या सुताची खादी वेगळी विणवून घेत तें काम वेगळेंच होई. कांहीं लोक स्वतःच्या सुताच्या मोबदल्यामध्यें मिळेल तेवढी खादी घेऊन जात असत. स्त्रियांनीं कातलेल्या सुताचीं, सूत रंगवून लुगडीं विणून देण्यांत येत होतीं. त्यासाठीं सूत रंगविण्याचें एक रंगखातें समितीमध्यें कांहीं काळ चालविण्यांत आलें होतें. बाहेरूनहि सूत रंगविण्यास देऊन आणलें जात असे. विणकरांना या समितीकडून विणाईच्या रूपानें मजुरी म्हणून सुमारें रु. ३६५० दर वर्षी वाटले जात असत. आमची खादी विणाई, खादीविक्री, यांचें काम झपाट्यानें वाढत चाललें असतांना, खादी विद्यालय व घेरड छात्रालय आणि कार्यकर्त्यांची स्वतंत्र खेड्यांमधून नियुक्ति यांचें तंत्र जमत चाललें असतांना, आमच्यापुढें अनेक समस्या येऊन उभ्या राहिल्या. त्या सोडवून कांहींतरी निर्णय घेतल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. त्या बिकट समस्यांचें त्रोटक दर्शन व आम्ही घेतलेले निर्णय येथें दिल्यास ते उद्बोधक झाल्याशिवाय राहणार नाहींत. मी, श्री. रामचंद्र वडवी व कांहीं प्रसंगीं चि. गंगाप्पा यमकनमर्डी मिळून या समस्यांचा विचार करीत होतों. तथापि प्रत्यक्ष निर्णय घेण्याची जबाबदारी आम्हा दोघांवर म्हणजे मी व श्रीयुत वडवी यांच्यावरच विशेषतः होती. कै. गु. गंगाधरराव यांचें मार्गदर्शन आमच्या पाठीशी होतें ही गोष्ट

वारंवार उल्लेखण्याची आवश्यकता नाहींच. सर्व कांहीं त्यांच्याच प्रोत्साहनावर चाललें होतें.

## १ श्री. वडवी यांना चरखा संघाचा चिटणीस म्हणून हुबळीस पाठवावयाचें किंवा नाहीं?

चरखा संघाचे चिटणीस म्हणून नियुक्त करण्यासाठीं श्री. कह्मापूर, श्री. व्यंकटरामय्या व श्री. वडवी अशीं तीं नांवें आलेलीं होतीं. या बाबतींत माझा व श्री. जाजूजींचा पुष्कळच पत्रव्यवहार झालेला आहे. मी अनुमति दिल्याशिवाय श्री. वडवी हुदलीचें काम सोडून जाण्यास तयार नव्हते. श्री. वडवी हुबळीला गेल्याव आमचें खादीचें काम ढासळून पडणार, असें मला वाटत होतें. खादीच्या चळवळीला पार्श्वभूमि म्हणून असलेल्या तत्त्वज्ञानाची मी कितीहि चर्पटपंजरी केलेली असली तरी त्यांतील प्रत्यक्ष हात काम, हिशेब, वजनमाप आणि असेंच अन्य तंत्र मला कांहींच समजत नसल्यामुळें श्री. वडवींना हुबळीस पाठवण्याचें धैर्य मला होईना. शिवाय मला अशीहि एक भीति होती कीं श्री. वडवी यांना त्या वेळीं इंग्रजी नीट समजत नसल्यामुळें त्यांना हुबळीस नेऊन, त्यांच्यावर 'नालायकी'चा छाप मारून परत पाठविण्यांत येईल. मी श्री. वडवींना श्री. जाजूजींची मागणी होतांच हुबळीस पाठविलें असतें तर श्री. व्यंकटरामय्यांचें नांव कधींच पुढें आलें नसतें. श्री. कह्मापूर यांच्या हातांत अनेक कामें होतीं. तीं सर्व सोडून त्यांना सेक्रेटरी म्हणून येतां येण्यासारखें नव्हतें. पुढें कांहीं कालानंतर श्री. जाजूजींच्या वडवींबद्दलच्या मागणीच्या विनंतीला मी मान्यता दिली. या गोष्टीला माझें मन अनुकूल होण्यास श्री. रघुनाथराव धोत्रे उर्फ भाई यांच्याशीं झालेली चर्चाच वास्तविक खरी जबाबदार आहे. आमच्या 'समग्र ग्रामसेवा समिती'ला चरखा संघाच्या सहानुभूतीची व मदतीची अनेकदां आवश्यकता लागत असल्यामुळें, आमचा मनुष्य वर जाऊन तेथें सेक्रेटरी होऊन बसल्यास वाईट नाहीं, हा विचारहि माझ्या मनांत होता. या विचारमंथनांत बराच काळ गेला. हुदलीच्या खादी कामावर वारंवार नजर ठेवण्यास श्री वडवींनीं हुदलीस यावें असें ठरवून, मी त्यांना हुबळीस जाऊं दिलें. आमच्या अपेक्षेप्रमाणें श्री. वडवी सेक्रेटरी झाल्यामुळें हुदलीच्या कामाला कांहीं खास फायदा झाला आहे, असें म्हणतां येण्यासारखें नसलें तरी हुदलीच्या कामामध्यें नसत्या अडचणी आल्या असत्या, निर्णय मिळण्यास व्यर्थ दिरंगाई झाली असती, ती मात्र टाळतां आलेली आहे, एवढें कबूल केलेंच पाहिजे. चरखा संघाच्या घटनेची चौकट अशी होती कीं त्यांत कोणालाहि कांहीं नियमाबाहेर करतां येण्यासारखें नव्हतें. तथापि हा निर्णय घेण्यांत आम्ही कांहीं चूक केली असें आजहि मला वाटत नाहीं. श्री. वडवींना जो अनुभव मिळाला, त्यांची सेवा करण्याची कुवत वाढली, त्यांच्यामधील सुप्त शक्ति व्यक्त झाली, त्याचा आत्मविश्वास वाढला, आणि

कर्नाटकाला एक अव्वल दर्जाचा खादीतज्ञ किंवा खादी कार्यकर्ता लाभला, त्याची किंमत कितीतरी अधिक आहे. भारताएवढी व्यापक दृष्टि त्यांना आल्यामुळें हुदली येथील खादीच्या कामापुरतेंच संकुचित दृष्टीनें पाहणें त्यांना योग्य वाटेनासें झालें. पुढें हुदलीमध्यें काम करीत असलेल्या आम्हांलाहि या गोष्टी स्पष्ट दिसूं लागल्यामुळें आमचे आग्रह कमी कमी होत गेले. आणि आमच्या मागण्यांची संख्या आपोआप संपुष्टांत आली. श्री. वडवींनीं चरखा संघाचा सेक्रेटरी म्हणून यशस्वी रीतीनें काम करून दाखविल्यामुळें त्यांच्या श्रेयाचा वांटाहि हुदलीच्या पदरांत पडल्यावांचून राहिलेला नाहीं. श्री. वडवींना हुब्बळीस सेक्रेटरी म्हणून पाठवावें किंवा नाहीं या बाबतींतील अखेरचा निर्णय कै. गंगाधरराव यांनीं माझ्यावर सोंपवलेला होता. श्री. वडवींनीं सेक्रेटरी म्हणून हुब्बळीस जावें या गोष्टीस गंगाधरराव प्रथमपासूनच अनुकूल होते. हा निर्णय घेण्यास विलंब लागला तो माझ्यामुळेंच होय. मी हा निर्णय प्रारंभींच झटकन घेतला असता, तर हुदलीच्या खादी कार्याच्या घटनेचा इतिहास वेगळाच झाला असता.

## २ खादी विद्यालय चालविण्याची नीति कोणती?

विद्यालयामध्यें कर्नाटक व महाराष्ट्रांतील बाहेरचे विद्यार्थी दाखल करून घेऊन त्यांना शिक्षण देऊन पाठवावें किंवा गांवांतील मुलांना दाखल करून घेऊन, त्यांना शिक्षण देऊन त्यांच्याकडून हुदली व हुदलीच्या आसपासच्या खेड्यांची सेवा व सुधारणा करवून घ्यावी, हा आमच्यापुढें सवाल होता. आम्ही चारपांच वर्ग शिकवून तयार केले परंतु त्यांतील एकहि विद्यार्थी आमच्या हातीं लागला नाहीं. 'चारा खा, पाणी पी आणि भुर्रदिशीं उडून जा' असाच अनुभव येऊं लागला. म्हणून आम्ही ठरविलें कीं केवळ बेळगांव जिल्ह्यांतीलच आणि जमलें तर खास हुदली व आसपासच्या खेड्यांतीलच मुलांना खादी विद्यालयांत दाखल करून घ्यावें. त्याप्रमाणें निपाणीच्या भागांतील सुमारें पंचवीस मुलांना या विद्यालयांत दाखल करून घेतलें. त्यांत तीनचार स्त्रियाहि होत्या. श्री. अनंतराव कटकोळ, निपाणी येथील एक प्रसिद्ध निष्ठावंत समाजसेवक व विधायक कार्यकर्ते, काँग्रेसभक्त, यांची पत्नी सौ. आशाताई कटकोळ याहि त्या वर्गांत दाखल झालेल्या होत्या. या बॅचमधील सर्वांत होतकरू असा विद्यार्थी चि. दिवाकर हरिदास याच्याकडे माझें विशेष लक्ष गेलें होतें. त्यानें पुनः कॉलेजमध्यें जाऊन आपलें शिक्षण पुरें करून घ्यावें आणि मग पुन्हा या विधायक कार्यांत आपलें जीवन खर्च करावें, असें मला वाटत होतें. त्याप्रमाणें त्यानें आपलें कॉलेजचें शिक्षण संपविलें. त्याच्यावर अन्य अनेक कार्यकर्त्यांचे संस्कार झाले. तो या कार्यांतच राहिलेला असला तरी आमचा संबंध तितकासा राहिला नाहीं. गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर त्याची श्रद्धा व निष्ठा होती, व आहे. भूदानयज्ञाच्या आंदोलनांत त्यानें बेळगांव जिल्ह्यामध्यें व अन्यत्र पुष्कळच कार्य केलेलें आहे. बेळगांव जिल्ह्यांतील एक निष्ठावंत कार्यकर्ते श्री. सदाशिवराव

भोसले उर्फ कुट्रे याच्याप्रमाणें पू. विनोबाजींच्या परिसरांत त्याची सर्वांना माहिती झाली, भारतांत त्याचा प्रवासहि पुष्कळच झाला. पण त्याच्याविषयींचें जें चित्र मी माझ्या मनांत रेखाटून ठेवलें होतें तें मात्र साकार होऊं शकलें नाहीं. त्याचें सर्व कुटुंबच देशसेवक होतें व आहे. आज तो सर्व चळवळींतून आपलें अंग काढून घेऊन आपल्या खटकलाट गांवीं सहकारी शेतीचा प्रयोग करून, आपल्या हातून होईल ती स्थानिक जनतेची सेवा करीत आहे.

स्थानिक हुदली किंवा हुदलीच्या जवळपासचीं खेडीं आणि बेळगांव जिल्हा एवढ्याच भागांतील विद्यार्थ्यांना किंवा कार्यकर्त्यांना खादीविद्यालयांत दाखल करून घेण्याचा जो निर्णय आम्ही घेतला होता तो चुकीचा ठरला, असें आज मला वाटतें. संबंध कर्नाटक व महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांना या विद्यालयांत दाखल करून घेऊन त्यांच्यावर शक्य ते संस्कार करीत रहाण्याचेंच आम्हीं पूर्ववत चालू राखलें असतें तर आज ज्या अनेक समस्या आमच्यापुढें येऊन उभ्या राहिलेल्या आहेत, त्या येता ना. आम्ही त्यांपासून बचावलों असतों. इतर शाळा प्रशाळा जशा चालतात किंवा विद्यालयें आणि महाविद्यालयें चालली आहेत त्याप्रमाणेंच. आमचें हें विद्यालयहि चालत राहिलें असतें. हुदली गांवामध्यें प्रत्यक्ष जनतेकडून किंवा जनतेच्या मदतीनें जेवढी अन्य ग्रामसेवा झाली असती तेवढ्यावरच समाधान मानून आम्ही चालवयास पाहिजे होतें. अति महत्त्वाकांक्षा सुद्धां पतनाला कारण होते, असें म्हणतात तें आमच्या अनुभवाला व वांट्याला आलें. यांतून मिळालेला हा अनुभव आणि ज्ञान हीं मात्र आम्हांला महागांत पडलीं. चालून गेलेला रस्ता मनुष्य एकदांच चालतो. पुनः पुनः 'थुंकशी' म्हणून वागण्याची सोय काळानें ठेविलेली नाहीं.

## ३ बाहेर पाठवलेल्या कार्यकर्त्यांना परत हुदलींत आणावें काय ?

एक काळ असा होता कीं हुदलीमध्यें आमच्या आश्रमाशीं संबंध आलेल्या व आश्रमामध्यें अथवा नवीन समितीमध्यें शिक्षण घेतलेल्या कार्यकर्त्यांना कामासाठीं जिल्ह्याच्या बाहेर व जमल्यास प्रांताच्या बाहेरहि पाठवावें असें मला वाटत होतें. खादीची प्रक्रिया, सरंजामाच्या साधनांची उत्पत्ति व गांधीतत्त्वज्ञान वगैरेंची शिकवण देणाऱ्या शिक्षकांची मागणी अन्य प्रांतांतूनहि यावी व ती हुदलीनें पुरवावी अशी माझी महत्त्वाकांक्षा होती. अर्थात् त्याप्रमाणें मी हुदलीहून अनेक कार्यकर्त्यांना बाहेर पाठवूंहि शकलो होतों. परंतु हुदलीमधील कार्याचा व्याप वाढूं लागल्यानंतर आणि तो अधिक वाढूं शकेल व वाढणार आहे असें दिसून आल्यानंवर, बाहेर काम करीत असलेल्या अथवा पगारी नोकर म्हणून चरखा संघामध्यें काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांना कांहींहि करून परत हुदलीमध्यें आणवावें असें आम्हीं ठरविलें. कार्यकर्त्यांनें जेथल्या तेथेंच म्हणजे आपल्या गांवीं, निदान आपल्या जिल्ह्यामध्येंच काम करावें हेंच स्वदेशी धर्मामध्यें बसतें, असें मीं कोठेंतरी वाचलें

असल्याचा जो संस्कार माझ्या बुद्धीवर झाला होता तो उफाळून वर आला. बहुधा या विचारांचा लेख श्री. पिंपुटकर यांच्या संपादकत्वाखालीं तेव्हां निघत असलेल्या 'लोकशिक्षण' मासिकांत पू. श्री. काकासाहेब कालेलकर यानींच लिहिलेला असावा. कांहीं कार्यकर्त्यांना त्या कल्पनेप्रमाणें मी परत हुदलीमध्यें आणूं शकलों. कांहीं आले नाहींत. ते आले असते तर त्यांच्या कायमच्या उपजीविकेचा प्रश्न आम्ही सोडवूं शकलों नसतों. एका दृष्टीनें ते आले नाहींत हेंच परिणामीं त्यांच्या हिताचें ठरलें. जे कार्यकर्ते बाहेरच राहिले तेवढेच पुढील सर्व कुसंस्कारांतून बचावलेले आहेत किंवा त्यांच्या बन्यावाईट निघण्याची जबाबदारी तरी आमच्यावर येऊन पडूं शकत नाहीं. बाहेर गेलेल्या कार्यकर्त्यांना परत आणविण्याचें आमचें धोरण किंवा नीति चुकीची व आत्मघाताची ठरली. त्यांना हुदलीस परत बोलावून त्यांचें जीवननिष्ठाविषयक नुकसान आम्हींच केल्याप्रमाणें झालें आहे. गांधीसिद्धांत व विधायक कार्य यांवरील त्यांची दृष्टी चळली. आपली व आपल्या कुटुंबांची आर्थिक स्थिति कशी सुधारावी व त्यांत शक्य तितक्या लौकर कशी भर घालावी याकडेच त्यांचें अधिक लक्ष गेलें. या उद्देशाला जरूर तेवढेंच काम करावें व वित्तार्जनासाठींच तें वाढवावें, कार्याच्या व्यापावरच आपली आर्थिक सुधारणा होत जाते, हें समीकरण बसविण्याची कला प्रवासामुळें आणि अन्य ठिकाणच्या लहानथोर कार्यकर्त्यांच्या संसारामुळेंच त्याना कळून आली आणि शिकतां आली. प्रवास, थोर कार्यकर्त्यांचा सहवास, विद्याव्यासंग व थोर तत्त्वज्ञान यांपासून मनुष्य आपापल्या कुवतीप्रमाणें गुणदोष उचलतो. ज्याची बौद्धिक पातळी किंवा स्तर खालच्या प्रतीची होती त्यांनीं वरील सर्व चांगल्या गोष्टी वगळून त्यांतील दोषच उचलले. कोणतीहि संधी कोणालाहि अनुकूल किंवा सहजसुलभ करून देण्यापूर्वी त्याचा बौद्धिक दर्जा, त्याची मानसिक पातळी, त्याचे पूर्वसंस्कार हे त्याला जुळणारे आहेत किंवा नाहींत याचा विचार झाला पाहिजे. आजान्याला रक्त देतांना, नवीन रक्त त्याच्या रक्ताशीं जुळणारें आहे किंवा नाहीं याची परीक्षा शास्त्रीय रीत्या करून करावी लागते. ती तशी झाल्यानंतरच या नव्या रक्ताचा गुण त्या रुग्णाच्या उपयोगीं पडतो. हें आमच्या ध्यानांत येण्यास फार वेळ लागला. तें कळून येईपर्यंत त्याचे जे दुष्परिणाम व्हावयाचे ते होऊन गेलेले होते. एवढेंच नव्हे, तर ते आमच्या आवांक्याबाहेरहि गेले होते. 'आम्ही सांगत आहोंत म्हणूनच त्याप्रमाणें वागलें पाहिजे' या वृत्तीपासून घसरत घसरत 'आम्ही सांगत आहोंत म्हणूनच तसें वागतां कामा नये!' येथपर्यंत कांहींची मजल गेली. त्याचा फायदा ज्यांना जितका घेतां आला तितका त्यांनीं घेतला. तसें झालें नसतें तरच आश्चर्य! ज्यांना स्वार्थाशिवाय दुसरा विचारच कधीं शिवला नाहीं ते लोकच आम्हांला समाजसेवेचे व देशभक्तीचे धडे देऊं लागले. आमच्याबरोबर कार्य करणाऱ्यांचा हात धरूनच हे लोक आमच्या कामांत ढवळाढवळ करूं शकलेले आहेत. आम्हीहि काँग्रेसच्या चळवळींत व अन्य ठिकाणीं भिन्न भिन्न क्षेत्रांत काम करीत असल्यामुळें, हुदलीच्या कामांत जावें तितकें

लक्ष आम्ही कोणीच देऊं शकलों नाहीं. अर्थात् हुदलींतील कामावर व समाजसेवेवर आमचा तात्रा राहावा तितका राहूं शकत नाहीं, हें या लोकांनीं जाणलें होतें. व त्या आमच्या दुर्लक्षाचा ते बरोबर फायदा उठवीत होते. मी त्याविषयीं गु. गंगाधरराव यांच्याशीं अनेक वेळां तास न् तास बसून चर्चा केलेली आहे. त्यांनी दिलेला सल्ला मी मानला नाहीं ही मोठीच चूक माझ्याकडून झाली. 'सर्व काम एकदम बंद करून, आहे तें सर्व सामान येईल त्या किंमतीस विकून, होईल तें नुकसान सोसावें व दोन वर्षे या खेड्यांत अगदीं स्वस्थ बसावें.' असा सल्ला गंगाधररावांनीं मला दिलेला होता. पण तें माझ्या हातून होऊं शकलें नाहीं. 'यांत येणाऱ्या नुकसानीमधून कसें बाहेर पडावें, हें मी सांगेन व त्यासाठीं जें कांहीं करावयाचें तें मी करीन' असें आश्वासनहि त्यांनीं मला दिलें होतें. परंतु असें करण्यांत माझ्या पायाखालची सर्वच जमीन नाहींशी होईल अशी मला भीति वाटत होती. यावेळीं श्री. वडवी हुबळीस निघून गेल्यामुळें विचारविनिमय करण्यास माझ्याजवळ जिल्ह्याचें कोणीच नव्हतें. हेंच गंगाधररावांनीं सुचविलेलें धोरण पुढें कांहीं काळानंतर मला अवलंबावें लागलेलें आहे.

आमचे कार्यकर्ते परत बोलावून घेण्याच्या आमच्या धोरणाला अनेक दिशांनीं विरोध करण्यांत आला. पक्षोपपक्षांतील मतभिन्नता व व्यक्तिगत असूया यांना यावेळीं फावूं नये तर केव्हां फावावें? येथें काम करीत असलेल्या लोकांना बाहेर कसें हुसकावें, जे कांहीं केल्या आमचे विरोधी बनत नसतील त्यांना बाहेरगांवीं हुसकावें हाच त्यातील हेतु होता. आमच्याशीं मिळून गांवांत काम करणाऱ्या गावांतील लोकलबोर्डाच्या शाळांतील शिक्षकांना वर्ग करून दुसरीकडे पाठवणें आणि चरखा-संघाकडून खादीकार्यकर्त्यांना दुसरीकडे वर्ग करविण्याचा उद्व्याप होऊं लागला. कोणत्याहि कार्यकर्त्याला आपली संस्था किंवा वरिष्ठ अधिकारी जेथें बदली करतील तेथें जाणें प्राप्तच असतें. ही गोष्ट मला परत नव्हती किंवा मान्य नव्हती असें नाहीं. पण हुदलीमधील शिक्षकांना किंवा कार्यकर्त्यांना वर्ग करण्यामध्यें किंवा करविण्याच्या पार्श्वभूमीला सामान्य गोष्टी नव्हत्या.

## ४ चि. गंगाप्पा यमकनमर्डी यास वर्ग करविण्याचा प्रयत्न.

श्री. वडवी हुबळीस गेल्यानंतरहि हुदलीचें खादीकार्य आहे त्यांतल्या त्यांत सुरळीत चालूं राहूं शकलें होतें. तेव्हां आतां चि. गंगाप्पा यास वर्ग केल्याचा हुकूम श्री. वेंकटरामय्या यांच्या कडून आला. या बाबतींत माझा व के. श्री. जाजूंचा पुष्कळच पत्रव्यवहार झाला होता. सत्य वस्तुस्थिति मी बोलूं शकत नव्हतों व सिद्ध तर करूंच शकत नव्हतों. के. पू. श्री. जाजूंच्या सर्व मताशीं व सिद्धांतांशीं मी सहमत असूनहि चि. गंगाप्पा यमकनमर्डी यास वर्ग करून बाहेर पाठविण्यास मी विरोध करीत होतों. या प्रश्नाच्या बाबतींत गु. गंगाधररावहि माझ्याशीं सहमत नव्हते. याबाबत त्यांनीं

मला पाठवलेलीं पत्रें मी 'अनुग्रह' पुस्तकामध्यें छापून प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत त्यांनीं व्यंकटरामय्या व जाजूजी यांनाच पाठिंबा दिलेला आहे. शेवटीं, नाहीं होय करतांकरतां कांहीं काळानंतर चि. गंगाप्पाला वर्ग होऊन बाहेर जाण्याचा प्रश्न अगदीं निकरावर आला. वर्ग होऊन बाहेर जाण्याच्या ऐवजीं, काम सोडून घरींच बसणें त्यानें अधिक पसंत केलें. या बाबतींत केवळ सिद्धांताच्या दृष्टीनें विचार करतां मी स्वतःच माझ्या विरुद्ध मत दिलें असतें. इतकी ती गोष्ट सहज स्पष्ट व क्रमप्राप्त होती.

## ५ चि. गंगाप्पाच्या जागीं चि. सोमलिंग मळगली.

श्री. वडवी हुबळीस गेल्यानंतर आमच्या नवीन धोरणास अनुसरून चि. सोमलिंग मळगली यास हुबळीहून मी परत हुदलीस आणविलें होतें. एक दिवस माझ्या मनांत आलें कीं या चि. गंगाप्पास केवळ हिशेब लिहीत किती दिवस बसवावयाचें? आतां आमचीं चारपांच केंद्रेंहि खेड्यांमधून पसरलेलीं होतीं. तेव्हां हिशेब वगैरे कामावर चि. सोमलिंगाला बसवावें आणि चि. गंगाप्पाला सामान्यतः निरीक्षक म्हणून नेमावें. लागलीच दुसऱ्या दिवशीं गंगाप्पाला बोलावून सर्व चार्ज मी चि. सोमलिंगाकडे देण्यास सांगितलें. परंतु हिशेब लिहून तयार नव्हते. गांवामध्यें खादीच्या बाबतींत बरीच उधारीहि झाली होती. कोणासहि उधार माल द्यावयाचाच नाहीं असें मी निक्षून सांगितलें असतांना ही खादीची उधारी मला आढळून आली. मला या गोष्टीचा धक्काच बसला, व त्याला सुपरवायझर बनविण्याचा माझा विचार मनांतल्या मनांत जिरून गेला. मला तें काम त्याच्याकडून काढून घ्यावें लागलें. माझ्या संबंधांत आलेल्या कोणासहि मी दूर करीत नाहीं, तें माझ्या स्वभावधर्माविरुद्ध आहे. मी त्याला मिळणाऱ्या वेतनावरच दुसऱ्या कामावर लावून घेण्याचा प्रयत्न केला. पण तें त्याला कमीपणाचें वाटलें व आवडलेंहि नाहीं. त्या कामावरून त्याला दूर व्हावें लागलें व समितीची रक्कमहि तावडतोब भरण्याची व्यवस्था करावी लागली. अशा रीतीनें त्याच्यासाठीं मी पू. श्री. जाजूजी, श्री. व्यंकटरामय्या व गु. गंगाधरराव यांच्याबद्दल आग्रहानें बोलत होतों त्यालाच कामावरून दूर करण्याचा प्रसंग माझ्यावर आला. तथापि त्याच्याविषयींचा विचार माझ्या डोक्यांतून गेलेला नव्हता. मी त्या काळांतील माझ्या विचाराप्रमाणें एक विस्तृत पत्र लिहून त्याच्या हातीं दिलें. पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. तें पत्र येथें देत आहे.

॥श्री॥ ता. २०-१-४५, हुदली

प्रिय बंधु गंगाप्पा यमकनमर्डी,

सप्रेम अनेक आशीर्वाद वि.—गेल्या कांहीं दिवसांमध्यें अनेक प्रसंगीं मी त्या गोष्टी तुम्हाला समजून सांगण्याचा माझ्या बुद्धीप्रमाणें प्रयत्न केला आहे त्या या पत्रानें सारांशरूपानें पुनः एकदां तुमच्यापुढें ठेवण्याचें धाडस करीत आहें.

१. गेलीं पंधरावीस वर्षें तुम्ही खादीकार्य व इतर सार्वजनिक काम आमच्या बरोबरोनें करीत आल्यामुळें तुम्हांला समाजांत एक प्रकारची प्रतिष्ठा लाभलेली आहे. ती तुम्ही गमावूं नये, असें मला वाटतें. सार्वजनिक कामापेक्षां संसाराला अधिक महत्त्व देऊं नये. एवढे संस्कार गेल्या १५।२० वर्षांच्या कार्यानें आपल्या बुद्धीवर झाले पाहिजेत. निदान तशी अपेक्षा आपल्याकडून आम्ही कांहीं मंडळी करीत आहों. जो मरण्याला तयार होतो तो अधिक दिवस जगतो आणि जो मरणाला भितो तो मरणाच्या अगोदरच भीतीनें मरून घेतो, असा अनुभव पदोपदीं येत असतो.

२. समाजाची सेवा करीत असतांना आपलें पोट समाजाला दाखवून समाजाकडून पोटाला मागून घेण्यांत कमीपणा किंवा बेअब्रू नाहीं. समाज कार्यकर्त्याला किंवा त्याच्या कुटुंबाला न पोशील तर कार्यकर्त्यानें उपाशी मरून दाखविलें पाहिजे. म्हणजे भावी सर्व कार्यकर्त्यांच्या पोटापाण्याची सोय लावून दिल्याचें पुण्य आपल्याला लाभेल.

३. माझ्यासारख्या जबाबदार कार्यकर्त्यानें, जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेऊन सहकारी कार्यकर्त्यांच्या योगक्षेमाची चिंता वहाण्यास पुढें आलें पाहिजे. परंतु जनता ही नेहमींच उघड्या कानानें बसलेली असते असें नाहीं. एखाद्या वेळीं प्रयत्न करूनहि मला यश आलें नाहीं तर माझ्याबरोबरच तुम्हांला व तुमच्या कुटुंबाला भीक मागावी लागेल. आणि त्या गोष्टीला कार्यकर्त्यानें केव्हांहि तयार असलें पाहिजे. जर कदाचित् कोणत्याहि कारणानें मी येथून किंवा जगांतून नाहींसा झालों आणि त्यावेळपर्यंत तुमच्या अंगांतील जोम वयोमानानें कमी झाला आणि त्यामुळें तुम्हांला सहकुटुंब भीक मागावी लागली तर त्यालाहि तुमच्या मनाची तयारी राहून यांत तुम्ही पडलें पाहिजे, असें मला वाटतें. जेवढ्या वाईट गोष्टींची आपण आज कल्पना करूं शकतों तेवढ्या सर्व आमच्याच नशिबीं येण्याचें सुदैव आम्हांला लाभणार नाहीं, ही गोष्ट खरी आहे. पण आपण विचार करतांना सर्व गोष्टींचा विचार करून ठेवलेला असला म्हणजे पुढें आम्हांला पश्चात्ताप होण्याचा संभव कमी असतो. म्हणून मी या गोष्टी तुम्हाला स्पष्टपणें सांगून ठेवीत आहें. तेव्हां या गोष्टी ऐकून तुम्हाला गांगरून किंवा भिऊन जाण्याचें कारण नाहीं.

४. आपल्याला मानापमानापेक्षां कार्याकडे पहावयाचें आहे. श्री. व्यंकटरामय्यानें तुमच्याकडून लिहून मागणें गैर आहे, हें मलाहि मान्य आहे. तथापि वेळप्रसंग पाहून तुम्ही आज त्यांना लिहून द्यावें. सहा महिन्यांनंतर 'वर्ग' झाल्यास जेथें वर्ग करतील तेथें दोनतीन महिने जावें व अत्यंत शांत मनानें, कोणत्याहि प्रकारचा द्वेष किंवा गैरसमज मनांत येऊं न देतां कामाचा राजीनामा द्यावा. तोंपर्यंत म्हणजे सहा महिनेपर्यंत आपल्या भावी कामाची व जीवनक्रमाची तयारी करावी.

५. नवीन योजनेप्रमाणें कार्यकर्त्यांनें स्वावलंबी कसें व्हावें, याचा विचार व योजना मी करीत आहें. त्यांत सामील होऊन कार्य व सेवा करीत असतांना जनतेच्या विश्वासास व प्रेमास पात्र होऊन आपली उपजीविका जनतेकडूनच मिळविण्याचा प्रयत्न आपण सर्वजण मिळून करूं या. त्यांत तुम्ही सामील व्हावें असें मला वाटतें. ईश्वरानें यांत आपल्याला यश न दिल्यास आपण सर्व मिळूनच दुसरा एखादा मार्ग आक्रमूं या. हा प्रयोग तीनचार वर्षांतच यशस्वी किंवा अयशस्वी होतो तें दिसून येईल. तेवढ्या अवधींत नवीन जीवनक्रम किंवा धंदा आखण्याची तुमची व आम्हां सर्वांची सर्व शक्ति एकदम नष्ट होईल असें नाहीं. कार्यकर्त्यांनीं हा प्रयोग श्रद्धेनें करून पाहावा, असें गांधीजींचें म्हणणें आहे. जनतेकडे जाऊन प्रत्यक्ष याचना केल्यावांचून कोणाहि कार्यकर्त्याला आजपर्यंत जनतेनें सांभाळल्याचें उदाहरण झालेलें नाहीं. आमच्यासाठीं जनता कांहीं विशेष त्याग करीत आहे, असें जनतेला न भासतांहि आपण आपली उपजीविका जनतेकडून मिळवून घेऊं. आणि याचेंच नांव 'जनतेकडून पोषण मिळविणें' असें आहे. आपण श्रम करून जनतेला श्रेय देण्याची ही कला आहे. आपण आपल्या चीजवस्तु कुलुपांत घालून जपून ठेवावयाच्या आणि श्रेय जनतेला द्यावयाचें कीं 'आमच्या आजूबाजूला कोणीहि चोर नाहींत' यालाच सार्वजनिक कार्य म्हणतात. सार्वजनिक कार्य करून त्याचें फळ जनतेकडून मिळवण्याची अपेक्षा कार्यकर्त्यानें कधींच राखावयाची नसते. रशियन राष्ट्राचा उद्धार ज्यानें केला त्या पुढाऱ्याला रशियन लोकांनीं दगडांनीं ठार मारलें. गांधीजींवर बॉंब फेकण्यांत आला होता. परवां सेवाग्रामला एक मनुष्य गांधीजींच्या अंगांत खंजीर मारण्याच्या हेतूनें गेला होता. तेव्हां लोकनिंदेला, किंवा 'उत्तम कार्यकर्त्यांनीं किंवा मोठ्या पुढाऱ्यांनीं आपली योग्य किंमत जाणली नाहीं.' या गोष्टीला भिऊन किंवा चिडून आपण आपल्या कार्यापासून ढळूं नये. आणि जर आपण ढळूं तर निदान त्याचें खापर त्यांच्या डोक्यावर तरी फोडूं नये. आपल्यामध्येंच तितका नेट किंवा सहनशक्ति नाहीं असें समजावें.

६. तुमच्या पगाराची जबाबदारी मी माझ्या शिरावर घेऊन तुम्हांला कामाला लावावें व तुम्ही मी सांगेन तें काम करावें, यापेक्षां मला आतां दुसरा मार्ग दिसत नाहीं. कारण तुमच्याबरोबर चर्चा करून तुमचें मन घट्ट करणें किंवा तुम्हाला कांहीं गोष्टी पटवून देणें, हें मला शक्य दिसत नाहीं. महिना पंचवीस रुपयांची जबाबदारी मी माझ्यावर घ्यावी, असें माझ्या मनांत वारंवार येतें. अधिक आमची कुवत नाहीं. पण मी झालों तरी लोकाच्या मदतीवरच या बाबतींत अवलंबून राहणार ना! तेव्हां जर कांहीं दिवसांनीं मला यांत यश येईनासें झालें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी कारणानें मी दुर्बळ झालों तर येईल त्या परिस्थितीच तुम्ही तुमचें मन तयार ठेविलें पाहिजे. ही गोष्ट आज सागण्याचें कारण एवढेंच आहे कीं, 'पुंडलीकजींनीं वचन दिलें होतें व पुढें तें पार पाडलें नाहीं. एवढी कुवत नव्हती तर आम्हांला प्रथम आश्वासन

करावा यावें!' असा आक्षेप वा दोष माझ्यावर येऊं नये. मी प्रयत्न केला तर त्यांत बहुतेक मी हार खात नाहीं व मला अपयश आजपर्यंत आलेलें नाहीं, हें तुम्हांला माहीत आहे. पण पुढचें आज कोणी सांगावें?

७. तुमचा पगार जनतेकडूनच कसा काढावा याची योजना मी करीत आहें; त्यांत मला तुमचें साहाय्य पाहिजे आहे. संस्थेसाठीं श्रमवर्गणी गोळा करावी आणि त्यांतूनच संस्थेमार्फत तुम्हाला पगार द्यावा व त्यांत सुरवातीला कांहीं दिवस जें कांहीं कमी पडेल तें मी कोठून तरी दानरूपानें आणावें अशी माझी कल्पना आहे. त्यांत तुम्ही मनःपूर्वक राबल्यास राष्ट्रकार्य होईल व तुमचें पोटहि चालेल.

८. तुम्ही कांहींच पटवून घेणार नसाल तर निदान कांहीं तरी उद्योगधंदा लवकर सुरू करावा. व्यर्थ वेळ घालवूं नये. तूर्त तुम्हाला कांहींच काम दिसत नाहीं. तेव्हां मी येथें आणून ठेवलेलीं कानडी पुस्तकें तरी वाचा व अभ्यास करा. बौद्धिक वर्गाला तरी नियमित हजर रहा. गांवांतून व्यर्थ फिरण्यांत वेळ घालवूं नका. तुम्ही तुमचीं मतें निश्चित व बरोबर बनवून घेण्यासाठीं बौद्धिक वर्गात यावें, असा प्रयत्न मी आज चार वर्षे करीत आलों आहें. घरापुढून गंगा वाहात असतांना त्याचा उपयोग करून घेण्याची बुद्धि तुम्हाला होत नाहीं. ईश्वराच्या कृपेचा अभाव यावरून दिसून येतो. हे दिवस व वय निघून गेल्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी तुमच्यावर येऊं नये म्हणून मी हें वारंवार बोलतों. या गोष्टीचा तुम्ही नीट विचार करावा.

९. धंदा करून पोट भरावयाचें व स्वावलंबी व्हावयाचें या कल्पनेनें तुमच्या मनाला घेरलेलें आहे. त्या कामाला तरी तुम्ही लवकर प्रारभ करा. तुम्ही दुकान घालणार असल्यास मी त्या कामांत बिनव्याजी कर्ज म्हणून पाचशें रुपये पर्यंत मदत करावी अशी माझी इच्छा आहे. सार्वजनिक कामालाहि मला अलीकडे पैसे मिळविणें कठीण झालें आहे. कारण माझ्या डोक्यावर फार मोठा बोजा आहे, हें तुम्हाला माहीत आहे. तेव्हां माझे मित्रहि मला पैसा देण्यास हल्लीं कंटाळले आहेत. त्यांतूनहि अशा प्रकारें एखाद्या मनुष्यास केवळ आपल्या पोटासाठीं दुकान घालण्यास मी पैसे कधींहि आजपर्यंत मागितलेले नाहींत. हा एक नवीनच प्रयोग आहे. तथापि मला वाटतें कीं कांहींतरी खटपट करून मी तेवढा पैसा जमवीन. मात्र तें तुमच्यावर बिनव्याजी कर्ज म्हणून राहील. तुम्हाला पैसे मिळूं लागले म्हणजे ते पैसे आस्ते आस्ते परत फेडावयाचे असणार. या कामीं मी माझ्या मित्रांना लिहिलेलें आहे. त्यांत मला यश मिळेल असें वाटतें. पण जर यश मिळालें नाहीं तर मात्र 'मला तुम्हाला मदतच करावयाची नव्हती, मी माझा विचार बदलला होता' असें म्हणून माझ्यावर अन्याय करूं नका.

यापेक्षां मी आणखी किती परीनें तुम्हाला सांगणार! जीवन अनिश्चित ठेवून वागावें व येईल त्या संकटास तयार राहून राष्ट्रकार्यातील पाय कायमचा रोवून

ठेवावा. त्यासाठीं तुमच्यावर किंवा तुमच्या संसारावर कोणताहि प्रसंग आला तरी त्याला तुम्ही तयार असावें. एवढी श्रद्धा, धैर्य, व विश्वास ईश्वरानें तुम्हाला द्यावा अशी अंतःकरणपूर्वक प्रार्थना करून, हें पत्र मी येथेंच संपवितों.

क. लो. अ. ही विनंती.

ता. २१–१–४५ } आपला बंधु
हुदली } पुंडलीक कातगडे.

खेड्यामध्यें सार्वजनिक संस्थेचा पैसा वेळप्रसंगीं आपल्या खाजगी कामासाठीं वापरणें हा गुन्हाच समजला जात नाहीं. 'ही कोऑपरेटिव्ह सोसायटी स्थापन करून नांवारूपाला आणण्यामध्यें माझ्या रक्ताचें मीं पाणी केलेलें आहे; अशा माणसानें त्यांतील थोडी रक्कम चार दिवस आपल्या खाजगी कामाला वापरली तर त्यांत काय बिघडलें ?' असें खेड्यांतील कोऑपरेटिव्ह सोसायटीचे एक अध्यक्ष मोठ्या विश्वासानें बोलत असलेले मीं स्वतः ऐकलेलें आहे.

"मी या गांवांत राहणारा मनुष्य, गांवांतील सर्वांना संभाळून घेऊन मला चालवयाचें, अशा परिस्थितींत मी चार लोकांना खादी उधार देण्याचें नाकारणें मला कसें शक्य आहे ? त्यामुळें मला माझे मित्र गमावून बसावें लागेल. मला स्वतःला लागणारी खादी मी उधार घ्यावयाची नसेल तर मी तेथें कशासाठीं बसावयाचें ? मीहि एक तुमच्यासारखाच कार्यकर्ता आहें. मी पगार घेतला तरी स्वतः नोकर समजून काम करीत नव्हतों, वगैरे, वगैरे." खादी उधार देणाऱ्या, पगार घेऊन समितीमध्यें काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचें प्रामाणिकपणाचें हें म्हणणें किंवा दलील होतें. पण असल्या सवयी एकदां लागल्या म्हणजे त्या सोडविणें किंवा सुटणें महाकठीण होऊन बसतें. आमच्या समितीच्या कार्यामध्यें ही एक मोठीच आपत्ति येऊन बसली. तिला तोंड दिल्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें. 'इतके दिवसांच्या निष्ठावंत कार्यकर्त्याला कामावरून दूर केलें.' हा जनतेकडून येणारा दोष किंवा ठपका तरी पत्करावा किंवा आपल्याच कार्यकर्त्यांचें दोषाविष्करण तरी लोकांत करीत फिरावें, यांपैकीं कांहींच आम्हाला शोभण्यासारखें नव्हतें, मनाला प्रशस्त वाटेना. म्हणून मी प्रसंग व मनुष्य पाहून केव्हां हें तर केव्हां तें स्वीकारीत राहिलों होतों. 'आमचा असा' कोणी कार्यकर्ता उरतो किंवा नाहीं याची शंका वाटण्यासारखी परिस्थिति कांहीं दिवस आमच्या समितीमध्यें उत्पन्न झाली होती. 'आई खुळी, बाप पिसा आणि गावई मिळाला तोहि तसा !' अशी माझी स्थिति झाली. नवीन नेमिलेल्या कार्यकर्त्यांनींहि समितीच्या ढिलेपणाचा, माझ्या विश्वासाचा, माझ्या खादीविषयींच्या अज्ञानाचा व श्री. वडरींच्या अनुपस्थितीचा संपूर्ण फायदा घेण्यास मनापासून प्रारंभ केला. आम्हांला या गोष्टी अगदीं उशिरानें कळून आल्या. त्यांच्याबरोबर कार्य करणारे इतर कार्यकर्ते मला स्पष्टपणें या गोष्टी सांगत होते, तरीहि मी कोणाच्या सांगण्यानें आपलें मत बदलू नये, आपण पिवळी

७४.

## जनावरांच्या शिंगांचीं व हाडांचीं बटणें करण्याचा उपक्रम

चरखा संघाचे चिटणीस म्हणून श्री. वडबीना हुबळीस जाऊं द्यावें किंवा नाहीं याची चर्चा चालू होती त्यावेळीं मी श्री. कल्लापूर यांचे नांव प्रथम ऐकलें होतें. पुढें त्यांच्या होनावर येथील विधायक कार्याची व संस्थेची माहिती मला ऐकावयास मिळाली. मी एकदां स्वतः जाऊन त्यांचें काम व संस्था प्रत्यक्ष पाहिली. माझ्या मनावर त्याची चांगली छाप पडली. आमच्या समितीपैकीं एका कार्यकर्त्याला—होनावरला—त्यांच्याकडे पाठवून जनावरांच्या हाडांचीं बटणें करण्याचें काम शिकवून आणावें असें माझ्या मनांत आलें. चरखा संघाच्या किंवा जनतेच्या मदतीनें असलीं कामें किती दिवस चालणार! आमचीं सर्व कामें किंवा उपक्रम स्वयंशासित व स्वयंपूर्ण आणि स्वावलंबी झाल्यावांचून टिकणार नाहींत असें आम्हांला वाटत होतें. म्हणून आमच्या कार्यकर्त्यांनीं शेवटीं स्वावलंबी होऊन, त्यांतूनच समाजसेवा करून स्वातंत्र्यासाठीं होणाऱ्या आंदोलनांत भाग घ्यावा हें एक वेड आमच्या डोक्यांत होतेंच. बटणें करून विकण्याच्या धंद्यामध्यें हें शक्य आहे, असें मी श्री. कल्लापूर यांच्याकडून ऐकलेलें होतें. म्हणून श्री. वासुदेव नागाप्पा कदम या कार्यकर्त्याला मी श्री. कल्लापूर यांच्याकडे होनावर येथें पाठवून दिलें. तेथें त्यानें ती कला चांगल्या रीतीनें शिकून घेतली. श्री. कल्लापूर यांच्या संस्थेमध्यें तो कार्यकर्ता अत्यंत चांगल्या रीतीनें वागला. त्या कार्यकर्त्याविषयीं श्री. कल्लापूर यांनीं मला पत्रामध्ये लिहिलें होतें कीं 'हा मुलगा स्वभावानें, बुद्धीनें व वर्तनानें उत्तमच आहे. त्याच्या हाताच्या बोटांमध्यें कौशल्य व कला आहे. हा मुलगा आपण मला द्याल तर मी त्याच्या जीवनाचें सोनें करून दाखवीन. असला मुलगा आपल्या समितीला मिळाला आहे, ही देश करण्यासारखी गोष्ट आहे.' तो परत हुदलीस आल्यानंतर बटणें करण्याचें एक यंत्र मी श्री. कल्लापूर यांच्या सांगण्याप्रमाणें विकत घेऊन दिलें.

बटणें करण्यासाठीं जनावरांचीं शिंगें विकत आणण्याकरितां मी प्रथमच

यांच्यांतील फरक एवढाच होता कीं आमच्या बटणांपेक्षां पंजाबहून आलेलीं बटणें कमी किंमतीनें बेळगांवांत बाजारांत विकलीं जात असत. त्यांतहि फेरीवाल्या व्यापाऱ्यांना थोडाबहुत फायदा शिल्लक राहात होता. आश्रमांत तयार झालेलीं बटणें आमचीं असल्यामुळें त्याला हातभार लावण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन फेरीवाल्यांनीं आमच्या बटणांना अधिक दरानें कांहीं दिवस विकत घेतलें पण पुढे पुढें ते हा भाव फारच थोडा देऊं लागले. मालहि उधार मागूं लागले. म्हणून त्यांचा नाद मला सोडावा लागला. आमच्याकडून चि. वासुदेव कदम यास दुसऱ्या एखाद्या कामांत गुंतविण्याचें कबूल आणितां येईपर्यंत त्यानें बटणें करीत राहावें. तीं बटणें विकोत किंवा न विकोत, त्याला महिना जे पोहचत होतें तें समितीनें पोचवावें असें मीं ठरविलें. तयार बटणें बरींच सांठलीं व शेवटीं तीं बटणें कमी किमतीला त्या हातगाडीवाल्यांनाच विकावीं लागलीं. पुढें आमचें काम आवरतें घेतलें जात असतांना, बटणें करण्याचें छोटें यंत्र, त्याचीं हत्यारें, व इतर शिल्लकी कच्चा माल चि. वासुदेव कदम यांसच देऊन आम्ही मोकळे झालों. त्या बटणें करण्याच्या यंत्राचा पाठुढील इतिहास येथें देऊन जागा अडविणें मला योग्य वाटत नाहीं.

७५.

## लोकलबोर्डांच्या प्राथमिक शाळांतील शिक्षकांना मूलोद्योग शिक्षण

लोकलबोर्डांच्या प्राथमिक शाळांतून मूलोद्योग शिक्षण सुरू करण्याचा निर्णय मुंबई सरकारनें घेतला. प्राथमिक शाळेंतील शिक्षकांना या मूलोद्योगाचें शिक्षण देण्याची जबाबदारी कर्नाटक चरखा संघानें घेतली. बेळगांव धारवाडमध्यें चार केंद्रें उघडून शिक्षकांना पेळू करणें, सूत कातणें, नवार व खादी विणणें आणि या सर्वांच्या पार्श्वभूमीस असलेलें तत्त्वज्ञान यांची माहिती देणें, हीं कामें त्या केंद्रांतून व्हावींत असें ठरविण्यांत आलें. आमच्या समितीकडे हें काम एक केंद्र उघडून देण्यात आलें होतें. सुमारें ४५ ते ५० शिक्षक असलेल्या तीन पथकांना आमच्या समितीनें हें शिक्षण दिलें आहे. या केंद्रामध्यें शिक्षक म्हणून आमच्या समितीनें चि. भीमाप्पा भूसी, निंगाप्पा सुतार, वासुदेव कदम, भीमाप्पा यल्गार, श्रीपाद नवले, नीलकंठय्या स्वामी यांना या शिक्षकांना शिकविण्यासाठीं प्रशिक्षक म्हणून नियुक्त केलें होतें. या कार्यकर्त्यांनीं आपलें काम चोख बजावलें आहे. शिक्षणाधिकाऱ्यांनींहि त्यांची वाखाणणी केली आहे. या सर्वांचें शिक्षण आमच्या समितीमध्येंच झालेलें होतें. शिक्षकांच्या या केंद्रांत बौद्धिकें देण्याचें काम श्री. पुंडलीकजी यांनीं विनावेतन केलेलें आहे. मूलोद्योग शिक्षण, खादी व गांधीविचार यांचा ऊहापोह श्री. पुंडलीकजी रोज आपल्या बौद्धिकांत म्हणजे व्याख्यानांतून करीत असत.

आपल्या केंद्रामधून मूलोद्योग शिक्षणाच्या या वर्गासाठीं पाठवावयाच्या शिक्षकांची निवड सरकारकडून चांगली झालेली नव्हती. त्यांत कांहीं शिक्षक सेवानिवृत्त होण्याजोग्या वयाचेहि होते. मूलोद्योग आपण स्वतः शिकून घ्यावा अशी हौस तर जवळजवळ कोणालाच नव्हती. आमच्या खाजगी संभाषणामध्यें व विनोदामध्यें यांपैकीं बरेच शिक्षक गांधी विचारांची व मूलोद्योगाची टर उडविण्यास कमी करीत नसत. त्यांना आवश्यक असेल तेव्हां रजा देण्याचाहि अधिकार मला देण्यांत आला होता.

घरीं कोणीतरी आजारी असल्याचीं पत्रें किंवा पूर्वीच मेलेल्या माणसांच्या अत्यवस्थ आजारी असल्याची तार घरून आणवून तें पत्र किंवा तार मला दाखवून शिक्षक रजा मिळवीत असत. अशीं पुष्कळांचीं पत्रें व तारा येऊं लागल्यानंतरच आमच्या ध्यानांत ही गोष्ट आली. बुद्धीचा किंवा डोक्याचा दरवाजाच बंद केलेल्या शिक्षकांपुढें कोणी कितीहि व्याख्यानें दिलीं तरी त्यांचा उपयोग कितीसा होणार आहे ! सरकारच्या आज्ञेनुसार शिक्षणाधिकाऱ्यांनीं आपल्याला निवडून या मूलोद्योगाचें शिक्षण घेऊन येण्यासाठीं पाठविलें आहे. एवढ्यामुळेंच हे शिक्षक नाइलाज म्हणून या समितीच्या मूलोद्योग शिक्षणकेंद्रांत आलेले होते.

आमच्या समितीच्या कार्यकर्त्यांना अनुभव मिळावा व त्यांच्यावर चांगले संस्कार व्हावेत, त्यांच्यामध्यें आत्मविश्वास वाढावा याकडे आमच्या समितीची दृष्टि होती. या मूलोद्योग केंद्रामध्यें शिकविण्याचें काम करण्यास जाणाऱ्यांना सरकारी वेतनश्रेणीप्रमाणें वेतन मिळावयाचें ! आमच्या समितीमध्यें आमच्या कार्यकर्त्यांना आम्ही इतकें वेतन देत नव्हतो व पुढेंहि कधीं दिलें जाण्याचा सभव नव्हता. आमच्यापुढें प्रश्न होता तो हा कीं आमच्या समितीमधील कार्यकर्त्यांना शिक्षक म्हणून पाठवितांना त्यांनीं वेतन घ्यावयाचें तें सरकारी वेतनश्रेणीप्रमाणें स्वीकारण्यास सांगावें किंवा आमची समिति त्यांना समितीमध्यें जें वेतन देत असतें त्याच वेतनश्रेणीप्रमाणें चालावें ? शेवटीं आम्हीं ठरविलें कीं कांहीं काळपर्यंत सरकारी वेतनश्रेणीप्रमाणें मिळणारें वेतन आमचे कार्यकर्तेहि घेईनात का ! गरिबांच्या फायद्याच्या आड आम्ही कां यावें ? थोड्या वेतनावर काम करीत राहण्याचें त्यांच्या नशिबीं त्यांच्या जन्माला लागलेलेंच आहे. ही सवलत देण्यांत आमची चूक झाली असें आज मला वाटतें. आम्हीं त्यांना देत असलेली वेतनश्रेणीच कायम राखणें सर्व दृष्टींनीं योग्य झालें असतें.

लोकलबोर्डातील शिक्षकांना मी जें बौद्धिक देत होतों त्याचें टिप्पण तयार करूनच मी माझ्याबरोबर रोज नेत असें. माझें व्याख्यान कानडी भाषेंतून होत असे. माझ्या टिप्पणांचें कानडींत भाषांतर करून तीं टिप्पणें मी त्यांच्याकडून लिहवून घेत असें. आमच्या समितीमधील जे कार्यकर्ते शिक्षक म्हणून तेथें पाठविण्यांत आले होते, त्यांनीं हीं टिप्पणें रोज वाचावींत म्हणजे त्यांचीहि तितकी तयारी होईल, म्हणून मीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिला परंतु त्यांच्या तोंडून गांधीविचारांचे हे वेद मी म्हणवून घेऊं शकलों नाहीं. शेवटीं तो नाद मीच सोडला. अधिक पगाराची संवय किंवा चट लागल्यामुळें आमच्या कार्यकर्त्यांना वाटूं लागलें कीं, मूलोद्योगाचें शिक्षण आम्ही या शिक्षकांना देऊन, त्यांनीं तें प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांना देण्यापेक्षां, आम्हीच अर्ज करून शाळेंत शिक्षकाची नोकरी धरलेली काय वाईट ! सरकारी वेतनश्रेणी ही समितींतील वेतनश्रेणीपेक्षां चांगली आहे. कांहींनीं तसे अर्जेहि शिक्षणखात्याकडे केले. त्यांना आमच्या समितीकडून शिफारसीहि देण्यांत आल्या. आमच्या शिफारसीशिवाय ही त्यांना नोकरी मिळालीच असती ! आमच्या समितीनें शिकवून तयार केलेले दोनतीन

कार्य होतें आम्ही लोकलबोर्डांना देऊन म्हणजे समितीच्या दृष्टीनें त्यांना गमावून बसलें. ही सर्व परिस्थिति व परिणाम पाहून, यानंतरच्या शिक्षकांच्या टोळीला मूलोद्योग शिक्षण देण्याचें केंद्र आमच्या समितिद्वारां चालविण्याचें मीं नाकारलें. पुढें तसलें केंद्र गुलझेवूर येथे चालविण्यांत येत असे. या बाबतींत सरकारकडून येणाऱ्या पैशांचा हिशेब शिक्षकच ठेवीत असत व तो आपल्या वरिष्ठांना सादर करीत ते शिक्षकच असत. त्यांत आम्ही लक्ष घातलें नाहीं किंवा सरकारकडून फी म्हणून किंवा अनुदान म्हणून कांहींहि आमच्या समितीनें स्वीकारलेलें नाहीं अगर मागितलेलेंहि नाहीं.

सर्व परिस्थिति व अनुभव कै. बाळासाहेब खेर, मुख्य मंत्री, मुंबई राज्य, यांना निवेदन करून यापुढील पृथक् मूलोद्योग शिक्षणासाठीं आपण अन्य कोठेंहि पाठवूं शकतां, असें मीं कळविलें होतें. त्यांनीं तें आनंदानें मान्यहि केलें. पण अशा प्रकारें प्राथमिक शिक्षकांना शिक्षणासाठीं कोठेंतरी किंवा कोणाकडे तरी पाठविण्याचें सरकारनें पुढें बंदच केलें.

उरळी कांचन येथें मुंबई प्रांतांतील शिक्षणाधिकाऱ्यांचें एक शिबिर याच कामासाठीं व याच उद्देशानें पू. विनोबाजींचे बंधू बाळकोबा यांच्या मार्गदर्शनाखालीं दोन महिन्यांसाठीं चालू केलें होतें. तेथेंहि मला एका व्याख्यानासाठीं जाण्याचा प्रसंग आला होता. मी प्रथमच सर्वांना सांगितलें कीं 'व्याख्यान देण्यापेक्षां आपलें सर्वांचे विचार ऐकण्यासाठीं येथें आलों आहें. तेव्हां सरकारच्या या धोरणाविषयीं आपल्याला काय वाटतें तें मला ऐकण्याची इच्छा आहे.' प्रथम कोणीहि बोलण्यास तोंडच उघडण्यास तयार होईना. शेवटीं एक शिक्षणाधिकारी धैर्य करून बोलावयास उभे राहिले. मूलोद्योगाच्या सरकारी धोरणावर त्यांनीं सरसरीत व जळजळीत टीका केली होती. त्याच्या त्या भाषणाशीं जे कोणी प्रतिकूल असतील त्यांनीं आपला हात वर करावा असें मीं सांगितलें असतां, एकहि हात वर होऊं शकला नव्हता. त्या शिबिराचा समारोप पू. विनोबाजींच्या हस्तें झाला. त्यावेळींहि अनेकांचीं भाषणें झालीं. तीं सर्व या सरकारी धोरणास उचलून धरणारीं होतीं असें वृत्तपत्रांतून जाहीर झालें होतें. अशी या बाबतींतील वस्तुस्थिति आहे. याचें प्रत्यक्ष दर्शन मात्र मला झालें तें वेगळें होतें, व तेंच मी वर वर्णन केलेलें आहे.

७६.

## १९४४-४८च्या काळांत करावयाचें पण न झालेलें काम

सन १९४४ मध्यें तुरुंगांतून सुटून बाहेर येतांना आणखी ज्या गोष्टी करण्याचा आमचा विचार आम्ही आमच्याबरोबर आणलेला होता त्याचेंहि दिग्दर्शन थोडक्यांत येथें करावयाचें आहे.

१. गांवांतील किराणा मालाच्या दुकानदारांना अनुकरणीय होईल असें एक 'किराणा मालाचें दुकान' चालवून दाखविण्याचें आमच्या मनांत होतें. त्या कामासाठीं योग्य मनुष्य मिळतांच तें दुकान सुरू व्हावयाचें होतें. त्या लायक मनुष्याच्या शोधार्थ समिति होती.

२. 'विद्यार्थ्यांची वसतीगृहें' अनेक खेड्यांमध्यें उघडावींत व शाळांच्या व्यतिरिक्त विद्यार्थ्यांच्या राहणी-करणी व विचारसरणीवर नजर ठेवून त्यांना मार्गदर्शन करतां यावें अशीहि आमची इच्छा होती. पण तें समितीकडून या कालखंडांत [illegible] होऊं शकलेलें नाहीं.

३. गांवांत एक नमुनेदार 'परिश्रमालय' स्थापन करण्याचा समितीचा [illegible] त्या परिश्रमालयांत कोणीहि यावें आणि आमच्या शिस्तींत राहून तेथें [illegible]लें काम प्रथम शिकून घ्यावें आणि नंतर केव्हांहि एक तास काम [illegible]प्रमाणें करावें व दोन आणे मजुरी घेऊन जावें. पण हें असलें [illegible] [illegible]णेंहि आमच्या हातून होऊं शकलेलें नाहीं. याचें एक कारण चारमहा[illegible] असें काम करून, कामाचें व मजुरांचें कोष्टक (Data) तयार होऊं [illegible]

४. एक 'तेलघाणी' सुरू करण्याचा विचार होता. पुढें कांहीं कालानंतर [illegible] [illegible] आलेला आहे.

[illegible]. 'गांधीजींच्या वाढदिवशाला सूतांजलि जमा करण्याचें कामहि आमच्या [illegible]या हातून व्हावें तसें झालेलें नाहीं. कारण या बाबतींत कार्यकर्त्यांमध्येंच [illegible]ज्ञान व जाणीव नव्हती आणि म्हणूनच संघटना उभारली जाऊं शकली नाहीं.

७६.

## १९४४-४८च्या काळांत करावयाचें पण न झालेलें काम

सन १९४४ मध्यें तुरुंगांतून सुटून बाहेर येतांना आणखी ज्या गोष्टी करण्याचा आमचा विचार आम्ही आमच्याबरोबर आणलेला होता त्याचेंहि दिग्दर्शन थोडक्यांत येथें करावयाचें आहे.

१. गांवांतील किराणा मालाच्या दुकानदारांना अनुकरणीय होईल असें एक 'किराणा मालाचें दुकान' चालवून दाखविण्याचें आमच्या मनांत होतें. त्या कामासाठीं योग्य मनुष्य मिळतांच तें दुकान सुरू व्हावयाचें होतें. तशा लायक मनुष्याच्या शोधार्थ समिति होती.

२. 'विद्यार्थ्यांचीं वसतीगृहें' अनेक खेड्यांमध्यें उघडावीत व शाळांच्या व्यतिरिक्त विद्यार्थ्यांच्या राहणी-करणी व विचारसरणीवर नजर ठेवून त्यांना मार्गदर्शन करतां यावें अशीहि आमची इच्छा होती. पण तें समितीकडून या कालखंडांत तरी होऊं शकलेलें नाहीं.

३. गांवांत एक नमुनेदार 'परिश्रमालय' स्थापन करण्याचा समितीचा प्रयत्न होता. त्या परिश्रमालयांत कोणीहि यावें आणि आमच्या शिस्तींत राहून तेथें चालू असलेलें काम प्रथम शिकून घ्यावें आणि नंतर केव्हांहि एक तास काम आपल्या सवडीप्रमाणें करावें व दोन आणे मजुरी घेऊन जावें. पण हें असलें परिश्रमालय उघडणेंहि आमच्या हातून होऊं शकलेलें नाहीं. याचें एक कारण चारसहा महिने सतत असें काम करून, कामाचे व मजुरीचें कोष्टक (Data) तयार होऊं शकलें नाहीं.'

४. एक 'तेलघाणी' सुरू करण्याचा विचार होता. पुढें कांहीं काळानंतर तो प्रत्यक्षांत आलेला आहे.

५. 'गांधीजींच्या वाढदिवसाला सूत्रांजलि' जमा करण्याचें कामहि आमच्या समितीच्या हातून व्हावें तसें झालेलें नाहीं. कारण या बाबतींत कार्यकर्त्यांमध्येंच उत्साह, ज्ञान व जाणीव नव्हती आणि म्हणूनच संघटना उभारली जाऊं शकली नाहीं.

हें काम आमच्या समितीकडून होऊं शकलें नाहीं याचा समितीला खेद वाटत होता. आमच्यापेक्षां आमच्या विरोधी कार्यकर्त्यांनींच सूत्रांजलीसाठीं अधिक सूत जमा करून दाखविलेलें आहे.

६ हुदलीमधील विधायक कार्य मोठ्या प्रमाणावर चालवावें असा एक विचार आमच्या सर्वांच्याच मनांत आला होता. या विचाराला स. १९४७ सालीं विशेष जोर चढला होता. गु. गंगाधररावांचीहि संमति या विचाराला प्रथम मिळाली होती. मुंबई सरकारनें अर्थात् श्री. बाळासाहेब खेर यांनींहि त्याला पाठिंबा दिला होता. मुंबई राज्याचे चीफ सेक्रेटरी श्री. भंसाली तेवढ्याचसाठीं हुदलीस आले होते. दोन दिवस ते हुदलीमध्यें राहिले होते. पुढें कुमरी आश्रमांत गु. गंगाधररावांशीं व आम्हां सर्वांशीं झालेल्या चर्चेला अनुसरून हुदलीग्रामाजवळच नवीन जरूर त्या कांहीं इमारती बांधविण्याची योजना श्री. भंसाली यांनीच तयार केली. त्यांचा 'ब्ल्यू प्रिन्ट'हि तयार झाला होता. सरकारी नियमाप्रमाणें, या योजनेसाठीं लागणाऱ्या खर्चापैकीं ¼ खर्च आमच्या आश्रमानें जमवावयाचा होता. गु. गंगाधरराव यांच्या सहीचें शिफारसपत्र आम्हांला मिळालें असतें तर आवश्यक ती रक्कम मुंबईमध्ये उभी करणें अशक्य नव्हतें. पण गंगाधररावांनीं तसें शिफारसपत्र देण्याचें साफ नाकारलें. आमच्या सर्वांच्या आग्रहाचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं, अर्थात् गु. गंगाधररावांच्या मतामध्यें बदल होऊं शकला नाहीं. "मुंबईहून किंवा अन्य ठिकाणाहून निधि जमवून आणून, हुदलीमध्यें कामें उभारणें" गंगाधररावांना पसंत नव्हतें. स्थानिक जनतेला एखादी संस्था पाहिजे असेल तर त्यासाठीं तिनें झीज सोसण्यास व त्याग करण्यास शिकलेंच पाहिजे; आणि स्थानिक जनतेला एखादी संस्था नको असेल तर, बाहेरून पैसा आणून ती संस्था स्थानिक जनतेवर लादण्याचा अविवेक करण्याचा अधिकार कोणासहि नाहीं व नसावा. स्थानिक जनतेला एखादी संस्था पाहिजे आहे किंवा नको आहे हें जाणून घेण्याचें गमक एकच आणि तें म्हणजे स्थानिक जनता त्यासाठीं झीज सोसण्यास किंवा त्याग करण्यास तयार अथवा राजी आहे किंवा नाहीं, हेंच आहे. भरतीला म्हणून बाहेरील मदत घेण्यास हरकत नाहीं. हीच विचारसरणी थोडी अधिक व्यापक करून असेंहि म्हणतां येतें कीं संस्थेचा कायमनिधि किंवा गंगाजळी यथेच्छ वाढवून, भावी पिढ्यांवरहि ती संस्था लादण्याचा अधिकार वर्तमान पिढीला नाहीं व नसावा." गु. गंगाधरराव यांचें हें स्पष्ट मत होतें. शिवाय त्यांना वाटत होतें—'किंवा त्यांना वाटत असावें असें मला त्यांच्याशीं झालेल्या अनेक वेळच्या चर्चेवरून वाटतें कीं – आपण स्वतः आपली योग्यता व कुवतीप्रमाणें या कार्यांत विशेष कांहींहि मदत न पोहोंचवितां, इतरांना तरी शिफारस करणें त्यांना पसंत नव्हतें, रुचत नव्हतें अथवा कसेंसेंच वाटत होतें. म्हणूनच त्यांनीं मुंबईमध्यें अथवा अन्यत्र उपयोग करण्यासाठीं आपल्या सहीचें शिफारसपत्र देण्याचें नाकारलें होतें. हें त्यांच्या स्वभावांतील एक वैशिष्ट्य होतें. याच विचारानें प्रभावित होऊन अंकोल्यांतील करनिराकरण चळवळीचें (no tax

Campaign) पुढारीपण घेण्याचें त्यांनीं टाळलें होतें व अन्य पुढाऱ्यांनीं कितीहि आग्रह केला तरी त्यांनीं तें मान्य केलें नाहीं. असो.

पण पुढें मी विचार केला कीं, 'गु. गंगाधरराव यांच्या सहीशिवाय अथवा शिफारसपत्राशिवाय, मुंबईमध्यें या कार्यासाठीं निधि उभा करण्याचा अन्य कांहीं मार्ग कां शोधून काढतां येऊं नये ? अन्यथा, मुंबई सरकाराकडून अनायासें मिळणारा निधि गमावून बसणें आम्हांला क्रमप्राप्त आहे. अंधेरी साधकाश्रमांतील एक साधक व माझे चिरपरिचित श्रीमान् गुल्झारीलालजी नंदा—आजचे युनियन सरकारांतील होममिनिस्टर अर्थात् गृहमंत्री—त्यावेळीं मुंबई सरकारमध्यें 'मजूर मंत्री' होते. त्यांचें शिफारसपत्र मिळवून त्याच्या जोरावर आमच्या हुदलीच्या विधायक कार्यासाठीं मुंबईमध्यें निधि जमवावा असें माझ्या मनांत आलें. त्याप्रमाणें मी श्री. गुल्झारीलालजी नंदा यांना भेटून चर्चा केली. हुदलींतील विधायक कार्याच्या योजनेसाठीं मुंबईमध्यें निधि जमविण्याची आवश्यकता आणि माझे म्हणणें मी त्यांना पटवून दिलें. त्यांनीं मला तसें शिफारसवजा विनंतिपत्र आपल्या सहीनें देण्याचें कबूल केलें. गु. गंगाधरराव यांचीं या बाबतींतील मतें व गंगाधररावांच्या सहीचें शिफारसपत्र न मिळण्याचीं कारणें, मी नंदाजींपासून लपवून ठेविलेलीं नव्हतीं, किंबहुना त्यामुळेंच मला नंदाजींकडून शिफारसपत्र मिळूं शकलें. या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन, श्रीमान नंदाजींनीं मला शिफारसपत्र लिहून दिलें होतें. त्यांत कोठेंहि, दूरान्वयानें देखील, गु. गंगाधररावांच्या नांवाचा उल्लेख मुद्दाम टाळण्याची खबरदारी घेण्यांत आली होती. श्रीमान् गुल्झारीलालजी यांनीं व्यक्तिशः म्हणून जे शिफारसपत्र दिलें होतें तें येथें वाचकांच्या माहितीसाठीं उद्धृत केलें आहे.

Secretariat, Bombay.
28th January 1948.

*Shri Pundlik Katagade has established an Ashram at Hudli, District Belgaum, where a very useful programme of constructive work, has been carried out systematically since 1945. It is of vital importance to maintain and expand this kind of activity, in order to reconstruct and strengthen the economic and social basis of life in the rural areas. The work should not suffer for lack of funds.*

GULZARILAL NANDA

श्रीमान् गुल्झारीलालजी नंदांच्या एवढ्या शिफारसपत्रावरहि मुंबईमध्यें त्याकाळीं विधायक कार्यासाठीं निधि जमवितां आला असता, परंतु कोणतीहि गोष्ट गु. गंगाधरराव यांच्या कानावर घालून, त्यांची स्पष्ट अनुमति मिळविल्यानंतरच ती करावी अशी आमची वृत्ति असल्यामुळें हें शिफारसपत्रहि मी त्यांना दाखविलें. पण

*Since then I have been working on the scheme by taking the consensus of public opinion and I am glad to let you know that things seem to be favourable and that though not exactly twenty thousand, yet something nearing fifteen thousand can be collected. There is also willingness on the part of the villagers to contribute to the scheme in the form of free labour. There is not any up-to-date dispensary or maternity home in this part that is group of villages known as Kundarnad.* .....

*If you give me a letter of this scheme being sanctioned by 'the Kasturba Memorial Trust' we shall try to work that scheme out, in our part. Your letter of this kind will be a great help to us.* ....

*I expect an early reply from you to the address given above.*

*Thanking you,*
*I remain,*
*Yours sincerely,*

माझें व श्री. वडवींचें या बाबतींत पू. श्री. ठक्करबाप्पा यांच्याशीं झालेलें बोलणें 'कस्तुरबा मेमोरियल ट्रस्ट' ऑफिसकडून श्रीमती उमाबाई कुंदापूर, एजंट, 'कस्तुरबा ट्रस्ट,' हुबळी, यांना कळविण्यांत आलें होतें.

त्याला श्रीमती उमाबाई कुंदापूर यांच्याकडून गेलेलें उत्तरहि येथें देत आहें. त्या आपल्या पत्रांत म्हणतात कीं,

*"I am in receipt of your letter dated Poona the 12th July 1946 wherein you have referred to the proposal made to you by Shri Pundlikji Katagade of Belgaum. I note that Shri Pundlikji undertakes to collect Rs. 20,000 to Rs. 25,000 for a maternity home to be started at Hudli in Belgaum District which he expects to be taken over by the Kasturba Trust for working.*

*I have the copy of Pundlikji's letter to you. It is dated 10th July 1946. When he meets me personally as you have stated in your said letter and appraises me of his scheme, I will consider the matter in all its aspects and then let you know.*

Dated 20th Aug. 1946.

श्रीमती उमाबाई कुंदापूर यांच्या या पत्राची प्रत माझ्याकडे पाठवितांना कस्तुरबा ट्रस्टच्या चिटणिसांनीं मला कळविलें आहे कीं,

*I am herewith enclosing a copy of the letter received from Smt. Umabai Kundapur, agent of the Kasturba Trust, Hubli, in regard to the talk you had at Poona, with Thakkar Bappa about the maternity home to be started in Hudli, District Belgaum.*

Dated 21st Aug. 1946.

हा दवाखाना व प्रसूतिगृह हुदली गांवांत न बांधवितां, सुळधाळ स्टेशनजवळच बांधवावें, अशा दुरुस्तीनें आमची ही योजना कुंदरनाडमधील खेड्यांनीं मान्यहि केली होती. कारण सुळधाळ स्टेशन त्या मानानें सर्वच खेड्यांना तितकेंच अधिक जवळचें अर्थात् मध्यावर पडत होतें! या योजनेसाठीं कोणत्या गांवाकडून किती निधि घ्यावा याची यादीहि तयार झाली होती. अंकलगीच्या धनिक लोकांनीं या योजने-विषयीं विशेष आस्था दाखविली होती. या योजनेला कार्यवाहीमध्यें आणण्याची अनुकूलता जुळून येऊं लागली होती. पण याच काळांत जिल्ह्यांतील आम्हां प्रमुख कार्यकर्त्यांमध्येंच मतभिन्नता व वेबनाव वाढूं लागला होता. अर्थात् त्यामुळें दीड वर्ष कसें निघून गेलें तें कळूनहि आलें नाहीं. पुढें सन १९४८ सालीं जानेवारीच्या शेवटीं महात्माजींचा दिल्लीमध्यें खून झाला. आणि देशांतील सर्व लहानमोठ्या विधायक योजनांना मोठाच धक्का बसला व त्यांची पिछेहाट झाली. त्यांतच आमचीही योजना देखील उडून किंवा वितळून गेली. गांधीप्रणीत सर्व 'अखिल भारतीय विधायक संस्थां'च्या ध्येय-धोरणांत व कार्यप्रणालीमध्यें आमूलाग्र बदल झाला, व त्यांनीं सर्वतोमुखीं हात आखडता घेतला.

७७.

## समितीस वाईट गेलेलें वर्ष–सन १९४५

आमच्या आश्रमाला किंवा आतां आमच्या समितीला अथवा थोडया व्यापक दृष्टीनें बेळगांव जिल्ह्याला म्हणा, स. १९४५ चें वर्ष फारच वाईट गेलें. कारण या वर्षात चि. बापू गोखले, श्री. वामनराव देसाई, त्रिद्री, डॉ. जोशी आर. एन्. वगैरे उत्तमोत्तम कार्यकर्ते दिवंगत झालेले आहेत. त्यांचें पुण्यस्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं. यांपैकीं कै. चि. बापू गोखले यांच्याविषयीं मी यापूर्वीच माझ्या भावना लिहून चुकलों आहें. कै. श्री. वामनराव देसाई, त्रिद्री यांच्याविषयींहि प्रसंगाप्रसंगानें येथवरच्या माझ्या इतिहास-निवेदनांत उल्लेख येऊन गेलेले आहेत पण त्यांची कांहींशी सगतवार माहिती येथें देत आहें.

### कै. श्री. वामनराव देसाई, त्रिद्री

श्री. वामनराव देसाई, त्रिद्री यांचा व माझा निकटचा संबंध व गाढ परिचय होता. सुमारें तीस वर्षांत म्हणजे स. १९१७ ते १९४५ पर्यंत जीं जीं आंदोलनें झालीं त्या त्या सर्वांमध्यें ते नेहमीं आघाडीवर असलेले कोणासहि दिसले असतील.

प्रथम ते कै. गु. गंगाधरराव यांच्याकडे आले, त्या वेळीं ते इंग्रजी सहाव्या इयत्तेंत होते. गंगाधरराव यांनीं लहानपणापासून वाढविलेले व त्यांच्याजवळच लहानाचे मोठे झालेले जे अनेक कार्यकर्ते आज महाराष्ट्रांत व कर्नाटकांत आहेत, त्यांत गंगाधररावांच्या अगदीं विशेष सहवासांत राहिलेल्यांपैकीं वामनराव देसाई हे एक आहेत. चरखा संघाच्या जन्मापासून गु. गंगाधररावांनीं बेळगांव जिल्ह्यांतील कुंदरनाड भागांत जें खादी उत्पादनाचें कार्य चालविलें त्या बहुतेक राजकीयमध्यें वामनरावांचा प्रधान भाग होता. राबण्याच्या बाबतींत ते कोणासहि हार जाणारे नव्हते. विजापूरची प्रांतिक परिषद, बेळगांव येथील स. १९२४ चें काँग्रेस अधिवेशन, हुदलीचें गांधी सेवासंघ संमेलन, जमखंडीची संस्थानी चळवळ, व अशाच प्रकारच्या

दुसऱ्या अनेक प्रसंगीं आपला अहर्निश काम करण्याचा गुण त्यांनीं सर्वांच्या निदर्शनास आणून दिलेला आहे. सन १९३० चा मिठाचा सत्याग्रह, १९३२ ची कायदेभंगाची चळवळ, स. १९४१ चा वैयक्तिक सत्याग्रह, आणि शेवटीं १९४२ ची क्रांतिकारी 'चले जाव'ची चळवळ, या प्रसंगीं श्री. वामनराव यांनीं आपलें संघटनचातुर्य, प्रचारकार्य, लोकसंग्रह, संकटें झेलण्याची शक्ति आणि योजकता हे गुण चांगल्या रीतीनें व्यक्त केले आहेत.

ज्यावेळीं प्रत्यक्ष प्रतिकाराची चळवळ (Direct Action) देशांत नसेल त्यावेळीं विधायक कार्यांमध्यें किंवा कॉंग्रेस संघटनेच्या कामामध्येंहि श्री. वामनराव तितक्याच आस्थेनें व कटाक्षपणें भाग घेत असत. कॉंग्रेस मंत्रीमंडळाच्या कारकीर्दीत खेड्यापाड्यांतील विहिरी किंवा रस्ते करविण्याच्या कमिटीमध्यें काम करतांना लोकलबोर्डाच्या एन्जीनियरला चकित करून सोडण्याइतकी कळकळ व निष्ठा त्यांनीं निदर्शनास आणून दिलेली आहे. त्याच कमिटीमध्यें मीहि असल्यामुळें त्यांचें काम व हिरीरी मला प्रत्यक्ष पहावयास मिळालेली आहे.

इतर कार्यकर्त्यांपेक्षां श्री. वामनराव देसाई यांच्यामध्यें एक विशेष गुण होता. कुटुंबांतील केवळ एकाच्या कार्यकर्त्याचें बलिदान होऊन त्यांना समाधान नव्हतें. कार्यकर्त्यानें आपल्या सर्व जवळच्या व दूरच्या नातेवाईकांना आपल्याबरोबर चळवळीची दीक्षा द्यावी, त्यांना आपल्याबरोबरच आपल्या इतपत तुरुंगवास लाभावा, आणि आपल्याइतका देहदंड देशासाठीं भोगण्याची संधी त्यांना मिळवून द्यावी, असें त्यांना मनापासून वाटत असे. या गुणांमध्यें त्यांनीं शंभर टक्के यश मिळविलें होतें. त्यांचीं मुलेंबाळें, पत्नी, बंधु व इतर कुटुंबीय या चळवळीच्या होमकुंडांत होरपळून निघालीं आहेत. आपल्या बेळगांव जिल्ह्यामध्यें अशा प्रकारचीं कुटुंबें हाताच्या बोटावर मोजण्याइतकींच आहेत. कोप्पळ कुटुंब, याळगी कुटुंब, श्री. अनंतराव फडकोळ कुटुंब, श्री. हरिदास कुटुंब हीं त्यापैकींच होत.

सार्वजनिक आंदोलनें करणाऱ्या कार्यकर्त्यांमध्यें वक्तृत्व असणें आवश्यक आहे. तेंहि वामनरावांमध्यें कमी प्रमाणांत होतें, असें नाहीं. भिन्न भिन्न चळवळींच्या वेळीं ते शहरांतून कितीहि फिरत असले तरी आपल्या कार्याचें क्षेत्र खेडेगांव असावें, असें त्यांचें ठाम मत होतें. बेळगांव जिल्ह्यामध्यें खेडोपाडीं त्यांच्याइतका पायीं फिरलेला कार्यकर्ता, भूदानयज्ञ आंदोलनापूर्वी एकहि नव्हता; जिल्ह्यामध्यें कॉंग्रेस सभासद नोंद करून घेण्याचें वातावरण उठवण्याचें काम त्यांच्याइतकें इतरांना साधणें कठीण. चावडी प्रचार पद्धती करून हालविण्याची कला व चिकाटी त्यांच्यामध्यें पूर्णत्वाला पोचली होती. स. १९४२ च्या आंदोलनांत ते अखेरपर्यंत भूमिगत राहिले आणि पोलिसांनीं जंग जंग पछाडले तरी ते त्यांच्या हातीं लागले नाहींत. परंतु पुढें गांधीजींच्या आज्ञेनुसार ता. ८ ऑगस्ट १९४४ रोजीं बेळगांवमध्यें ते पोलिसांच्या स्वाधीन झाले.

एक निष्ठावंत कार्यकर्ता, अहर्निश देशकार्यालाच वाहून घेणारा एक तरुण, विधायक कार्यासाठीं निष्ठेनें कष्ट केलेला एक अनुभवी, तुरुंगाला कस्टटाप्रमाणें लेखणारा एक खंदा चळवळ्या, अव्वल दर्जाचा सचरक, खेड्यांची सेवा करण्यामध्येंच खरें राष्ट्रकार्य आहे असें मानणारा समाजसेवक, राष्ट्रकार्यांत आपल्या सबंध कुटुंबाची आहुति देण्याची उत्कट इच्छा बाळगणारा उपासक, आणि तुफानी प्रचारकर्ता, यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी श्री. वामनरावांच्या शोचनीय व अकाली निधनानें रिकामी झालेली जागा पुढें कधींच भरून निघूं शकलेली नाहीं. अनेक वर्षांच्या तपश्चर्येनंतर, भिन्न भिन्न क्षेत्रांमध्यें आघाडीवर राहून अनुभव घेतल्यानंतर, अनेक टक्केटोणपे खात खातच असले कार्यकर्ते घडले जात असतात. कुटुंबांतील कर्ता-सवरता झालेला बरोबरीचा मुलगा अकाली निधन पावला तर जी स्थिति कुटुंबाची होते, तशाच प्रकारचा दुःखाचा डोंगर असल्या कार्यकर्त्यांच्या निधनानें समाजावर येऊन कोसळत असतो. असले कार्यकर्ते आपल्या स्वतःच्या त्यागाचें मोजमाप कधींच करीत नसतात, तर आपल्या ध्येयसिद्धीसाठीं किती त्यागाची आवश्यकता आहे याचाच विचार ते नेहमीं करीत असतात. कै. श्री. वामनराव देसाई, चिट्री यांनीं आपल्या गुणसमुच्चयानें सबंध जिल्ह्याला चटका लावून सोडला होता, असेंच त्याच्या-विषयीं कोणीहि म्हणेल.

## पाच्छापूरचे डॉ. आर. एन्. जोशी

वंगभंगाच्या चळवळीपासून डॉ. जोशी यांनीं राजकीय चळवळींत भाग घेण्यास सुरवात केली होती. तेव्हांपासूनच ते राजकारणांत आघाडीवर चमकत असत. स. १९०८ सालीं त्यांना प्रथम कै. गोविंदराव याळगी यांच्याबरोबर, पिकेटिंगबद्दल तुरुंगवास घडला. त्यानंतर सन १९२१ सालीं श्री केशवराव गोखले यांच्याबरोबर त्यांनाहि एक वर्षाची शिक्षा झाली. सन १९३०, १९३२, १९४२ च्या सर्व आंदोलनांत दीर्घ मुदतीचा तुरुंगवास त्यांना भोगावा लागला. काँग्रेसचे एक निष्ठावंत शिपाईगडी या नात्यानें, ज्या ज्या वेळीं काँग्रेस हाक देईल त्या त्या वेळीं ते आपला धंदा बाजूला सारून चळवळीमध्यें उडी घेत असत. त्यांना रक्तदाबाचा विकार जडला होता. प्रकृति अत्यंत बिघडल्यामुळेंच तुरुंगांतून त्यांची मुक्तता करण्यांत आली होती. पुतण्याच्या लग्नासाठीं ते हुबळीला गेले. तेथेंच ता. १० जून १९४५ रोजीं त्यांना हृदयविकारानें देवाज्ञा झाली. त्यावेळीं त्यांचें वय केवळ बासष्ट वर्षांचें होतें.

हुदलींतील कोणीहि लहानमोठ्या रोगानें आजारी झाल्यास मी त्यांना औषध-उपचारासाठीं डॉ. जोशी यांच्याकडे पाच्छापुरास पाठवीत असें. बिल सर्व माझ्या नांवें त्यांनीं मांडून ठेवावें, स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आम्ही तें सर्व बिल पैन पै चुकतें करूं, असें मी त्यांना विनोदानें लिहीत असें. औषधें आपल्या खर्चानें देण्यास त्यांनीं कधींच अंगचोरपणा केलेला नाहीं. स्वातंत्र्य दृष्टीच्या टप्प्यांत आलें आहे, असें

गावपंचांचें व त्यांच्या विचारांच्या लोकांचें लक्ष होतेंच. विवाहाच्या निमंत्रण-पत्रावरील सह्यांवरून आमची समितीच याच्या बुडाशीं आहे हें स्पष्ट होतें. त्यांपैकीं श्री. वडवी नेव्हां तुरुंगांत होते. अर्थात् ते हुदलीमध्यें हजर नसल्यामुळें, त्यांची सही त्यांना न विचारतां किंवा त्याची संमति न घेतां घातली होती, असेंच पंच समजले होते, आणि तें खरेंहि होतें. श्री. वडवींना विचारलें असतें तर त्यांनीं आपली सही कायमच आहे, असें सांगितलें असतें यांत शंका नाहीं. या आठ सह्यांपैकीं एकच मनुष्य थोडासा ढिला निघाला असता. पण त्यावेळीं त्याची परीक्षा होण्याचा प्रसंगच आला नाहीं. पुढें त्याच्या घरीं लग्नसमारंभाच्या वेळीं आम्हा सर्व बहिष्कृतांना त्यानें दिलेलें फराळाचें निमंत्रण प्रत्यक्षांत येऊं शकलें नाहीं.

या विवाहसमारंभास सोगल क्षेत्रीं जाण्यास हुदलीहून चार बैलगाड्या भरून लोक रात्रीं १२ वाजतां निघाले. गाड्या गांवाच्या बाहेरच्या बाजूला दूर ठेवल्या होत्या. मीहि त्याच गाडींतून सोगल क्षेत्राला जाण्यास सर्वांबरोबर निघालों. गांवांतील पंचांच्या घरचीं मुलें आमच्याबरोबर मुद्दाम घेऊन जाण्याचा उपद्व्याप कोणीतरी केला होता. ही गोष्ट मला दुसऱ्या दिवशीं सूर्योदय झाल्यानंतर समजली. हुदलीमध्यें असतांना मला ही गोष्ट समजली असती तर कदाचित् मी तसें होऊं दिलेंच असतें असें नाहीं. तथापि या युक्तीबद्दल मनांतल्या मनांत मला गुदगुल्या झाल्या होत्या यांत शंका नाहीं.

बैलगाडींतील प्रवासामध्यें आम्ही पहांटे जागे झाल्यावेळीं एक आपत्ति माझ्यावर आली. आमच्या गाडीमध्येंच लहान चि. बसनगौडा पाटीलहि बसलेले होते. त्यांच्या हातांतील बोटांत एक हिऱ्याची अंगठी होती. ती अंधारांत चकाकल्यामुळें माझें लक्ष तिकडे गेलें. ती अंगठी घेऊन मी माझ्या बोटांत सहज घातली. ती अंगठी माझ्या बोटाला बरीच सैल होत होती. आमच्यावर पडलेल्या बहिष्काराविषयीं गाडींत आमची चर्चा चालूच होती. त्या चर्चेच्या भरांत माझ्या बोटांतील अंगठी कोठें व केव्हां गळून पडली हे मला समजलेंच नाहीं. त्या अंगठीची किंमत रु. १४० आहे असें मला चि. बसनगौडानें सांगितलें. आतां ती अंगठी न सांपडल्यास मी ही इतकी रक्कम कोठून व कशी भरणार? गाड्या सर्व उभ्या केल्या व चारी गाड्यांतील सर्वांनीं अगदीं बारीक दृष्टीनें रस्ताभर पहात परत मागें एक मैलपर्यंत जावयाचें असें मीं सर्वांना सांगितलें. दहापांच मिनिटांपूर्वीं ती अंगठी माझ्या बोटामध्यें होती किंवा असावी असें मला वाटत होतें. प्रत्येक गाडीमध्यें एक एक मनुष्य सामानरक्षणार्थ आम्हीं बसविला. मी बसलेल्या गाडीमध्यें सर्व फयून पाहणी केली आणि नंतर रस्तामरून आमची मंडळी पसरली. एक एक पाऊल बारकाईनें रस्त्याचें निरीक्षण करीत आम्ही मागें चालले. अशी पहाणी करीत करीत आम्ही सर्वजण एक फर्लांग दूरी गेलो असूं, इतक्यांत एकाच्या नजरेला काहींतरी चकाकल्याचा भास झाला. त्या ठिकाणची सर्वच धूळ हातानें उचलून न्याहाळून पाहिली. माती चाचपली तेव्हां त्यात ती अंगठी आम्हांला सापडली.

सोगल क्षेत्रीं विधिपूर्वक विवाहसमारंभ यथासांग झाला. सर्वांचीं भोजनें झालीं. आणि आम्ही सर्व त्याच बैलगाड्यांतून परत हुदलीमध्यें आलों. हुदलीमध्यें गरमागरम वातावरण होतें. गांवपंचांची सभा होऊन त्यांनीं आपला पुढील मार्ग व उपाय निश्चित करून ठेवलेले होते. पंचांचीं जीं मुलें आमच्याबरोबर आलेलीं होतीं तीं वयानें मोठीं असलीं तरी अज्ञान समजून त्यांना निर्दोषी मानलें गेलें होतें. म्हणजे त्या दूरवरच्या विचारानें पंचांचीं मुलें, त्यांच्या घरीं न कळूं देतां आमच्या बरोबर नेण्यांत आलीं होतीं त्यांच्या सुटकेचा हा मार्ग पंचांनीं आगाऊच काढला होता. श्री. बडवी हुदलीमध्यें नव्हतेच आणि विवाहासहि उपस्थित नव्हते, म्हणून त्यांनाहि निर्दोषी मानण्यांत आलें. 'प्रमुखमल्लनिबर्हण'न्यायानें सर्व बहिष्कार माझ्या एकट्यावर रोखण्यांत आला. पुंडलीकजी परास्त झाले म्हणजे इतर कार्यकर्तेहि आपोआप नरम येतील असा पंचांनीं विचार केला होता. एकूण चावीस लोकांवर बहिष्कार होता. त्यांतील प्रमुख म्हणून चि. गंगाप्पा यमनकनमर्डी, गौडाप्पा चन्नाप्पा भद्रकाळी, तिप्पणा यल्लाप्पा बेटगेरी, यांच्यावर बहिष्काराचा खरा रोख होता. चि. केंचाप्पा पाटील आपल्या पत्नीला घेऊन आपल्या कार्यक्षेत्राच्या गांवीं धारवाड जिल्ह्यांत निघून गेला. या बहिष्काराची झळ त्याला कांहींच लागण्यासारखी नव्हती.

गांवामध्यें खाण्याचा पदार्थ मला कांहींहि मिळूं द्यावयाचा नाहीं याची संघटना गांवपंचांनीं चांगली केली होती. माझ्याशीं गांवांत कोणी बोलूं नये, व समितीमध्यें कोणी जाऊं नये, अशी व्यवस्थाहि करण्याचा प्रयत्न झालेला होता. गांवामध्यें गंगाधररावांच्या घरीं आणि तेथें कोणी नसतील तेव्हां कोणा ब्राह्मणाच्या घरीं मी भोजन करीत होतों. माझ्याशीं कोणी न बोलल्यास मी पुस्तकें वाचीत बसेन. पण मी रोज पकाशेर दूध घेत असल्यामुळें सर्व बहिष्कार व बहिष्कार संघटना त्या पवक्या एक शेर दुधावर येऊन बसली. लिंगायत स्वामींचा या विवाहावरील अभिप्राय मी कानडी 'संदेश' पत्रामध्यें याच संधीस प्रसिद्ध केला. या बहिष्काराची व्यापकता कमी करण्याच्या दृष्टीनें मी जाहीर केलें कीं 'मला लागणारें दूध मी ज्यांच्याकडून नेहमीं घेत होतों त्यांच्याचकडून मला दूध मिळालें तरच मी तें घेणार आहे. तेव्हां बाकीच्या कोणीहि मला दूध आणून देण्याच्या भानगडींत पडूं नये. कारण इतरांकडील दूध मी स्वीकारणार नाहीं. बहिष्कार संघटना करणाऱ्यांनीं इतरांचीं मनें वळविण्याची किंवा त्यांना धमकी देण्याची आतां आवश्यकता उरलेली नव्हती. गांवांतील बहिष्कारप्रचाराला त्यामुळें आळा बसला.

ज्यांच्या घरून मी रोज दूध आणीत असें त्यांच्या घरीं मी नेहमींप्रमाणें दुधासाठीं जाऊं लागलों. ते गृहस्थ गांवांतील पंचांपैकींच एक प्रमुख होते. मी त्यांच्या घरीं दुधासाठीं गेलों त्यावेळीं त्यांच्या पत्नीनें मला सांगितलें कीं 'आपल्याला दूध देण्याची माझी इच्छा आहे, पण आपल्याला दूध द्यावयाचेंच नाहीं असें मला हे (पति) सांगून गेले आहेत.' मी म्हटलें, 'मला दूध न देण्याबद्दल ते सांगून

गेले असतील पण दूध घेऊन न जाण्याबद्दल त्यांनीं मला सांगितलेलें नाहीं व तसें त्यांनीं सांगितलें असतें तरी मी तें ऐकलेंहि नसतें. तेव्हां तुम्ही मी रोज नेत असें तेवढें दूध मापून एका भांड्यांत घालून आपल्या घरींच या ठिकाणीं ठेवीत जा. तुम्ही मला तें देऊं नका, माझ्याशीं बोलूंहि नका वाटल्यास. मी आपल्या हातानें तें दूध घेऊन जाईन आणि त्याची किंमतहि येथेंच ठेवून देईन. ते पैसे वाटल्यास उचलून ठेवा किंवा न ठेवा. ते तेथेंच राहतील.'

त्या गृहिणीला ही व्यवस्था पटली. आपण आपल्या पतीची आज्ञाहि मोडली नाहीं असेंहि त्यांत होईल, असें तिला वाटलें. हा प्रकार कांहीं दिवस चालला होता. पुढें कांहीं दिवसांनी ही गोष्ट प्रगट झाली. तेव्हां त्या पंचालाहि बहिष्कृत करावें, असें इतर पंचांनीं ठरविलें. त्यांत मतभिन्नता व वाचाळची होऊन शेवटीं हा बहिष्कारच काढून घेतल्याशिवाय किंवा उठविल्याशिवाय पंचांतील एकी कायम राहात नाहीं, असें दिसून आलें. मग हा बहिष्कार उठविण्यांत आला. सुमारें दोन महिनेपर्यंत ही सर्व गडबड चालू होती. गांवांतील एकावन्न लोकांनीं सही करून या बहिष्काराचा निषेध वर्तमानपत्रांतून प्रसिद्धहि केला होता व अशा रीतीनें हें प्रकरण मिटलें.

हा इतका प्रकार झाल्यानंतर आम्ही सर्व एकत्रित बसून हसलों, खेळलों व या बहिष्काराचें नाटक संपलें. आमच्याबरोबर असलेल्या दोनतीन कार्यकर्त्यांच्या-विषयीं पंचांच्या मनांत जी एक अढी यावेळीं बसली ती कमी तर झाली नाहींच पण उलट त्यांत भिन्न भिन्न प्रसंगीं एकमेकावर मात करतांना ती वाढतच गेली. ती निर्मूल करण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. तेव्हां या विवाहाच्या भानगडींत खरे कोण बळी गेले असतील तर तेच एकदोन कार्यकर्ते होत.

Forwarded with compliments from the Ministry of Education & Youth Services Government of India.

७९.

## गोसेवा संघाची स्थापना–सन १९४७

मी हुदलीस येईन त्यावेळीं व आमच्याकडे कोणी पाहुणे येतील त्यावेळीं चांगलें गाईचें दूध मिळूं शकावें याची व्यवस्था कशी करावी, याचा आमचा विचार चालूच होता. हुदलीमध्यें आतां २५।३० लहानमोठीं चहाचीं दुकानें झाल्यामुळें आणि गांवांतील दूध बाहेर जाऊं लागल्यामुळें, दूध मिळेनासें झालें. गांवांत आम्ही कधीं चौकशी केली तर 'दूध आहे पण आपल्याला देण्यासारखें नाहीं.' असें उत्तर लोक देऊं लागले. गांवांतील लोक दुधांत पाणी मिसळण्याची कला नवीनच शिकले असले तरी त्यांत ते पारंगत झाले होते. आमच्या समितीमध्यें चि. रामचंद्र बडिगेर हा एकटाच कार्यकर्ता गोसेवेचा छंद असलेला होता. 'त्याच्या घरीं एक चांगली गाय माझ्या खर्चानें विकत घेऊन द्यावी, त्या गाईला खाण्यापिण्यास घालण्याची व तिची निगाह राखण्याची जबाबदारी त्यानेंच घ्यावी, मी हुदलीमध्यें असेन त्यावेळीं त्यानें मला रोज एक पक्का शेर दूध द्यावें आणि दहा वर्षांनंतर ती गाय त्याच्या मालकीची व्हावी. त्यानंतर मात्र आम्हांला लागेल तेवढें दूध त्याच्याकडून आम्ही विकत घ्यावें.' अशा चर्चेचा परिणाम म्हणून या 'गोसेवा संघाची' स्थापना झाली. मग वर्ष दोन वर्षेपर्यंत हा 'गोसेवा संघ' भक्कम पायावर स्थापला जाऊन तो कायम कसा राहील, याचीच चिंता मी वहात होतों.

बेळगांवहून एक पुळी (Breeding bull) व दोन गाई दानरूपानें मिळवल्या. कोल्हापूर संस्थानच्या जंगलांतील कांहीं चांगल्या जातीच्या गाई विकत घेतल्या. गोशाळेसाठीं इमारती बांधविल्या. आणि मुंबई सरकारकडून दर्षाला दोन हजार रुपयेप्रमाणें पाच वर्षें मदत (Subsidy) प्रोत्साहन म्हणून मिळविली. दोन खोंड विकत घेतले. इतकी तयारी करून एक संस्था उभी करून दिली. खोंड विकत घेतांना न कळत एक विनोद घडून आला. पंढरपूरच्या बाजूला जनावरांच्या पाबारांत खोंड चांगले विकत मिळतात. माझे एक स्नेही श्री. बाबूराव जोशी, ॲडव्होकेट, पंढरपूर, यांना मी एक पत्र लिहून कळविलें होतें कीं 'आमच्या

## ८०.

## हुदली गांवाची वेस म्हणजे प्रवेशद्वार व बुरूज बांधविलें–स. १९५१

मिनार, बुरूज, किल्ले, मूर्ती, चित्रें, पुतळे, आणि तऱ्हेतऱ्हेचीं स्मारकें यांनीं मनुष्याची स्मृति अधिकांत अधिक काळपर्यंत टिकवून ठेवलेली आहे असे आपण पहात आलों आहोंत. जनतेच्या डोळ्यासमोर थोर विभूतींच्या पार्थिव स्मृती सतत राहिल्यास त्याचाहि परिणाम झाल्याशिवाय राहात नाहीं. कानडी भाषेमध्यें एक म्हण आहे. 'गांव-शृंगार म्हणजे प्रेतशृंगार' (ऊर शृंगार हणद शृंगार) असा त्याचा अर्थ आहे. ही म्हण कोणत्या अर्थी सार्थ असेल ती असो. परंतु गांव सुशोभित करूं नये असा अर्थ त्यांत नसावा, असे मला वाटतें. आपला गांव सुशोभित व सुंदर करण्याची काळजी प्रत्येक माणसानें घेतली पाहिजे, असें माझें मत आहे. पू. विनोबाजींनीं एका प्रसंगीं म्हटलें आहे, 'आतां देशभक्त म्हणजे ग्रामभक्त बनणें असा अर्थ झाला पाहिजे.' या व अशान प्रकारची चर्चा, मी जेव्हां हुदली गांवाची वेस किंवा प्रवेशद्वार व त्याचे बुरुज यांचा जीर्णोद्धार करून बांधविण्याचें काम हातीं घेतलें त्यावेळीं, विशेष जोरांत चालू होती. के. गंगाधरराव या माझ्या कामगिरीला 'नसता उद्‌व्याप' म्हणाले असले तरी त्यांनीं त्याचें कौतुकहि केलेलें आहे. त्यात सुधारणा सुचविल्या आहेत. हुदली गांव हें एका मुसलमान इनामदाराचें गांव! त्या मूळ इनामदारानें हें प्रवेशद्वार व त्याचे बुरुज प्रथम जेव्हां कधीं बांधलेले असतील, त्यानंतर त्यांचा जीर्णोद्धार करून ते पुनः बांधविण्याचें काम मीं केलें आहे. या कामामध्यें मी गांवांतील कोणासहि अर्थदान किंवा श्रमदान करण्यास याचना केलेली नाहीं. गावांतील सर्वांनाच त्यांचा मक्ता देऊन तें काम मी माझ्या जबाबदारीवर पूर्ण करून घेतलेलें आहे. हुदली गांवाला एकंदर तीन वेशी किंवा द्वारें आहेत. या तिन्हीहि वेशी गांवच्या लोकांच्या श्रमदानानें बांधवाव्यात अशी माझी योजना होती. पण तें होऊं शकलें नाहीं. दुसरीहि एक वेस जीर्णोद्धार करून बांधविण्याचें माझ्या मनांत आलें. मी त्या कामालाहि

प्रारंभ करविला होता. पण मला तें आवरतें घ्यावें लागलें, किंवा बंदच करावें लागलेलें आहे.

आम्ही गांवांतील सर्व प्रमुख रस्ते फरसबंद केले, त्यावेळेपेक्षां गांवाचें प्रवेशद्वार व बुरूज बांधविण्याच्या वेळेस आम्ही गांव शृंगारण्याच्या किंवा सुशोभित करण्याच्या कामाला हात घालीत आहोंत याची जाणीव गांवांतील लोकांना अधिक स्पष्टपणें झाली आहे. एखाद्या चांगल्या एन्जीनीयरला पगारी नेमून गांवाची पुनर्रचना करवावी असें माझ्या मनांत होतें. आजच्या गांवाचा आहे तसा नकाशा काढवावा आणि आम्ही सुधारणा करूं इच्छितों, त्या सर्व प्रत्यक्ष कृतींत आल्यानंतरचा या गांवाचा नकाशा कसा दिसेल तेंहि स्पष्ट करणारा एक नकाशा तयार करवावा व ते दोन्ही नकाशे गांवामध्यें प्रमुख स्थानीं लावावेत असें मीं ठरविलें होतें. तेवढ्यासाठीं एंजीनियरींग कॉलेजमधील विद्यार्थी व प्रोफेसर यांची एक पार्टी हुदलीस पाठविण्यास मी श्री. आर्. एस्. हुकेरीकर यांना विनंती केलेली होती. पण तें सर्वच काम पुढें बारगळलें, व होऊं शकलें नाहीं.

गांवांतील रस्त्यांची फरशी व प्रवेशद्वाराचा जीर्णोद्धार यामुळें गांवाची (शकल) कळाच बदलून गेली. या प्रवेशद्वारावर जी गांधीजींची छोटीशी प्रतिमा बसविलेली आहे, ती प्रतिमा कै. अण्णासाहेब लठ्ठे यांनीं दिलेली आहे.

८१.

## महात्माजींचा ब्रॉंझचा अर्धपुतळा गांवाच्या मध्यभागीं उभारला

गांवाच्या मध्यभागीं एक चांगली मोकळी जागा किंवा मैदान करवून तेथें म. गांधीजींचा एक पूर्णाकृति अर्धपुतळा बसवावा, त्यावर पक्षी वगैरे बसूं नयेत म्हणून एक छत्रीहि बांधवावी आणि तेथें रोज पहांटे व रात्रीं चौघडा झडावा अशी एक योजना बनविण्यांत आली. ही कल्पना सर्वस्वी माझीच होती. ती प्रत्यक्षांत आणण्याच्या कामाला लागल्यानंतर मी व श्री. वडवी यांमध्यें तात्त्विक मतभेद उत्पन्न झाला. पुतळा उभारणें किंवा बसविणें म. गांधींच्या तत्त्वज्ञानांत बसतें किंवा नाहीं, गांधींना तें आवडेल का? त्यांनीं याविषयीं स्पष्टपणें जाहीर केलेलें मत गांधीवादी लोकांनीं विचारांत घ्यावयाचें किंवा नाहीं? असे अनेक प्रश्न आमच्यापुढें उभे राहिले. भारतामध्यें गांधीजींचे अनेक पुतळे व अर्धपुतळे झालेले आहेत. त्यांचें उद्घाटन गांधीवादी पुढाऱ्यांनींच केलेलें आहे, असें माझें म्हणणें होतें. गांधीजींची प्रतिमा जनतेच्या डोळ्यासमोर असली तर त्याचाहि कांहीं सूक्ष्म परिणाम जनमनावर होत असतोच, या विचारानें मी ती कल्पना मूर्त स्वरूपांत आणविली.

हुदली गांवाच्या मध्यभागीं कांहीं जागा विकत तर कांहीं जागा देणगी म्हणून मीं संपादन केली. श्री. दादासाहेब देशपांडे यांनीं आपल्या मालकीची कांहीं जागा या कामीं दान देऊन त्या जागेला एक प्रकारचें डोळ्यांत भरण्यासारखें स्वरूप आणून दिलें आहे. मुंबईमध्यें गांधीजींचा ब्रॉंझचा पुतळा बनविण्यास मी सांगितलें. या कामीं मला बत्तीसशें रुपये खर्च आला. हुदली गांवाच्या मध्यभागीं जी मोकळी जागा तयार करून ठेवली होती, तेथें अर्धपुतळा बसविण्यासाठीं एक छत्री व घुमटहि बांधवून तयार झाला. अर्धपुतळा व त्याची बैठक मुंबईचे कलाकार श्री. वाघ यांनीं करून दिलेली होती. त्या बैठकीवर कोरण्यासाठीं एक वाक्य व तेथें संगमरवरी फळ्यावर कोरण्याचा मजकूर निवडून देण्याची कृपा

पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांनी केलेली आहे.' त्या विस्तृत जागेला उत्तम दगडी आवार बांधविण्यांत आलें. त्या जागेंत बैलगाड्या जाऊं शकणार नाहींत अशा बेतानेंच तें आंगण बांधविलेलें आहे. त्या जागेवर वाळू पसरविण्याचें काम गांवांतील लोकांनीं स्वखुषीनें केलेलें आहे. छत्री व घुमट बांधविण्याचें काम श्री. बसाप्पा यमकनमर्डी यांनीं केलेलें आहे.

हा गांधीजींचा अर्धपुतळा उद्घाटित करण्यासाठीं कोणास बोलवावें याचा आम्ही विचार करीत असतांना एक अत्यंत शुभ योगायोग जुळून आला. त्याच दिवशीं कर्नाटकांतील भूदानयज्ञ कार्यकर्त्यांचें संमेलन बेळगांवजवळच्च यळेकुंद्री क्षेत्रांत व्हावयाचें होतें. त्यासाठीं श्रीमान् जयप्रकाश नारायण संमेलनाचे अध्यक्ष म्हणून यावयाचे होते. त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी सौ. प्रभावतीदेवी यादेखील यावयाच्या होत्या. श्रीमान् जयप्रकाश नारायणजी यांच्या हस्तें हा गांधीजींचा अर्धपुतळा उद्घाटित करावयाचें आम्हीं ठरविलें. आमचें निमंत्रण त्यांनीं मान्यहि केलें होतें. पण एक मोठीच अडचण आमच्यापुढें उभी राहिली. त्यावेळीं सुलधाळ स्टेशनवर मेल उभी राहात नव्हती. आणि बेळगावला जाऊन परत सुलधाळला येण्याच दुसरी सोयीची गाडीहि नव्हती. श्रीमान् जयप्रकाशजींना विशेष वेळहि नव्हता. राष्ट्रपिता म. गांधी यांचा अर्धपुतळा उद्घाटित करण्यास समाजवादी व भूदानयज्ञ नेते श्रीमान् जयप्रकाशजी येणार असल्यामुळें दोन मिनिटें मेलगाडी सुलधाळ यांच्यावर उभी करविणें कठीण जाऊं नये असें मला वाटत होतें. त्या अनुरोधानें मद्रास, बेंगलोर व हुबळी येथील रेल्वेअधिकाऱ्यांशीं मी पत्रव्यवहार, तार, फोन या सर्व साधनांचा उपयोग करून परवानगी मिळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. कांहीं अधिकाऱ्यांना प्रत्यक्ष भेटलों, परंतु कोठला तरी नियम आड येत असल्यामुळें गाडी

१. "स्वतंत्र और जागृत भारत हि, पीडित और निराश दुनिया को विश्वशांति और सौहार्द का संदेश देगा।"

—महात्मा गांधी

'गांधीजयंति १९५२'

सत्यमेव जयते।

राष्ट्रपिता महात्मा गांधी के स्मारक के तौर पर यह तख्ती 'गांधी–स्मारक–निधी' की ओर से लगायी गयी है। इस पवित्र स्थान 'हुदली' में स. १९३७ एप्रिल में महात्माजी 'गांधी–सेवा–संघ' के संमेलन के लिये आये थे। हुदली में वे एक सप्ताहतक रहे थे। उस 'संमेलन' में कौन्सिलप्रवेश के बारे में निर्णय लेकर महात्माजीने देश को वैसा आदेश दिया था।

आशा की जाती है कि राष्ट्र के सब लोग इस तख्ती की रक्षा करना अपना पवित्र कर्तव्य समझेंगे।

स. १९५३ शके १८७५

दोन मिनिटेंहि सुलधाळ विश्रामवर थांबवितां येणार नाहीं, असें मला सांगण्यांत आलें. तथापि मला निराशा वाटत नव्हती. मी माझे प्रयत्न चालूच ठेवले होते.

केंद्रातील म्हणजे दिल्लींतील त्यावेळचे रेल्वेमंत्री श्री. लालबहादूर शास्त्री यांना फोन करून विनंती करावी असे मीं ठरविलें. तारऑफिसमध्यें तास न् तास बसून ध्वनिसंधान मिळवून शास्त्रीजींशीं बोलावें म्हणून प्रयत्न केला. पण कोठेंच दाद लागेना. आदल्या दिवशीं रात्रीं एकदांचा फोन मिळाला पण 'शास्त्रीजी आतांच सभेहून आले व लागलीच झोपी गेले,' असें उत्तर मला मिळालें. मी त्याना लांबलचक तार करून सर्व माहिती दिली व विनंति केली होतीच. श्री. शास्त्रीजी रात्रीं बारा वाजतां एकदांचे फोनवर आले, व त्यांनीं मला दुसऱ्या दिवशीं ऑफिसच्या वेळीं पुनः फोन करण्यास सांगितलें व ते निघून गेले. दुसऱ्या दिवशीं ते कचेरीकडे गेलेच नाहींत. आतां फक्त चोवीस तासांचा अवधि बाकी होता. श्रीमान् शास्त्री यांच्या गैरहजेरींत अधिकाऱ्यांनीं मला नकार दिला. पण मी निराश झालों नाहीं. अजूनहि एक उपाय माझ्या हातीं होता. तो शेवटचा व नाइलाज म्हणूनच वापरावयाचा असा पक्का निर्धार करून मी त्या दिशेनें प्रयत्न चालू केले.

नाइलाज म्हणून मी सत्याग्रह करून सुलधाळ स्टेशनवर गाडी थांबवण्याचा निर्णय घेतला. त्याप्रमाणें मद्रास, बेंगलोर, हुबळी व दिल्ली येथे विस्तृत तारा करून कळवून ठेवलें. बेळगांवच्या कलेक्टराच्या कानावरहि घातलें. गाडी सुळधाळ स्टेशनवर कशी थांबवावयाची? गाडीपुढें तांबडीं निशाणें घेऊन कोणी उभें राहावयाचें? साखळी कोणी ओढावयाची? कोठें ओढावयाची? वगैरे सर्व योजना मीं आंखून दिली. या कामीं धाडसाचें काम करण्याची जबाबदारी लहान बसनगौडा पाटील यांनीं शिरावर घेतली होती. आमची सर्व तयारी झाली. सुलधाळ स्टेशनवर पोलीस पार्टी ठेवून आमची योजना हाणून पाडण्याची सरकारची योजनाहि आखली गेली. ही ख्वत पहाण्यास आजूबाजूच्या खेड्यांतील लोकहि गर्दी करून जमले. स्टेशनवर जिकडे पहावें तिकडे माणसेंच माणसें दिसूं लागलीं. हा अफाट जनसमुदाय पाहून एका बाजूनें आनंद व उत्साह वाटत होता तर दुसऱ्या बाजूनें ही सर्व योजना, सर्व कांहीं व्यवस्थित घडून पार पडतें कीं नाहीं याची मला चिंता लागून राहिली. पण याहीपेक्षां माझ्या पोटांत भय होतें तें दुसरेंच होतें. या सर्व धडपडीचा परिणाम श्रीमान् जयप्रकाशजी यांच्यावर काय होईल, हें सांगतां येणें फार कठीण होतें. मोठीं माणसें कोणत्या वेळीं काय निर्णय घेतील याचा अंदाज बांधणें सोपें नसतें आणि त्यांनीं कोणताहि निर्णय घेतला तरी त्याचें समर्थन त्यांच्याकडे तयारच असतें. ते जो निर्णय घेतील त्याचें तत्त्वज्ञान मांडून तरफदारी व समर्थन करणारे लोकहि तयार असतात.

अशा रीतीनें गाडी थांबविण्याचा सत्याग्रह आपल्याच सरकारविरुद्ध करणें योग्य नव्हे, असें म्हणणारे आमच्या मित्रांपैकीहि कांहींजण होते. अशानें बेबंदशाही माजण्यास प्रोत्साहन मिळतें, असें त्यांस वाटे. हा सत्याग्रह उचलून धरून श्री.

जयप्रकाश नारायणजी वागतील तर ते शूर, वीर, जहाल, निर्भय व खरे विनोबाभक्त असेंहि त्यांनीं म्हणवून घेतलें असतें; आणि याउलट हा सत्याग्रह अनुचित ठरवून अशा रीतीनें उभी करविलेल्या गाडींतून मी खालीं उतरण्यासच तयार नाहीं, असें ते वागतील तर त्यांना शिस्तीचा माणूस, योग्य विचार करणारा, राष्ट्राला योग्य वळण लावणारा, असेंहि त्यांनीं स्वतःला म्हणवून घेतलें असतें. यांपैकीं कोणतें धोरण ते स्वीकारतात याचा अंदाज बांधणें मला शक्य होईना. म्हणून मीच मिरजेपर्यंत जावें, आपण केलेल्या सर्व प्रयत्नांची हकीगत त्यांना निवेदन करावी, आणि आमचा हा सत्याग्रह व गाडी थांबविण्याचा प्रयत्न उचलून धरण्यास त्यांना विनवावें, असें मीं ठरवलें. त्याप्रमाणें रात्रीच्या गाडीनें मी मिरजेला गेलों. पहांटे चार वाजतां मेलगाडी मिरजेस आली. मी जयप्रकाशजींच्या डब्यांत गेलों. त्यांना जागें केलें व सर्व हकीगत सांगितली. त्यांची झोप उडाली. त्यांनीं सर्व कांहीं लक्षपूर्वक ऐकल्यावर त्यांना आनंद झाला. मिरजेस मेलगाडी २० मिनिटें थांबते. त्यामुळें त्यांना इत्थंभूत समजून सांगतां आलें. सत्याग्रहाची सर्व जय्यत तयारी झाल्याचेंहि त्यांच्या नजरेस आणलें.

माझी हकीगत ऐकून त्यांचा मूळचाच लढाऊ पिंड उसळून आला. त्यांनीं मिरज स्टेशनवरच मला कळविलें कीं 'मी स्वत सुद्धां सावळी ओढून ही गाडी तेथें थांबविण्यास तयार आहें.' या सर्व चर्चेच्या वेळीं मिरज स्टेशनमास्तरहि उपस्थित होते. मिरजेहून गाडी सुटण्याच्या वेळेस मिरज स्टेशनमास्तरनीं आम्हांस अशी बातमी दिली कीं, 'मिरज, सुलधाळ, बेळगांव व हुबळी या स्टेशनांना आतांच तारा गेलेल्या असून सुलधाळ स्टेशनवर गाडी थांबविण्यास ठरल्याचें आतां दिल्लीहून कळलेलें आहे. मेलगाडीचे गार्ड व ड्रायव्हर यांना तशी सूचना आतांच येथे देण्यात आलेली आहे.' ही कदाचित् रेल्वेअधिकाऱ्याची किंवा सरकारची हुलकावणी असावी असेंहि माझ्या मनांत आल्यामुळें, मी गाडी थांबविण्याची सर्व योजना तशीच कायम राखिली होती. तथापि या बातमीमुळें सर्वच तंग वातावरण अजिबात बदलून गेलें. मी आमच्या सर्व मंडळींना तसें कळवूनहि ठेविलें. साखळी ओढण्याचा व सत्याग्रह करण्याचा प्रश्नच आतां शिल्लक राहिला नाहीं. सुलधाळ थांब्यावर मेलगाडी उभी राहिली. श्रीमान जयप्रकाशजी हुबळीमध्यें वेळेवर पोहोंचले. त्यांच्या हस्तेंच गांधीजींच्या अर्धपुतळ्याचें उद्घाटन झालें. त्यावेळीं त्यांचें समयोचित भाषणहि झालें. मग त्यांचे आभार मानून सभेचें काम संपविण्यांत आलें. पुनः दोन प्रहरच्या गाडीनें ते बेळगांवास व तेथून लागलीच बाळेकुंद्रीस गेले. तेथील संमेलनाचें कामकाज आटोपून सायंकाळीं बेळगांवास त्यांचें जाहीर भाषण झालें. त्यानंतर ते परत मुंबईला रात्रीच्याच गाडीनें रवाना झाले.

या भानगडीमध्यें तारा, पत्रें, फोन, प्रवास व सत्याग्रहाची सिद्धता यासाठीं मला दीडशें रुपये खर्च आला. बेळगांव गांवामध्यें व हुबळींत हें प्रकरण एक आठवडाभर

गाजलें. श्री. जयप्रकाशजी यांनीं अर्धपुतळा बसविण्याच्या आमच्या योजनेला उचलून धरणारें भाषण केलें. त्या सभेमध्यें माझे मित्र श्री. श्रीरंग कामत हजर होते. त्यांनाहि दोन शब्द बोलण्यास मीं विनंती केली. ती त्यांनीं मान्य केली होती असें आठवतें. एका काळीं आमच्याबरोबर काम करीत असलेल्या एका कार्यकर्त्यानें याच वेळीं मी, वडवी व गंगाधरराव यांच्याविरुद्ध एक निवेदन श्रीमान् जयप्रकाशजी यांच्या हातीं दिलें होतें. त्याबद्दल मला त्यांच्याशीं पुष्कळ चर्चा करावी लागलेली आहे. हें निवेदन टेनन्सी कायद्याच्या अंमलबजावणीविषयीं होतें. टेनन्सी कायदा चुरविण्याचा प्रयत्न गंगाधरराव करीत आहेत व मी आणि वडवी त्यांना मदत करीत आहोंत हा त्या निवेदनाचा आशय होता.

८२.

## खादी व ग्रामोद्योग सोसायटीची स्थापना–स. १९५४

आमच्याबरोबर काम करणाऱ्या कांहीं कार्यकर्त्यांनीं वेगळीच एक ग्रामोद्योग सोसायटी काढून ती रजिस्टर करविण्याचा विचार केला. याचा बोलविता धनी वेगळाच होता हें मला माहीत होतें. मी या सोसायटी स्थापनेच्या विरुद्ध नव्हतों. त्यांत त्यांनीं 'खादी'चा अंतर्भाव करूं नये असें मला वाटत होतें. त्या कार्यकर्त्यांच्या सुरक्षिततेसाठींच मी तसें इच्छित होतों. खादीकमिशनच्या अधिकाऱ्यांना व इतर वरिष्ठांना मीं तसें सांगूनहि पाहिलें. तसें त्यांना मीं लिहिलेंहि होतें. परंतु मनुष्य विचार करतो एक व घडून येतें भलतेच! मनसा चिंतितं कार्यं, दैवमन्यच्च चिंतयेत्' अशी स्थिति कित्येकदां अभावितपणेंच होऊन जाते त्यांत कोणाचा कांहीं दोष किंवा हेतु असतो असेंहि नसतें. मीं लिहिलेल्या पत्राला 'अखिल भारत सर्व-सेवा संघा'चे श्री. ना. रा. सोवनी यांच्याकडून उत्तर म्हणून मला एक पत्र आलेलें आहे. तें पत्रच या ठिकाणीं उद्धृत करतां म्हणजे 'प्रमाणपत्र' नवीन सोसायटीला देण्याच्या बाबतींत कसा घोटाळा झाला आणि चुकीचा व भलता निर्णय कसा घेतला गेला याची कल्पना येईल.

### अखिल भारत सर्व-सेवा-संघ

पत्रसंख्या ५२०८ — मगनवाडी ता. ३१-८-५४

श्री. पुंडलीकजी,

आपका ता. २९ का कार्ड मिला। इससे पहले भेजा हुआ पत्र भी मिला था। प्रमाणपत्र विभाग की ओर से जो पत्र भेजा गया था, उसमें एक बडी मजेदार गलती हुई थी। श्री. गड्डाद, संचालक, गुलेदगुड विभाग की ओरसे सिफारिश आयी थी। और माना यह गया था कि वह सिफारिश आपकी ओरसे आयी।

खैर, अब तो प्रमाणपत्र भेजा जा चुका है। उसका खारिज करना या चालू रखना, यह अब आगे ही सोचा जायेगा।

विनीत
ना. रा. सोवनी
वास्ते मंत्री.

वर उद्धृत केलेल्या या पत्रावरून घोटाळा कसा झाला व प्रमाणपत्र कसें दिलें गेलें याची कल्पना येईल. जेथें केवळ भांडतच बसण्यामध्यें आयुष्य खर्ची पडणार असेल, तेथेंच भांडत बसण्याची माझी वृत्ति किंवा स्वभाव नाही. कार्यामध्यें मधूनमधून अडचणी आल्या व तेवढ्यापुरतें इतरांशीं भांडावें लागलें, तर तसेंहि मी माझ्या जीवनांत अनेक वेळां केलेलें आहे, नाहीं असें नाहीं. पण जेथें मूळ झऱ्यांतच विष कालविलें गेलें, मूळ पायाच सदोष झाला, तेथेंच हुरमुंडी देत बसण्यापेक्षां, जेथें आपल्या आयुष्याचा व शक्तीचा उपयोग अधिक होत असेल, तेथे आपलें आयुष्य कारणीं लावावें असें मला वाटूं लागलें. त्यामुळें हुदली गांवामध्यें जी व्यापक व मोठ्या प्रमाणावरील कार्याची उभारणी करण्याचें माझ्या मनात होतें, ते मी आवरतें घेण्याचा निर्णय घेतला. आणि त्याच निर्णयाला अनुसरून मी पुढील सर्व पावलें टाकलेली आहेत.

माझ्या या स्मशानवैराग्याला दुसऱ्याहि एका गमतीदार कारणानें पुष्टी मिळालेली होती. तो सर्व इतिहास या ठिकाणीं देण्याचें कारण नाहीं. मी फक्त त्याचा ओझरता उल्लेख करणार आहें. स. १९४५ मध्यें रेल्वेप्रवासांत एका बेंगलोरच्या ज्योतिषानें सहज बोलतांबोलतां मोठ्या आग्रहानें माझी जन्मकुंडली माझ्याकडून मागून घेऊन, मला लेखी पत्रानें कळविलें होतें कीं, 'तुम्ही ता. १८ ऑक्टोबर १९५२ रोजीं मृत्यु पावणार आहांत.' ही गोष्ट त्या क्षणाला कितीहि चिन्ताग्रस्त करणारी असली तरी, मी ती विसरूनहि गेलों होतों. परंतु त्याच ज्योतिषानें पुनः १९५२ च्या ऑक्टोबरमध्यें ता. १ ते १८ पर्यंत रोज काय काय होईल त्या घटनांची तारीखवार यादीच माझ्याकडे पाठवून दिली होती. त्यांतील एक एक दिवसाचें भविष्य खरें आलेलें पाहून मला १८ व्या दिवसाच्या भविष्याची खात्री पटत जात होती. आणि माझीं सर्व कामें आवरतें घेण्याचें हेंहि एक कारण होतें. त्या महिन्यामध्यें मीं लिहून ठेविलेलें मृत्युपत्र मी स्वतःच पुढें प्रत्यक्ष कार्यवाहींत आणिलेलें आहे. ती सर्व घटना या ठिकाणीं देणें अप्रस्तुत आहे.

हे कार्यकर्ते माझें ऐकत नाहींत एवढ्याचसाठीं मी हें सांगत आहें असें खादी कमिशनच्या अधिकाऱ्यांनीं समजूं नये, वस्तुस्थिति तशी नाहीं, हें मी त्यांना कळकळीनें सांगत होतों. 'हुदलींतील ज्यांचीं नावें तुम्ही आम्हांला सांगत होतां तेच लोक आपल्या मताविरुद्ध आम्हाला या नवीन सोसायटीस प्रमाणपत्र देण्यास, पुण्यापर्यंत

येऊन, सांगत आहेत' असें मला खादीबोर्डातील लोकांनीं ऐकविलें. म्हणून मींच तो नाद सोडून दिला. 'एकदोन वर्षे या नवीन सोसायटीस मान्यता देऊन पाहतों, ती आम्हास केव्हांहि परत घेतां येते' असें मला सांगून या नवीन सोसायटीस प्रमाणपत्र देण्यांत आलें. या कामीं माझा अगदीं संपूर्ण पराभव झाला यांत शंका नाहीं. पण त्याचीं कारणें व त्यांचा ऊहापोह मी येथें देत नाहीं.

या कार्यकर्त्यांशीं आमचें कांहीं वैयक्तिक भांडण किंवा हेवादावा नव्हता व नाहीं. जेथें ज्यावेळीं त्यांच्याशीं सहकार्य करण्यासारखें होतें तेथें आम्ही सहकारहि केलेला आहे. पण आमच्या या धोरणाचें आकलन त्या कार्यकर्त्यांना व त्यांच्या नवीन सल्लागारांना होण्याची अपेक्षादेखील मी कधीं केलेली नाहीं. 'खादी ग्रामोद्योग सोसायटी'ला रीतसर मान्यता मिळून ता. २९–३–५४ रोजीं तिची स्थापना झाली. मी स्वतः त्यानंतर या उसाभरींत पडलों नाहीं.

८३.

## भूदानयज्ञ पदयात्रा

भूदानयज्ञ आंदोलनाविषयीं पू. विनोबाजी जें उत्तमोत्तम वाङ्मय निर्माण करूं लागले होते, त्याकडे माझें प्रथमपासूनच लक्ष होतें. तें सर्व वाङ्मय मी मुद्दाम आणवीत असें. भूदान यज्ञ आंदोलनामध्यें पू. विनोबाजींनीं करुन ठेवलेलें वाङ्मय ही त्यांची भारताला एक अव्वल दर्जाची देणगीच आहे. सत्याग्रहशस्त्राचा व शास्त्राचा विचार महात्माजींनीं जेथपर्यंत नेऊन ठेवला, त्याच्यापुढें जाऊन त्या विचारांत विनोबाजींनीं भर घातलेली आहे, असें मला वाटतें. सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम सत्याग्रहाची कल्पना ही विनोबाजींनीं घातलेली अमोलिक भर आहे.

मित्रवर्य तिम्माप्पा नायक यांनी कारवारमध्यें भूदानयज्ञ पदयात्रेमध्यें भाग घेण्यास मला बोलावल्यामुळें मी गेलों होतों व कारवारभर भूदानयज्ञ पदयात्रेमध्यें मी फिरलों आहें. शेवटचे दोन दिवस मी आजारी पडल्यामुळें मला परत बेळगांवला जावें लागलें. श्री. नायकमास्तर, व श्री. होदके मास्तर व काका कारखानीस यांच्या विचारांचा लाभ मला त्यावेळीं मिळूं शकला. या पदयात्रेमध्यें चालत असतांना मी गीता व मनाचे श्लोक म्हणत असे. या संहितेचें व पदयात्रेतील मैलांचें गणित बरोबर बसलें होतें. इतक्या अध्यायांच्या पठनाला इतके मैल अंतर कापलें जावयाचें असे जणुं ठरूनच गेलें होतें.

अशाच प्रकारें चंदगड महालामध्येंहि भूदान पदयात्रा काढण्यांत आली. त्यावेळींहि मी त्यामध्यें श्री. बाबुराव कामत यांच्या आग्रहामुळें गेलों होतों. पण त्यांना तें फारच महाग पडलें, असें पुढें माझ्या कानावर आलें. खरेंखोटें ईश्वर जाणे!!

हुदलीमधील कार्यकर्त्यांच्या बरोबरहि हुदलीपासून रामदुर्गपर्यंत भूदान-पदयात्रेमध्यें मी गेलों होतों. या सर्व पदयात्रेमध्यें मार्गावरील अनेक खेड्यांमधून 'भूदानयज्ञ' या विषयावर पू. विनोबाजींचे विचार व त्यांचा संदेश जाहीर सभांतून

लोकांना पोहोंचविण्याचें काम आम्ही सर्वच पदयात्री करीत होतों. परिणामाच्या दृष्टीनें सर्वत्र ठिकाणचीं व्याख्यानें यशस्वी होत असत असें नाहीं. बहुतेक खेड्यांमधून बोलण्यास मी कधींहि आळस करीत नसें. श्री. तिम्मापा नायक यांचीं व्याख्यानें सुसंगत व कित्येकवेळीं परिणामकारक होत असत. कारवारमधील एका खेड्यामध्यें श्री. नायक, होदके मास्तर व मी आमचीं व्याख्यानें झाल्यानंतर एका मनुष्यानें चिठी पाठवून विचारलें कीं या व्याख्यात्यांनीं आपली किती किती जमीन भूदानयज्ञामध्ये दान दिलेली आहे? परंतु आमच्यापैकीं कोणालाच थोडी देखील जमीन नव्हती व नाहीं, असें जेव्हां त्याला समजलें तेव्हां तो म्हणाला कीं 'भूदानयज्ञाचा प्रचार करण्यास चांगले लोक शोधून काढले आहेत!' या आक्षेपाला तिम्माप्पा नायक यांनीं जें उत्तर दिलें त्यावेळचें त्यांचें भाषण मात्र अत्यंत मुद्देसूद, शास्त्रीय व तात्त्विक होतें. त्या भाषणाचा परिणाम माझ्या मनावर पुष्कळच झाला होता. गोकर्णमधील एका एम्. एल्. ए. नें तर आमचें पथक गोकर्णामध्यें येऊंच नये, असा निरोपहि आम्हांला आधीं कळविला होता. आम्ही गोकर्णमध्यें गेलों. तेथें जाहीर सभा घेतली व ती उत्तमहि झाली.

या दोनतीन भूदानपदयात्रेमध्यें आम्ही विनोबाजींचा संदेश लोकांना किती प्रमाणांत पोचविला व आमचें प्रतिपादन किती यथार्थ व बिनचूक होतें, हें कोणी सांगावें! पण एवढें खरें कीं विनोबाजींच्या संदेशामध्यें आम्ही सर्व धुंद व मस्त होतों. विनोबाजींच्या वाक्प्रचारशैलीमुळें व विषयाच्या वैशिष्ट्यपूर्ण मांडणीमुळें आम्ही वाहून जात होतों. त्यांच्या एक तपातील प्रतिपादनामध्यें भाषेच्या, विषयविवेचनाच्या आणि तदर्थ द्याव्या लागणाऱ्या उदाहरणांमध्यें क्वचितच द्विरुक्ति होत असे. त्याची छाप आपल्या प्रतिपादनामध्यें आणण्याचा प्रयत्न कोणी करूं गेल्यास स्वतःला हास्यास्पद बनवून घेतल्याशिवाय राहणार नाहीं, हें निश्चित समजावें.

या अनेक तऱ्हेच्या चळवळीचा व प्रचाराचा परिणाम हुदली गांवावर एवढा झाला होता कीं स. १९५८ च्या पंढरपूर येथील सर्वोदय संमेलनास हुदली गांवाहून शंभर लोक तरी उपस्थित राहिलेले होते. पंढरपूर क्षेत्राचें आकर्षणहि त्यास कारणीभूत होतेंच, नाहीं असें नाहीं. पण तें आकर्षण प्रतिवर्षीच्या यात्रेच्या वेळीं असतेंच. असो.

हुदलींतील माझ्या कामास या ठिकाणीं पूर्णविराम झाला, असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. सन १९५९-६० या दोन वर्षांमध्यें के. गु. गंगाधरराव यांच्या आत्मचरित्राच्या संपादनात मी माझें आयुष्य कारणीं लावलें आहे. वाटल्यास तोहि हुदलींतील कामाचा शेवटचा भाग म्हणतां येईल. कोणत्याहि वादविषयामध्यें जाहीर रीतीनें भाग घेण्याचें मी तेव्हांपासूनच प्रयत्नपूर्वक टाळलें आहे. 'बेळगांव'चा वादग्रस्त प्रश्न सुटेपर्यंत अन्य विधायक कार्यांमध्येंच आयुष्य घालवीत रहावें असा निर्णय मीं घेतला आहे. तथापि माझा त्यास उपयोग होण्यासारखा दिसल्यास मी 'बेळगांव'च्या प्रश्नाविषयीं अलिप्त राहूं शकलों नाहीं.

८४.

## या विधायक कार्यांतील धडपडीचा माझ्या मनावर काय परिणाम झाला?

प्रथमतःच एक गोष्ट मला येथें नमूद केली पाहिजे कीं गांधीपूर्व कालांतील कल्पनांप्रमाणें कै. गु. गंगाधरराव देशपांडे ज्या चळवळी करीत होते, त्या सर्व चळवळींमध्यें हुदली व त्या भागांतील जनतेनें संपूर्ण हार्दिक व सक्रिय पाठिंबा त्यांना दिलेला आहे. त्या गोष्टी त्यांच्या मनोभावनेला अधिक जवळच्या होत्या व त्या ते समजूं शकत होते. गंगाधररावांना *असलेल्या बंदुकीच्या परवान्याच्या जोरावर किंवा आधारावर कित्येक खेडूत आपापल्या* घरीं बंदूक बाळगून असत. असल्या कित्येक लोकांना गंगाधरराव संभाळून घेत असत. गंगाधररावांच्या घरांतील किंवा मळ्यांतील झोपड्यांची अनेकदां सरकारनें झडती घेऊनहि सरकारच्या हातीं कांहींहि लागूं शकलें नाहीं, त्यांतील रहस्य हेंच आहे.

गांधीयुगांतील चळवळीमध्येंहि या खेड्यांतील जनतेनें जात, गोत, धंदा, वगैरे कांहींहि लक्षांत न घेतां गंगाधररावांना मदत केली आहे, पाठिंबा दिलेला आहे. या गोष्टी मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेल्या आहेत. इंग्रजांना आपल्या देशांतून हाकून लावण्यासाठीं हा सर्व खटाटोप चाललेला आहे, एवढें त्यांना समजत होतें. मळ्यांतील मोटेनें शेतासाठीं पाणी काढतांना 'टिळक-गंगाधर तगदार हंडकी, स्वराज्य तगो बेक अंत हेळी' (स्वराज्यसपादनार्थ टिळक-गंगाधर यांनीं घाट घातला आहे, योजना *आंखलेली आहे) अशीं त्या खेडुतांनीं म्हटलेलीं गाणीं मी ऐकली आहेत.*

गांधी सेवा संघाच्या कार्यकारिणीमधील प्रत्येकानें आपापल्या प्रांतांत आश्रम स्थापन करून विधायक कार्याला जोराची चालना द्यावी, असा निर्णय 'गांधी सेवासंघानें' घेतल्यानंतर यू. पी. मध्यें श्रीमान् कृपलानीजींनीं, बारडोलीमध्यें सरदार वल्लभभाई पटेलांनीं, पाटण्यामध्यें डॉ. राजेंद्रप्रसादजींनीं, तिरुचनगोडूमध्यें श्रीमान् राजगोपाळाचार्य यांनीं आणि हुदलीस श्रीमान् गंगाधरराव यांनीं आश्रम स्थापन करून कार्याला प्रारंभ केला होता. यांपैकीं खादी उत्पादन व प्रचार या बाबतींत

१७

श्रीमान् कृपालानीजींनीं उच्चांक गांठून दाखविलेला आहे, असें त्यांच्या आश्रमाच्या अहवालावरून दिसून येतें. श्रीमान् गंगाधरराव देशपांडे यांच्या आश्रमामार्फत होणाऱ्या कार्यामध्यें राजकीय दृष्टि प्रामुख्यानें दिसून येत होती. कार्याच्या विविधतेच्या दृष्टीनें पाहिल्यास हुदलीचें विधायक कार्य अधिक डोळ्यामध्यें भरण्यासारखें आहे. या आश्रमाध्यें पहिल्या दोनतीन तुकड्यांमध्यें आलेले कार्यकर्ते अशाच भावनेनें गु. गंगाधररावांच्या जवळ आलेले होते, ते सर्व शेवटपर्यंत त्याच भावनेनें कार्य करीत राहिलेले दिसून येतात.

गांधी तत्त्वज्ञानामध्यें विधायक कार्याला राजकारणनिरपेक्ष स्वतंत्र अस्तित्व व स्थान आहे. ही गोष्ट खरी असली आणि आम्हीहि तसें व्याख्यानांतून कंठरवानें सांगत असलों तरी आमच्या रक्तांत, धोरणांत, व वागणुकीमध्यें ती गोष्ट कधींच उतरलेली नाहीं. विधायक कार्याचा कार्यक्रम आर्थिकदृष्ट्या व सामाजिक दृष्ट्या यशस्वी करण्यासाठीं आम्ही कितीहि राबत असलेले दिसलों तरी आमच्या मनांत व बुद्धींत राजकारणालाच अग्रस्थान होतें व आहे. खेड्यांतील स्त्रियांना सूत कातण्यास प्रवृत्त करणें, त्यांच्या सुतामध्यें सुधारणा घडवून आणणें, त्यासाठीं चरख्यामध्यें सुधार व नवीन नवीन परिवर्तन करवून घेणें, खेड्यांतील स्त्रिया कातीत असलेलें सूत विकत घेणें, त्याची प्रतवारी लावणें, विणकरांना हातसूत विणून देण्यास प्रवृत्त करणें, सूत विणवून खादी तयार करणें, ती खादी लाकडी लोडानें वडवून बाजारांत ठेवण्याला तयार करणें, घरोघर फिरून खादी विकणें, आणि शेवटीं खादी वाहून नेण्यासाठीं गाढवें राखून त्यांचीहि निगा राखणें या सर्व गोष्टी आम्ही करीत असलों तरी त्यांत आमचा हेतु राजकीय होता. यांत किती लोकांशीं 'आमचा संबंध येईल व त्यापैकीं किती लोक चळवळीमध्यें आम्ही तुरुंगामध्यें पाठवूं शकूं याकडेच आमचें लक्ष अधिक होतें. मी गोकाक गिरणीच्या मजुरांमध्यें काम करीत असतांना, कॉंग्रेसच्या एका निवडणुकीमध्यें आम्हाला पाहिजे असलेल्या उमेदवारास गिरणीमजुरांपैकीं बहुतेकांचीं मतें पडलेलीं दिसून आल्यानंतर, एका कार्यकर्त्यानें कॉंग्रेसच्या 'जिल्हा साधारण सभे'त सहज उद्गार काढले होते कीं 'मजूरवर्गांत पुंडलीकजींनीं सेवा केल्याचें फळ आज मिळालें!' हीच आमची वृत्ति होती व आहे. हरिजनांची सेवा करतांना त्यांच्या गल्लींतील रस्ते आम्ही झाडत असलों, त्यांच्या मुलांना शिक्षण देण्यासाठीं आम्ही धडपडत असलों, त्यांच्यासाठीं चर्मालय स्थापून पादत्राणें बनवून तीं विकण्यासाठीं आम्ही घरोघर फिरत असलों, तरी स्वातंत्र्याच्या चळवळीमध्यें ते आम्हांला कितपत साथ देतील याकडेच आमचें लक्ष होतें. आम्ही व्यायामशाळा काढल्या, स्वयंसेवक दल उभारण्याचा प्रयत्न केला, गोसेवासंघ स्थापला, गांधीतत्त्वज्ञानाचा वर्ग चालवला, कार्यकर्त्यांच्या कुटुंबांतील लहानथोर सर्वांना मदत करीत राहिलों, शक्य तेथें कित्येकांना नोकरीलाहि जोडून दिलें अगर अन्य जें जें केलें त्या प्रत्येक कार्यांत आमच्या मनांतील मतलबाला आमच्या राजकीय आंदोलनांत यांतील बहुसंख्यलोक आम्हांला चिकटून राहतील,

साथ देतील, निदान आमच्याविरुद्ध तरी वागणार नाहींत, अशी अपेक्षा ठेवूनच आम्ही काम करीत होतों. कार्यकर्त्यांच्या मित्रांना किंवा मित्रांच्या कुटुंबीयांना मदत करण्याची संधी आम्ही व्यर्थ जाऊं देत नव्हतों, याच्या बुडाशीं मुद्दां हीच वृत्ति होती. विधायक कार्यासाठींच विधायक कार्य करीत राहणाऱ्या कार्यकर्त्यांच्या ध्येय-धोरणांत अगर कार्यक्रमामध्यें आणि आमच्या कार्यक्रमामध्यें फरक दिसून येण्यासारखा नसला तरी मनाच्या ठेवणीच्या दृष्टीनें त्यांत जमीनअस्मानाइतकें किंवा अजगजांत अंतर होतें. ही गोष्ट गु. गंगाधरराव देशपांडे यांनीं 'गांधीसेवा संघा'च्या हुदली येथील अधिवेशनांत स्वागताध्यक्ष या नात्यानें केलेल्या आपल्या भाषणांत अगदीं स्पष्टपणें सांगितलेली आहे. या स्वातंत्र्य चळवळीला पुढें पाठिंबा मिळवण्याच्या दृष्टिकोनांतून पाहिल्यास आमच्या विधायक कार्याचें शंभरटक्के यश आमच्या पदरांत पडलेलें आहे, असेंच कबूल करावें लागेल.

हुदलीमध्यें आम्ही 'आश्रमातर्फे' किंवा पुढें 'चरखा संघाच्या' वतीनें अथवा शेवटीं 'समग्र ग्रामसेवा समिती'मार्फत ज्या ज्या प्रवृत्ती सुरू केल्या होत्या त्यांत हुदलीच्या लोकांनीं आम्हांला मदत केली आहे, पाठिंबा दिला आहे, आम्हां कार्यकर्त्यांचा विशेषतः माझ्या स्वतःचा आग्रह, क्रोध, चिडखोरपणा, वेडेचार सर्व कांहीं सहन केलेलें आहे. मी दोन्ही बाहू वर करून ओरडून सांगू शकेन कीं या जनतेवर मी अमर्याद सत्ता चालविलेली आहे. जनतेची सेवा माझ्या हातून व्हावी व स्वातंत्र्याच्या लढ्यांत जनतेला भाग घेण्यास लावण्यामध्यें माझ्या आयुष्याचा सदुपयोग व्हावा हा एकच हेतु माझ्या मनांत होता व आहे. जनमानसावर हा संस्कार किंवा परिणाम व्हावा म्हणून ज्या ज्या प्रवृत्ति मी व माझे सहकारी यांनीं मिळून सुरू केल्या त्या सर्वांमध्यें लोकांनीं आम्हांला अपेक्षेपेक्षां अधिक साथ दिलेली आहे. स्वातंत्र्याच्या सर्व आंदोलनांमध्यें हुदली व आसपासच्या खेड्यांनीं मनापासून भाग घेतलेला आहे. त्यामुळें आमचा हुदलीचा विधायक कार्यक्रम चांगलाच यशस्वी झाला, असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. त्यांत अतिशयोक्ति तर नाहींच नाहीं.

पण राष्ट्रसंरक्षक व राष्ट्रसंवर्धक विधायक कार्य उभारण्याचा प्रयत्न म्हणून आमच्या हुदलींतील कामाकडे पाहिल्यास, आम्हांला विशेष यश लाभलेलें नाहीं. राष्ट्रसेवा हीच आपली जीवननिष्ठा मानणारे राष्ट्रसेवक किंवा समाजसेवक निर्माण करण्यास आम्हांला यश मिळवितां आलेलें नाहीं, हें अगदीं स्पष्ट आहे. खेड्यांत सेवाकार्य करण्यास जाण्यापूर्वी माझी खेड्यांविषयीं व खेड्यांतील लोकांविषयीं जी भावना व विचार माझ्या डोक्यांत होते ते आतां अनुभवानें अजिबात बदलून गेलेले आहेत. खेड्यांतील जनतेच्या अज्ञानाविषयीं आमच्या मनांत अगदीं भलत्या कल्पना होत्या. अनुभवांतीं असें दिसून आलें आहे कीं खेड्यांतील लोकांना लिहितांवाचतां येत नसलें तरी ते अज्ञानी नाहींत. त्यांना सर्व कांहीं समजत असतें. स्त्रियांना किंवा लहान मुलींना जसे आपल्याकडे कोण कोणत्या दृष्टीनें पाहतात हें सहजिकपणेंच

झटकन समजत असतें, तसेंच खेड्यांतील लोकांना कोण व कसे आपल्याला लुबाडीत असतात हें पूर्णपणें ठाऊक असतें. ते उघड्या डोळ्यांनीं पाहत असतात. त्यांची बुद्धि चांगली कुशाग्र असते. गांवांतील पंचांपुढें जे अनेक प्रश्न निर्णयार्थ येत असतात त्यांचे त्यांनीं दिलेले निर्णय पाहिल्यास, पंचांपुढें आपलें म्हणणें मांडतांना त्यांनीं कार्यकारणभावांचे जोडलेले धागेदोरे पाहिल्यास, त्यांची बुद्धिमत्ता, दूरदर्शित्व व व्यवहार्यता यांचें दर्शन होतें. स्वार्थ व भीति यांमुळें मनुष्याची बुद्धि किती तीव्र होऊं शकते याचें प्रत्यंतर खेड्यांमध्येंच येऊं शकते. एक अशिक्षित डोंगरांतील खेड्यांत राहणारी म्हातारी बुट्टीमध्यें धान्यांत दारूच्या बाटल्या घालून त्या बेळगांवांत आणून पोचविण्याचें काम प्रत्येक बाजाराच्या दिवशीं करीत असे. त्या बाटल्या स्वीकारून त्याचे पैसे चुकते करणारे पोलीसहि ठरलेले असत. पण एकदां अशा पोलिसाची 'ड्यूटी' बदलल्यामुळें नवीन पोलिसानें त्या म्हातारीच्या डोक्यावरच ती बुट्टी देऊन तिला फौजदारसाहेबांच्या पुढें नेलें. ती म्हातारी निर्भयपणें त्या पोलिसाच्या हुकुमाप्रमाणें तो नेईल तिकडे जात होती. फौजदारांपुढें ती बुट्टी आपल्या डोक्यावरून उतरवून, तिनें त्या पोलिसाला सांगितलें कीं 'मला वेळ होतो. माझी हमाली देऊन मला मोकळें करा. आणि मग तुम्ही बोलत बसा.' पोलीस व फौजदार दोघेहि आश्चर्यचकित झाले! तिची हमाली चुकती केली व तिला जाऊं दिलें. पुढें त्या बुट्टीचें काय झालें हें त्या म्हातारीला कळलें नाहीं, कीं तिनेंहि चौकशी केली नाहीं. त्या बुट्टीचें, बुट्टींतील धान्याचें आणि त्या धान्यांतील दारूच्या बाटल्यांचें पुढें काय झालें असेल याचा अंदाज करण्याचें काम मीहि वाचकांवरच सोपवून देतों. जो तो आपापल्या विचारधारेप्रमाणें त्याचा अर्थ लावील. ज्याची पिळवणूक किंवा छळ—म्हणा सुशिक्षित, श्रीमंत, ग्रामाधिकारी, भटभिक्षुक, ज्योतिषी करीत असतात अशी आपली समजूत आहे, तेच खेडूत प्रसंग लाभतांच आपल्या खालच्या लोकांना कसें वागवतात व काय करतात याच्या इतिहासापासून 'लुईस'सारख्या अधिकाऱ्यासहि पुष्कळच शिकतां येण्यासारखा मसाला मिळूं शकेल. 'आम्ही काय हुंब, अज्ञानी! आम्हाला काय समजतें!' असें म्हणत म्हणत त्याचा फायदा हे लोक ज्या प्रकारें व जेवढा घेऊं शकतात तितका फायदा घेण्याची कला साधूं शकतील अशीं माणसें शहरांमध्येंहि फारशीं मिळूं शकणार नाहींत. लहान बालक मोठमोठ्यानें रडून आकांत करीत मोठ्यांनाहि मारीत असतें, हें दृश्य अनेकांनीं पाहिलें असेल. त्यांनीं लहान टेकडीची किती पट केली असतां हिमालयाची कल्पना करतां येते, तितके पट केल्यानंतरच खेड्यांतील स्वार्थी हुंबत्वाच्या बहाण्याची कांहींशी पुसट कल्पना करतां येईल.

खेड्यामध्यें लोकमत परिणामकारक व टिकाऊ नसतें. अंगावर उलटलेलें बोलणें, सार्वजनिक पैशाची अफरातफर, उघडकीस आलेली चोरी, खोटा कागद, विनयभंग अथवा स्त्रियांच्या अंगावर टाकलेला हात, केलेला वचनभंग, फिरविलेलें बोलणें, या व अशांसारख्या गोष्टी केवळ हसून, क्षमा मागून, पैसे परत देऊन किंवा

पंचांनीं बसविलेला दंड भरून, खेड्यामध्यें सहज भागवितां येवात. दुसऱ्याची पळवून आणलेली किंवा बिघडवलेली स्त्री, तिच्या पतीला पैसे देऊन तिला आपल्याकडे कायम ठेवून, असलें प्रकरण निवारतां येतें; 'माझ्यावर आलेले पैसे मी परत भरलेले आहेत, पळवून या भुलवून आणलेल्या स्त्रीबद्दल पंचांनीं सांगितलेली रक्कम भरली असतांना पुनः आतां त्याबद्दल कां बोलतां?' असें विचारण्यास किंवा ऐकण्यास कोणासहि कांहींहि वाटत नाहीं. आणखी एक उदाहरण दिलें म्हणजे खेड्यांतील जनतेच्या विचारसरणीची अधिक स्पष्ट कल्पना येईल. 'कोणाशींहि आपला तात्त्विक मतभेद उत्पन्न झाला असला, किंवा त्याला तीव्र वैमनस्याचें स्वरूप आलेलें असलें तरी, तें टाळून किंवा त्या मतभेद-विरोध—वैमनस्य अथवा विद्वेषाच्या अतीत जाण्याची कला आपल्याला साधली पाहिजे. हा विचार गांधीतत्त्वज्ञानामध्यें वसतो. ती आपली एक आध्यात्मिक साधना होऊं शकते.' या विचाराला धरून होणाऱ्या आमच्या वागणुकीचें आकलन खेड्यांतील कार्यकर्त्यांना होत नसलें, तरी आमच्या असल्या व्यवहाराचा किंवा सात्त्विक वागणुकीचा उपयोग करून घेण्याचें त्यांना वेळेवर सुचतें व चांगलें साधतें. 'आम्ही आपल्या कामाला किंवा विचारसरणीला विरोध करीत असतों, पण त्याचा परिणाम आपण आपल्या मनावर करून घेणार नाहीं अशी आमची खात्री आहे.' असें आम्हांला आमच्या सिद्धांतांचें स्मरण करून देण्यास खेड्यांतील कार्यकर्ते-आमच्याकडून आपलीं कामें करून घेतांना, कधींच विसरत नाहींत. अशा प्रसंगींचें त्यांचें बोलणें-वागणें-नमणें पाहातांना मौज वाटते. तथापि संधी लाभतांच किंवा प्रसंग आल्यास आम्ही त्यांचीं कामें करीतच रहातों. आमच्याकडे वशिला लावण्यास आमच्या एखाद्या स्नेह्याला आणण्यापेक्षां आमच्या विरोधी मनुष्यास घेऊन येण्याचें दूरदर्शित्व त्यांच्या रोजच्या व्यवहारांतील होऊन बसलेलें आहे. 'आपणच आम्हांला गुरुस्थानीं आहांत' असें ते म्हणूं लागले म्हणजे शरमेनें मान खालीं घालावीशी वाटते. अशा समाजामध्यें अर्धवट शिकलेल्या तरुणांनीं अमोलिक भर घातलेली आहे!! कृतज्ञतेची भाषा खेड्यांमध्यें सर्वांना उत्तम बोलतां येते व ती कृतज्ञता तेथेंच संपविली जाते किंवा अलंभावाला पावते. अलीकडे गांधीविचारांची सामान्य भाषा बोलण्यास खेड्यांतील तरुण पिढीतील बहुतेक लोक सामान्यतः शिकलेले आहेत! ते त्या बाबतींत शहरांतील लोकांना हार जातील असें नाहीं. समाजातील असत्प्रवृत्ति आणि अगणित दुर्गुण यांच्याशीं सामना देण्यांत गांधीजींची उभी हयात खर्ची पडलेली आहे. यासाठीं त्यांनीं एक नैतिक युद्धनीतीच निर्माण केलेली आहे. राजकीय, आर्थिक, सामाजिक राष्ट्रीय व अंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अहिंसात्मक पद्धतीची ही युद्धनीति अवलंबून व उपयोजन दाखविण्याचा त्यांनीं प्रयत्न केलेला आहे. पण या सर्व प्रयत्नांचा एकम् म्हणजे त्यांच्या तत्त्वज्ञानांत 'एक व्यक्ति' आहे, हें विसरून चालणार नाहीं. त्यांच्या साधनेचा प्रारंभ व्यक्तीपासूनच होत असतो. मनुष्यानें आपल्या जीवनाचें अंतिम ध्येय काय ठरवावें व त्यासाठीं त्यानें आपलें जीवन

सूची

# शुद्धिपत्र

| पृष्ठ पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ३·२४ | दशोपनिषदें हि | दशोपनिषदें हि |
| १७· २ | अपृश्य | अस्पृश्य |
| २३·३२ | उघड्या डोळ्यांनी | उघड्या डोस्यानीं |
| ३३ (प्रकरण १२ चें शेवटचें पान) | | ३६ (प्रकरण १२ चें शेवटचें पान) |
| ८८· ४ | (metlled Road) | (Metal Road) |
| ९१·१८ | नवीन चक्र | नवीन गतिचक्र |
| ११५·१२ | आली असाल | आला असाल |
| १२७·११ | अपण वागावें | आपण वागावें |
| १२८·१२ | खोदणें उकरलें असावें | खोदलें उकरलें असावें |
| १३७·१३ | योण याहि | योगत्याहि |
| १६१·१२ | मुळं | मुळें |
| २०९· २ | 'समग्र ग्रामसमिति' | 'समग्र ग्रामसेवा समिति' |
| २१५·१४ | कार्या या | कार्यांच्या |
| २२८· ९ | पृथक् मूलोद्योग | पथक मूलोद्योग |
| २५६· १ | परिणामाच्या पृष्टीनें | परिणामाच्या दृष्टीनें |
| २६१·३१ | उपयोजन दाखवण्याचा | उपयोजून दाखविण्याचा |
| २६२ ११ | ग्रामसेपक | ग्रामसेवक |